# Beauties of Marathi Poetry:

ANCIENT AND MODERN.

**PART I.**

# काव्यसौन्दर्य

अथवा

प्राचीन व अर्वाचीन मराठी काव्यांतील वेंचे.

## भाग पहिला.

लक्ष्मण गणेशशास्त्री लेले

यांनीं तयार केला.

आवृत्ति पहिली.

इ० स० १९०७.

किंमत १० आणे.

---

पुणें येथें रावजी श्रीधर गोंधळेकर यांच्या ‘ जगद्धितेच्छु. ’
छापखान्यांत छापिली.

# प्रस्तावना.

कोणत्याही देशांत काव्यग्रंथांची मोठी प्रतिष्ठा असते. महाकवींच्या कृति ह्मणजे अनिर्वचनीय आनंदाच्या खाणी, उदात्त कल्पनांचीं मंदिरें, सदुपदेशाचीं भांडारें, ज्ञानाचीं जन्मस्थानें, व शारदेचीं विलासभवनें होत. अशी कविता देशाचें वैभव होय. हें वैभव कायम राखून त्याचें संरक्षण करण्याविषयीं शाहणीं व विद्वान् माणसें हमीं प्रयत्न करीत असतात. व्यासवाल्मीकि, होमरव्हर्जिल, कालिदास भवभूति, शेक्सपीयरमिल्टन, इत्यादि कविरत्नांच्या रम्यनिर्माणशालिनी कृति आज सुरक्षित असून जगद्वंद्य होऊन बसल्या आहेत लक्षावधि लोकांस आनंद, उपदेश व ज्ञान यांचा स्पृहणीय लाभ करून देत आहेत व त्यांस कृतार्थ करून सोडीत आहेत. महाराष्ट्रा या कवींच्या मालिकेंत गोंवण्यासारखीं कांहीं तेजस्वी मराठी कवि निपजलीं आहेत. मुकुंदराज, ज्ञानेश्वर, एकनाथ, नामदेव, तुकाराम वामन, रामदास, मुक्तेश्वर, श्रीधर, मोरोपंत यांच्या सारखे गणनीय महाराष्ट्र कवि झाले आहेत. यांचीं काव्यें उपलब्ध होऊं लागून त्यांची योग्य आपणांस कळूं लागली आहे. ज्यांच्या श्रमानें हें महत्वाचें कार्य घडून आलें आहे त्याचें मुख्य श्रेय कै० परशुरामपंत तात्या गोडबोले दिलें पाहिजे. इ०स० १८५४ सालीं तात्यांनीं महाराष्ट्रकाव्योदधि मंथन करून त्यांतून ‘ नवनीत ’ हें रत्न काढिलें. या ग्रंथांत तात्यांनीं मुकुंदराजापासून अनंतफंदीपर्यंत झालेल्या प्रसिद्ध कवींच्या कृतींतील सुंदर उतान्यांचा संग्रह केला. तात्यांची रसिकता व बहुश्रुतता यांचा हा ग्रंथ उत्तम स्मारक आहे. यापुढें नऊ वर्षांनीं सर्वांस घेण्यास सुलभ पडावें ह्मणून तात्यांनीं सदर पुस्तकाचा दुसरा भाग प्रसिद्ध केला. हा पहिल्या भागापेक्षां पुष्कळच लहान होता. पण सौंदर्याच्या दृष्टीनें पहिल्या भागापेक्षां देखील अधिक सरस होता असें ह्मटलें तरी चालेल. नवनीतानें महाराष्ट्रीयांस मराठी काव्याची गोडी लाविली, व मराठी कवींविषयीं त्यांच्या मनांत प्रेमबुद्धि उत्पन्न केली. अशा दृष्टीनें प्रस्तुत ग्रंथ

योग्यता फार मोठी आहे; आणि ह्मणूनच त्याचें जितकें अभिनंदन करावें तितकें थोडेंच होणार आहे.

तात्यांनीं वेंच्यांच्या रूपानें मराठी काव्यांचा संग्रह केला. त्यानंतर उपलब्ध जुनीं मराठी काव्यें समग्र मुद्रित करण्याचे कांहीं प्रयत्न झाले. कै० माधव चंद्रोबा यांनीं 'सर्वसंग्रह' काढिला. नंतर रा० सा० काशीनाथ नारायण साने यांनीं 'काव्येतिहाससंग्रह' हातीं घेतला. पुढें कै० जावजी दादाजी यांनीं 'काव्यसंग्रह' सुरू केला. हें मासिक पुस्तक अद्यापिही कै० जावजीशेट यांचे चिरंजीव रा० रा० तुकाराम जावजीशेट, जे. पी., यांनीं फार चांगल्या रीतीनें चालविलें आहे. वरील तिन्ही प्रयत्न फार उपयुक्त व प्रशंसनीय असून अंतर्बाह्य स्वरूपानें एकापेक्षां एक सरस निपजले आहेत. अलीकडे 'महाराष्ट्र कवि,' 'प्रभात,' इत्यादि मासिक पुस्तकांतून व अन्यत्रही नवीन उपलब्ध झालेलीं जुनीं मराठी काव्यें संगृहीत करण्याचे प्रयत्न चालू आहेत ही गोष्टही अभिनंदनीय आहे.

उत्तम काव्यग्रंथ समग्र छापून प्रसिद्ध होणें अत्यंत आवश्यक आहे ही गोष्ट निर्विवाद आहे. तथापि अशा ग्रंथांचा संग्रह सार्वजनिक पुस्तकालयें, कांहीं श्रीमान् हौशी लोक व सरस्वतीचे निःसीम भक्त हेंच काय ते करणार. सामान्य स्थितींतील लोकांना द्रव्याची तादृश अनुकूलता नसते; व निर्वाहाच्या कामधंद्यामुळें त्यांस रिकामा वेळही थोडा सांपडतो. अशा लोकांना मोठाल्या काव्यग्रंथांचा संग्रह करतां येत नाहीं. वेगळ्या वेगळ्या कवींच्या काव्यांतून सुंदर वेंचे काढून ते अल्प किंमतींत पुस्तकरूपानें तयार केले तर मात्र त्यांना ते सहज घेतां येतात. इंग्लंड, जर्मनी, अमेरिका, जपान इत्यादि सुधारलेल्या देशांत अशा प्रकारचीं वेंच्यांचीं शेंकडों लहान लहान पुस्तकें प्रचलित आहेत. त्यांचा सामान्य स्थितींतील वाचकांस अतिशय उपयोग होत असून शाळांतूनही तीं चालू आहेत.

आपल्या इकडेही अशाच नमुन्यावर लहान लहान पुस्तकें झालीं पाहिजेत. तात्यांनीं याचा उपक्रम उत्तम प्रकारें केला. पण त्यांच्यानंतर तशा प्रकारचे प्रयत्न फारसे कोणीं केले नाहींत. अशा दिशेनें उद्योग

करण्याचें मनांत योजून प्रस्तुत ग्रंथ हातीं घेतला आहे. हा 'नवनीत'-पुस्तकाच्या पुरवणीदाखल आहे, त्याशीं स्पर्धा करण्याकरितां काढलेला नाहीं, हें सांगणें इष्ट आहे. हल्लींच्या नवनीतांत नसणारी कांहीं जुनी कविताही या पुस्तकांत घातली आहे. शिवाय आधुनिक मराठी काव्यांतून कांहीं वेंचे काढून ते यांत दिले आहेत. जुन्या मराठी महकवींच्या योग्यतेचा आधुनिक कवींत अद्यापि कोणी निपजला नाहीं तथापि अलीकडील कित्येक काव्यांत बरेंच सौंदर्य आहे; आणि अशा दृष्टीनेंच त्याचा थोडासा संग्रह प्रस्तुत पुस्तकांत केला आहे. अर्वाचीन मराठी कवितेविषयीं कोठें कोठें बराच प्रतिकूल ग्रह झालेला दिसतो तो ह्या ग्रंथांतील उतारे वाचून अंशतः तरी दूर होईल असा भरंवसा आहे. प्रस्तुत पुस्तक हायस्कुलांतील कोणत्याही वर्गांतील विद्यार्थ्यांनी वाचण्यासारखें आहे. कारण मुलांचा अधिकार मनांत आणून त्याप्रमाणेंच यांत वेंच्यांची योजना केली आहे. कवितेंतील विषय विविध आहेत व तिचीं वृत्तेंही सुंदर व भिन्न भिन्न आहेत. यामुळें हा ग्रंथ विद्यार्थ्यांना व इतर वाचकांना प्रिय होईल अशी आशा आहे.

ह्या पुस्तकाला एक परिशिष्ट जोडलें आहे. हें आमचे मित्र व 'मयूरभारतसार' याचे कर्ते, रा० रा० पांडुरंग महादेव बाक्रे, बी. ए., यांनीं लिहिलें आहे. यांत पृष्ठ व पद्य यांच्या अनुक्रमानें कठिण शब्दांवर टिपा दिल्या आहेत. शिवाय कथासंदर्भ, कविसंप्रदाय, वृत्तें, इत्यादि उपयुक्त माहितीही यांत दिली आहे. हें व शुद्धिपत्राचें काम रा० बाक्रे यांनी केवळ हौसेनें व निरपेक्षबुद्धीनें केलें आहे हें येथें सांगणें आवश्यक आहे.

आधुनिक कवींनीं व त्यांचे काव्यग्रंथ प्रकाशित करणाऱ्या गृहस्थांनीं वेंचे घेण्याची परवानगी मोठ्या संतोषानें आह्मांस दिली हे त्यांचे आह्मांवर मोठे उपकार आहेत. नूतन मराठी विद्यालयाच्या चालकांनी 'गद्यरत्नसमुच्चय' या ग्रंथाला जसें प्रोत्साहन दिलें तसें यासही दिलें आहे याबद्दल त्यांचेही आह्मी मनःपूर्वक आभार मानतों.

पुणें, एप्रिल, १९०७ इ. **लक्ष्मण गणेशशास्त्री लेले.**

# अनुक्रमणिका.

# काव्यसौन्दर्य.

## भाग पहिला.

### गुरुशिष्यसंवाद.

**आर्या.**

श्रीशंकरभगवत्पदरचित प्रश्नोत्तराख्य मणिमाला,
प्राकृत शब्दगुणीं मी रचितों बुध हो! परंतु प्रतिपाला. १
कंठींच असों द्या हो ! हे मणिमाला अलभ्य परि साची,
प्रेमें सुलभचि रसिकां, कीर्ति इणें जिंकिली च परिसाची. २
प्रश्नोत्तरमणिमाला हे केवळ होय हो सुधाधारा,
खळराहुलाचि न जिरे, त्यांस जिरे भजति जे बुधाधारा. ३
स्वामी ! काय ग्राह्य स्वमुखें सांगा; करा दया पूर्ण.
शिष्या ! स्वीकारावें गुरुवचन प्रणतिपूर्व अतितूर्ण. ४
काय त्यागावें तें, स्वामी ! सांगा अजाणत्यास मज.
शिष्या ! अकार्य सारें टाकावें हें मनीं बरें समज. ५
स्वामी! कोण गुरू हें सांगा, होईन संशयोन्मुक्त.
शिष्या ! जो तत्त्वज्ञ प्राणिहिता कारणें सदोद्युक्त. ६

पाथेय काय मार्गीं ? सांगा; तुमचेंचि वाक्य बहु पथ्य.
शिष्या! धर्मसिदोरी फार बरी हेंचि जाण तूं तथ्य. ७
शिष्याज्ञानतमोऽर्का गुरुराया ! कोण शुद्ध या लोकीं?
शिष्या! ज्याचें मानस निर्मळ लोकत्रयांत शुचि तो कीं. ८
पंडित कोण? स्वामी! छात्रजनाच्या अनंतसुखहेतो!
शिष्या! सद्बुद्धिसुधाकलशा! जेथें विवेक राहे तो. ९
हाळाहळापरिसहीं दारुण विष कोणतें अजि स्वामी!
अपमानिलें गुरूतें वत्सा! तें गरळ जाणतों आह्मी. १०
तस्कर कोण स्वामी? वत्सा! जे विषय दस्यु ते जाण.
कोण भयाची वल्ली? शिष्या! तृष्णाचि; रे! तुझी आण. ११
स्वामी! वैरी कोण? च्छात्रा! तो शत्रु जो अनुद्योग.
ज्या उद्योगाभावें पावति विलयासि सर्व सुखभोग. १२
स्वामी! कोणापासुनि भय लोकीं फार पावती प्राणी?
शिष्या! मरणापासुनि भय पावति सर्व, ही खरी वाणी. १३
स्वामी! कर्णांजलिंनीं सेवाया काय हो सुधे सारें,
शिष्या! पीयूषाहुनि फार सदुपदेशभाषणें सारें. १४
दारिद्र्य कोण सांगा; बहु पुसतों कीं, तुह्मां नसे रोष.
शिष्या! बरवें पुशिलें. दरिद्रपण तेंचि जो असंतोष. १५
लघुता कोण स्वामी! पुसतों हें संशयाब्धिसेतूतें.
याञ्चा लघुत्वकारण हें कैसें ठाउकें नसे तूतें? १६
जीवित तें कोण वदा, भक्तभ्रमराचिया सदरविंदा!
वत्सा! तेंचि जिणें रे! ज्याची जाली नसे जगीं निंदा. १७

शारदशशिकिरणासम आल्हादक कोण सांग गुरुवर्या !
शिष्या! ऐसे सज्जन; ज्यांची हरिती त्रिताप परिचर्या. १८
स्वामी ! कोण सुदुःसह सर्वां नरकांपरीसही नरक ?
परवशताचि निरय हें जाणुनि तूं संग सोडुनी सरक. १९
मित्र कवण हें सांगा, संशय न तुह्मांविना दुजा छेदी.
तो मित्र होय बापा! पापाचारांत जो बुडों नेदी. २०
कोण अलंकार ? गुरो ! सांगाया योग्य तूंचि होशील.
शिष्या ! जरि हें पुससी तरि भूषण मुख्य आपुलें शील. २१
गुरुराया ! वाचेचें मंडन जें तें असो मला विदित.
वाग्भूषण सत्याचि हें शिष्या ! जाणूनि नित्य हो मुदित. २२
स्वामी ! गुरो ! दयाब्धे ! सर्वांला कोण ती सदा सुखदा ?
शिष्या ! सज्जनमैत्री जीणें स्तविताति सर्व लोक पदा. २३
स्वामी ! अंध ह्मणावा कोण ? च्छात्रा ! अकार्यरत हो ! तो,
कोण बधिर ? गुरुवर्या! हितवचनातें न आयके जो तो. २४
गुरुजी ! मरण कवण हें सांगुनि मजला निवृत्ति द्या विपुला.
बाळा! मूर्खत्वचि रे निधन महा, तें नसो नसो रिपुला ! २५
शल्य असे कोण ? गुरो ! मरणापर्यंत ज्यामुळें ताप.
तें शल्य, नेत्र झांकुनि केलें असतें सुगुप्त जें पाप. २६
पूज्य हि कोण ? स्वामी ! हें उपदेशा कृपा करूनि मला.
तो पूज्य वृत्त ज्याचें निर्मळ, निष्काम; तो प्रशांत मला. २७
कोण ह्मणावा अधम ? स्वामी ! सांगा करीन मी श्रवण.
जो सद्वृत्तापासुनि चळला त्याहूनि नीच तो कवण ? २८

नित्य रहावें कोठें? सांगा, जी! शिष्यमानसा धाया,
न्यायपथीं वस वत्सा! दृष्टादृष्टार्थलाभ साधाया. २९
ज्वरितासि शर्करा जसि कटु होय खळांसि सुरस ही कविता;
शिष्टां पद्मां सुख दे, दुष्टां घूकांसि ताप दे सविता. ३०

प्रश्नोत्तररत्नमाला.

---

# अन्योक्तिकलाप.

## श्लोक.

भृंगे गुंजारवातें करिति शिरिं असे मत्त हत्तीहि जीतें,
डोळां देखोनि होते पळत भयभरें सोडुनीयां धृतीतें;
जेथें मुक्ताफळांचा खच बहु पडला, त्या गुहेमाजिं आतां
सिंहाच्या क्षुद्र कोल्हे कलकल करिती मृत्युनें त्यासि नेतां! १
गेला लोकांतरातें दिनकर सकला द्योतवी जो जगातें,
अस्तातें जाय तोही हिमकिरण जया सौख्यदा विश्व गातें;
मेघांनीं व्याप्त ऐशा गगनिं नच दिसे एक ताराहि कोठें,
रे खद्योता! अतां तूं चमक बहु, तुझें दैव, बा, फार मोठें २
कोकां शोकास त्यांच्या शमवुनि दयितासंगमें हर्षवी जो;
कारागारें करांहीं उघडुनि कमलें भृंगही सोडवी जो;
जेणें अंधार सारा पळवुनि हरिलें सृष्टिच्या दृष्टिदोषा,
त्या मित्राचा बघूनी उदय कवण तो चित्तिं मानी न तोषा? ३

होता जोंवरि अंबरीं तपत तो चंडांशु तेजें निजें,
  झाला निष्प्रभ तारकाधिपतिही बोला कशाला दुजें ?
राहूच्या वदनीं अजीं गवसतां तो भानु दैवें अहा !
  कैसे क्षुद्रहि काजवे चमकती त्याच्यापुढें हे पहा ! ४
नक्षत्रें परिवार ज्याम, पतिही जो औषधींचा असे,
  ज्यातें पाहुनि हर्षती जन, सुधा ज्याच्या शरीरीं वसे;
होई तेज कमी तयाहि विधुचें येतां रवीच्या गृहीं,
  ज्या येई लघुता न अन्यसदनीं, ऐसा न कोणीचही. ५
ज्याचे पूर्वीं वसंतीं परिमलबहलीं आम्रवृक्षीं सुखाचे
  गेले गुंजारवातें दिवस परिसतां मत्तभृंगांगनांचे;
कैसे त्या कोकिलातें अधम करिति हे कावळे चंचुघाता !
  कोठें थारा मिळेना गरिब पळतसे वांकडा काळ येतां ! ६
मेघांच्या गर्जनेनें खवळुनि वरतीं सिंह पाही स्वभावें,
  काका! त्वां भीति सारी त्यजुनि तरुवरीं मांसखंडास खावें.
जो उन्मत्ता गजांच्या खरतरनखरीं फोडुनी मस्तकांतें
  धाला रक्ता पिऊनी, नच मृतपशुंच्या इच्छितो तो कणांतें. ७
गर्वें पर्वतमस्तकीं, जलधरा ! धारा वृथा वर्षसी,
  पीडा कष्ट करूनि नाविकजनां दुष्टापरी हर्षसी;
पाण्यावीण लता तरू सुकति हे, वृष्टी जरी यांवरी,
  रे मेघा ! करतास, कीर्ति भुवनीं होती तुझी, बा, खरी. ८
    थरकति अरविंदें मंदवातें, तयांचे
      रज उडुनि सुगंधी रंगवी अंग ज्याचें;

विपुल मृदु मृणालें भक्षिलीं स्वस्थ जेणें,
अणुभरहि कधीं जो स्वप्निंही दुःख नेणें; ९
उडत उडत जातां हंस तो मानसींचा
मरुजनपद मार्गीं लागला त्यास साचा;
सरस कमलतंतू राहिले दूर भारी,
श्रम करुनि मिळेना बापड्या कूपवारी! १०
पानांमाजीं तरूच्या लपुनि बस कुठें, राजहंसा ! कसाही,
जाती वर्षर्तुचे हे दिवस तंववरी सर्व कष्टांस साहीं;
येऊनी शारदश्री पुनरपि फुलतां पद्मवृंदें तयांचा
भोक्ता नाहीं कुणीही तुजविण दुसरा, जाण हा नेम साचा. ११
ज्याच्या तीरीं समंतान्मधुरफलभरें वांकले वृक्ष भारी,
ज्यामाजीं पद्मखंडें फुलुनि विखरती गंध चित्तापहारी;
त्या जेणें मानसातें त्यजुनि वरियलें पंकिला पल्वलातें,
त्या हंसाच्या बकांनीं जरि पद दिधलें मस्तकीं, योग्य त्या तें. १२
पुष्पांहीं पल्लवांहीं विविधतरुवरां सर्वदा भूषवी जो,
नाना धान्यें फळें ही पिकवुनि सुखवी प्राणिमात्रा सदा जो;
हर्षें पाहूनि ज्यातें जग, धरिशि मनीं त्रास त्या अंबुदाचा,
हंसा! वर्णें जरी तूं धवल, तरि गुणें कृष्ण आहेस साचा. १३
विजा चमकती न जों नभिं, न मेघ जों वर्षती,
जलाशय सरोवरें कलुषता न जों पावती,
प्रफुल्ल नवपंकजीं कमलिनीवनीं तोंवरी
विलास, कलहंसका ! सकलही मनींचे करीं. १४

आंबे चंदन चंपकादिक तरू सारेच का वाळले ?
पद्मांनीं भरले जलाशय लया कीं सर्वही पावले ?
झालीं निर्मद आणि शुष्क करिंचीं कीं सांग गंडस्थलें ?
रे मूढा भ्रमरा ! करीरकुसुम त्वां आज जें चाखलें ! १९

पद्यरत्नावली.

---

## गर्व व काळ.

### श्लोक.

बुद्धि द्रव्य कुल प्रताप पदवी प्रौढी वृथा सर्वदा,
येतां तो प्रतिकूळ काळ ढळवी अभ्रंकषां पर्वतां;
ऐश्वर्यद्रविणोपभोग अवघे आहेत हे बुद्बुद,
मृत्यूचा अगदीं समीप निवसे नक्तंदिनीं जासुद. १

पाहे मृत्यु न रंक राव, अथवा दारिद्र्य वा वैभव.
येतां काळ तया निवारिल असा कोणी नसे मानव.
मृत्यूची अनिवार्य चाल जगतीं, ती कोणता आडवी ?
तो दण्डध्वजचामरादि निमिषें धूळीमधें पाडवी ! २

कोणी धीर गभीर वीर अपणा युद्धांत नांवाजवी,
खड्गातें परजोनि जो अरिमुखीं दंतावळी वाजवी;
त्याचेंही पारि चंड दंडयुग तें निस्त्राण होतें लुलें,
काळाचीं थरकांपकारक यदा तीं वाजती पाउलें. ३

संमानें जन आदरून तुमची गाती स्तुती संप्रती,
सत्कृत्यास्तव भूषवून तुमच्या माळा गळां घालिती;
कोमेजे पारि माळ, काळवश हो! आहांत सारेजण,
कर्तव्यास करा, परि मिरविणें हें व्यर्थ मोठेपण. ४
ज्यांची सत्कृति, शौर्य, दान, सुमति प्रख्यात होती जनीं,
त्यांची विस्मृति आज हाय! पडली लोकां, स्मरा हें मनीं,
कालोपद्रुत विश्व सर्व, मग हीं गर्व, प्रसिद्धी, यश
कोठें होत निरूढ? मूढ मनुजा! होईं न आशावश. ५

काव्यरत्नावली.

---

## सज्जनांची थोरवी.

### श्लोक.

भारी तीव्र पळांत भस्म करितें जें काळकूट क्षिती;
त्यातें प्राशुनियां सुरांस सुख दे अत्यंत गौरीपती.
नीलग्रीवहि जाहला तरि नसे त्या दुःख, कीं सज्जनां
स्वार्थीं प्रीति नसे, परार्थचि रुचे अत्यादरें तन्मना. १
दैत्यीं गांजियलें ह्मणून धरणी जेव्हां पडे संकटीं,
तैं धांवे प्रभु कूर्मरूप धरुनी, दे पाठ तीखालतीं;
होतो भार अपार अल्प अथवा हें नाठवे; सज्जनां
स्वार्थीं प्रीति नसे, परार्थचि रुचे अत्यादरें तन्मना. २

सारीं लख्ख करी प्रकाशुनि मही जो चंद्रमा तो स्वतां,
देहाचा न पुशी कलंक गमतें आश्चर्य हें तत्वतां.
याच्या ह्या कृतिमाजिं अर्थ दिसतो हा स्पष्ट कीं सज्जनां
स्वार्थीं प्रीति नसे, परार्थचि रुचे अत्यादरें तन्मना. ३
अग्नीचें उदकासवें सततचें ठावें जना वैर जें,
तें सोडी उदरांत वाडव धराया अब्धि केवीं सजे?
वाटे हा मथितार्थ यांतिल असे, कीं सत्कृती सज्जनां
स्वार्थीं प्रीति नसे, परार्थचि रुचे अत्यादरें तन्मना. ४
पृथ्वीचा गुरुभार शेष शिरिं घे आधार होई तिला,
जाणेना पळमात्र नित्य करितां हें कार्य विश्रांतिला;
साही हे श्रम, दुःख अल्प न गणी; हें सार कीं सज्जांन
स्वार्थीं प्रीति नसे, परार्थचि रुचे अत्यादरें तन्मना. ५
आहे ज्यास सुवास फार ह्मणुनी जो आवडे हो नरां
सत्कारी सुजनां तसाचि भुजगां दुष्टांहि जो आसरा;
ऐसा चंदन दे सुगंध झिजुनी स्वांगें सदा; सज्जनां
स्वार्थीं प्रीति नसे, परार्थाचि रुचे अत्यादरें तन्मना. ६
वाजी सप्तमुखी विलक्षण असे, तो पांगुळा सारथी,
तैसाची रथ एकचक्र, फिरणेंही अंबरीं ज्याप्रती;
तो भानू ढळला न हो ! परहिता अद्यापिही, सज्जनां
स्वार्थीं प्रीति नसे, परार्थचि रुचे अत्यादरें तन्मना. ७
ज्याचा देह असे रसेंचि भरला त्या इक्षुदंडा किती,
घाणा घालिति गाळिती दुखविती लोभें छळीती अती;

पाळी त्यापरि गाळित्यासहि तरी देई रसा, सज्जनां
स्वार्थीं प्रीति नसे, परार्थचि रुचे अत्यादरें तन्मना. ८
देती वृक्ष फळें, सदैव दुभती धेनू किती ह्या अहा !
पृथ्वी सर्व चराचरां शिरिं धरी साहूनि भारा महा,
हा साराच परार्थ न स्वहित हें शोधा मनीं. सज्जनां
स्वार्थीं प्रीति नसे, परार्थचि रुचे अत्यादरें तन्मना. ९
श्रीव्यासादिमहर्षिनीं मथुनियां वेदोदधी काढिला
साचा बोधसुधारस प्रचुर तो प्रेमें जनां वाढिला.
" संसाराब्धि तरावया वद मुखें श्रीराम बापा ! सदा
साधीं होइल तेवढ्या परहिता, " जाशील तूं सत्पदा. १०

काव्यरत्नावली.

---

## पर्वतप्रदेशांतून गंगेची गति.

### श्लोक.

ज्या ज्या अनेकविध योग्य शिशुस्थितीला
आनंददायक अतीव मनोज्ञलीला,
त्या त्या समस्त हिमभूधरराजकन्या
दावून हे निववितेे नयनांस धन्या. १
कोठें तिचें सलिल निश्चल शांत चाले,
कोठें झळाळत झराझर फार हाले;

कोठें फुगे बहु; सवें उतरेहि कोठें;
कोठें प्रसन्न दिसतें; मलदुष्ट कोठें. २

कोठें शिळा अढळतां पथिं तीसभोंतें
तें भोंवऱ्यापरि गरागर खाय गोते;
कोठें सवेग उसळे; खवळेहि कोठें;
कोठें तरंग उठती, जिरतीहि कोठें. ३

कोठें विभिन्न जल होय सहस्त्रधा कीं;
कोठें कड्यावरूनि उंच उड्याहि टाकी;
कोठें अपाप जल तें थडकून राहे,
कोठें प्रचंडतर शब्द करीत वाहे. ४

कोठें असे सखल; फार गभीर कोठें;
कोठें अरुंद बहु; रुंदहि फार कोठें;
कोठें प्रचंड खडकावरि फार वेगें
तें हापटून जळ तूर्ण फिरेहि मागें. ५

या रीतिच्या रुचिर चित्तविनोदि लीला
नानापरी करित, हे बहु पुण्यशीला.
खालीं पुढें द्रुत वहात वहात धन्या
गंगोत्रिच्या निकट ये तुहिनाद्रिकन्या. ६

गंगावर्णना.

# कृष्ण व द्रौपदी यांचा संवाद.

## आर्या.

श्रीकृष्णा श्रीकृष्णा दावुनि खलपाणिकृष्ट केश वदे,
उक्तिकडे मन दे परि नयन तदास्याकडे न केशव दे. १
"हे केश धरुनि ओढुनि नेलें दुःशासनें सभेस सख्या !
तेव्हां मज आठवली त्वत्पदयुगुली सखी; न अन्य सख्या. २
इणेंचि राखिली बा लज्जा उघडी पडों दिली न सती,
यदुकुलकीर्ति न उरती जरि मज हे ठाउकी किली नसती. ३
होते समीप पांचहि पति अतिमति हे मनें उदासीनें,
म्यां व्यसन साहिलें तें न असेल विलोकिलें कुदासीनें. ४
सोडी पुनःपुन्हां खळ न धरुनि लज्जा भया दया लुगड्या,
उघडें पडतें वपु तरि तूं अंतरतासि बा दयालु गड्या! ५
यांचीं शस्त्रें अस्त्रें दोर्दण्डबळें खळें वृथा केलीं,
धिक् कष्ट! सर्व यशें सुज्ञानें एकदा लया गेलीं! " ६
ऐसें वदोनि रडतां, कृष्ण ह्मणे, " अम्ब! तूं नकोचि रडों,
कळवळतें मन्मन सखि! या शोकाचलभरें नको चिरडों. ७
सखि! अखिलसतीपूज्ये! मद्धैर्य तवाश्रुबिंदुसह गळतें,
केवळ तुझेंचि न वदन अमृतद्युति गौर यशहि तव मळतें. ८
तुज गांजिलें जिहीं त्यां, ज्यांत यशोनाश अंगनाश तशा,
वरितील दशा, त्यांच्या शोकें रडतील अंगना शतशा. ९
असती अशीच धर्मीं चित्तीं माझा धरूनि बोल टिकें
झालें कधींच न मृषा होईल मदुक्त काय हो लटिकें? १०

होईल मद्वच मृषा केव्हां तरि वारिराशि आटेल,
ग्रहगण गळेल हिमगिरिराज खचेल क्षितीहि फाटेल. ” ११

वनपर्व.

---

## उत्तमगुणसंकीर्तन.

### ओंव्या.

विचारेंवीण बोलूं नये, मर्यादेवीण हालूं नये,
विवेचनेवीण चालूं नये, कांहीं केल्या. १
जनीं आर्जव तोडूं नये, पापद्रव्य जोडूं नये,
पुण्यमार्ग सोडूं नये, कदाकाळीं. २
अतिक्रोध करूं नये, जिवलगासि खेदूं नये,
मनीं वीट मानूं नये, शिकवणीचा. ३
क्षणक्षणा रुसूं नये, लटिका पुरुषार्थ बोलूं नये,
केल्यावीण सांगू नये, आपुला पराक्रम. ४
बोलिला बोल विसरूं नये, प्रसंगीं सामर्थ्य चुकूं नये,
केल्यावीण निखंदूं नये, पुढिलांसी कदा. ५
आळसें सुख मानूं नये, चहाडी मनासी आणूं नये,
शोधिल्याविण करूं नये, कार्य कांहीं. ६
सुखा अंग देऊं नये, प्रयत्न पुरुषें सांडूं नये,
कष्ट करितां त्रासूं नये, निरंतर. ७

सभेमध्यें लाजूं नये, बाष्कळपणें बोलूं नये,
पैज होड घालूं नये, कांहीं केल्या. ८

कोणाचा उपकार घेऊं नये, घेतला तरी राखूं नये,
परपीडा करूं नये, विश्वासघात. ९

व्यापकपण सोडूं नये, पराधीन होऊं नये,
आपलें ओझें घालूं नये, कोणा एकासी. १०

तोंडीं शिवी असूं नये, दुसऱ्यासी देखुनी हंसूं नये,
उणें अंगीं संचरूं नये, कुळवंताचे. ११

आपुल्याची ग्वाही देऊं नये, आपुली कीर्ति वर्णूं नये,
आपुले आपण हांसूं नये, गोष्टी सांगोनी. १२

अल्पधनें माजूं नये, हरिभक्तीसी लाजूं नये,
मर्यादेवीण चालूं नये, पवित्र जनीं. १३

मूर्खाशीं संबंध पाडूं नये, अंधारीं हात घालूं नये,
दुश्चितपणें विसरूं नये, वस्तु आपली. १४

सत्य मार्ग सांडूं नये, असत्यपंथें जाऊं नये,
कदा अभिमान घेऊं नये, असत्याचा. १५

अपकीर्ति सांडावी, सत्कीर्ति वाढवावी,
विवेकें दृढ धरावी, वाट सत्याची. १६

दासबोध.

१९

# विश्वामित्राच्या आश्रमाचें वर्णन.

## ओंव्या.

वनश्री वर्णावी कवणें, उपमे नंदनवन उणें,
नाना वृक्षीं फलें सुमनें, सरसुवासें दाटलीं. १
एक सरल शाखाविहीन, एक ते शाखामंडित पूर्ण,
तया ग्रीवालतिका वेष्टन, करून जाती सुरवाडें. २
कर्पूर कर्दळी नारिकेली, चूतवृक्ष लवले फळीं,
कंटकी फळांची नऱ्हाळी, लागली मुळीं असंख्य. ३
द्राक्षीमंडपातळीं दाट, वाहती अमृतरसाचे पाट,
फणसफळें त्यागोनि देंट, दाविती वाट सिंधूची. ४
जाई जुई चंपक मालती, बकुल मोगरे कांचन शेवती,
केतकीवनें घमघमती, पराग क्षिती सुगंध. ५
अगरचंदन देवदारू, हरिचंदन मैलागरू,
वृक्ष वेष्टित विषधरू, भूतें जैशीं निधाना. ६
न्यग्रोध पालाश पिप्पलतरू, जे देवत्रयाचे अवतारू,
बिल्व तुळसी हरिहरू, ज्यांचे पत्रें तोषती. ७
प्रवेश करितां तये वनीं, राजा आश्चर्य देखे नयनीं,
धेनु व्याघ्र एके स्थानीं, एकमेकां चाटिती. ८
नकुळ सर्प क्रीडती सुखें, मार्जारीस्तना लागती मूषकें,
सिंह करिण करिती कौतुकें, वनामाजीं विचरती. ९

उलूका निरवूनि पिलियांसी, वायस जाती चारियासी,
विश्वामित्रमाया ऐशी, सहसा न कळे मानवा. १०

वनपर्व.

---

## बोधवचनें.

### श्लोक.

ब्राह्मीं मुहूर्तीं पुरुषें उठावें, आलस्य वेगें सगळें त्यजावें;
विकासतें पंकज जें प्रभातीं, गुणाश्रया श्री वरिते तया तीं. १
आली जरी कष्टदशा अपार, धर्माप्रती न त्यजिती उदार;
चांडालदास्यास जरीहि जोडी, तरी हरिश्चंद्र न धर्म सोडी. २
करून सत्यव्रतभंग कार्य, साधावया योग्य नसेचि आर्य;
युधिष्ठिरानें व्रत मोडियेलें, स्वर्गीं तया बाधक तेंचि झालें. ३
सत्संग तो मात्र सदा धरावा, कुसंगतीचा न विटाळ व्हावा;
बिभीषणें राघवसंगतीनें, लंकाधिपत्या वरिलें सुखानें. ४
धर्मा वरीं, दंभ समूळ टाकीं, दंभें न लाधे फळ सत्य लोकीं;
शस्त्रास्त्रविद्या जरि कर्ण घेतो, ब्राह्मण्यदंभें तिजला मुके तो. ५
गुणाप्रती आदर मान द्यावा, न जातिचा भेद बुधें पहावा;
द्रौणी वरी विप्रहि शूद्रतेला, तो शूद्र जाणे विदुर क्षमेला. ६
विद्या मिळावी जरि आपणांस, टाकून उद्वेग भजें गुरूस;
शुक्रास सेवी कच, कष्ट सोशी, संजीविनीलाभ घडे तयासी. ७
बलिष्ठ त्यानेंहि मनीं धरावें, कीं अल्पवीर्या न अनादरावें.
जो क्षत्रियाला रिपु राम झाला, जिंकी रणीं दाशरथी तयाला. ८

जो सर्वदा न्यायपथांत वागे, अल्पेंहि दोषें अघ त्यास लागे.
मारावया वालिस बाण ओढी, श्रीराम, तत्कीर्ति कलंक जोडी. ९
हितोपदेशाप्रति आयकावें, यथोचिताला मग आचरावें;
सुयोधनानें विदुरोक्त केलें, न तेधवां दुःख तयासि झालें. १०
गोडी असे शत्रुहितीं जयाला, ध्यावें न कार्यीं मदतीस त्याला;
तेजोवधें सारथि शल्य मानीं, कर्णप्रतापास उणीव आणी. ११
परोपकारास सदा करावें, संसारिं हें सार मनीं धरावें;
धरून बुद्धें अवतार लोकीं, हें तत्त्व लोकां समजाविलें कीं. १२
करून कृत्यें बरवीं जगांत, राहे बहू काळ यशें जिवंत;
धर्मादि सोडून यशस्तनू कीं, आहेत अद्यापि जिवंत लोकीं. १३

चारुचर्या.

---

## अशोकवृक्षास पाहून सुचलेले विचार.

### श्लोक.

वृक्षा! तुला पाहुनि या प्रसंगीं, विचार येती बहु अंतरंगीं,
आहेत सृष्टींत तरू अपार, तयांत तूं केवळ एक थोर. १
छाया तुझी शीतल सांद्र भारी, पुष्पें तुझीं लोचनसौख्यकारी,
देतों तुला मी ह्मणुनी न मान, तूं मूकरामायण सत्य जाण. २
लंकापती रावण मत्त झाला, नीती अनीती समजे न त्याला,
तयार झाला कुल संहराया, बळें पराची पळवून जाया. ३
साध्वी सुशीला सुकुमार सीता, सोडूनि सद्मीं रघुवीर जातां,
आणावया हेममृगा धरूनी, ने जानकीतें खळ तो हरूनी. ४

आणूनी ठेवी मग तीस मच्च, वृक्षा तुझ्या प्रेमळ संगतींत,
हा मर्मभेदी इतिहास चित्ता, स्मरे तुला, वृक्षवरा! पहातां. ५
स्वनाथपादांबुजचित्तलग्ना, एकाकिनी शोकसरोनिमग्ना,
सीता सती कंठित काळ होती, वृक्षा! तुझी फार सहानुभूती. ६
टाकूनि हर्षें कलिकांस खालीं, त्वां जानकीची जपमाळ केली,
तीतें करीं घेउनि दीनरामा, रामा जपे संतमनोभिरामा. ७
होतां श्रमें विव्हळ गात्रयष्टी, केली तुवां कोमलपुष्पवृष्टी,
शय्या सतीला दिधली रचून, परोपकारीं अससी निमग्न. ८
अशा रितीनें बहुकाळ लोटे, सीता रडे नाथ परी न भेटे,
उल्लंघुनी दुस्तर सागराला, ये राम तो सांगत दूत आला. ९
विध्वंसुनी दुष्ट दशाननाला, भेटे अयोध्यापति जानकीला,
करी तिला शांतवुनी अशोका, त्वन्नाम हो सार्थ खरें अशोका! १०
लंका जधीं सोडुनि जाय सीता, मनीं तिच्या जो अनुराग होता,
तुझ्यावरी ठेवुनि सर्व गेली, पुष्पें जणूं लाल ह्मणूनि झालीं! ११
प्रचंड झाला रघुरावणाचा, संग्राम विख्यात जगांत साचा,
रचूनि रामायण वाल्मिकीनें, वर्णीयला तो वदती पुराणें. १२
गेलीं पुराणें सगळीं लयाला, रामायणाचा जरि नाश झाला,
स्मरेल ती वीरकथा अशोका! त्वद्दर्शनें केवळ सर्व लोकां. १३

काव्यरत्नावलि.

# देवापाशीं मागणें.

## अभंग.

हेंचि देवासी मागत, चरणसेवा अखंडित. १
वास द्यावा पंढरीचा, सदा संग हरिदासांचा. २
नामा ह्मणे कमलापती! हेंचि द्यावें पुढतां पुढतीं. ३

काय माझा आतां पाहतोसी अंत, येई बा धांवत देवराया! १
तुजविणें माझ्या जिवा होईल आकांत, येई बा धांवत देवराया! २
असे जरी काम भेटोनियां जावें, धांवोनिया यावें देवराया! ३
ये रे ये रे देवा! नामा तुज बाहत, येई बा धांवत देवराया! ४

देह जावो अथवा राहो, पांडुरंगीं माझा भावो. १
चरण न सोडीं सर्वथा, आण तुझी पंढरिनाथा ! २
वदनीं तुझें मंगळ नाम, हृदयीं अखंडित प्रेम. ३
नामा ह्मणे केशवराजा ! केला पण चालवीं माझा. ४

माझी कोण गती सांगा पंढरिनाथा, तारीसी अनाथा केव्हां मज? १
मनापासूनीया सांगा मजप्रति, पुसे काकूळती जिवाचीया. २
न बोलसी कां रे धरीला अबोला, कोणासी, विठ्ठला ! शरण जाऊं? ३
कोणांसी सांकडें घलावें हें सांग, नको धरूं राग दीनावरी. ४
बाळकासी जैसी एकचित्तें माय, तैसे तुझे पाय मजलागीं. ५
नामा ह्मणे, देवा! अनाथाच्या नाथा कृपाळूवा कांता रखुमाईच्या. ६

किती देवा, तुह्मां येऊं काकूळती, काय या संचितीं लिहिलें माझ्या? १
काय माझी सांड केली हृषीकेशी, आह्मीं कोणापाशीं तोंड वासों? २
ब्रीदाचा तोडर गर्जे त्रिभुवनीं, तूंचि एक धणी त्रैलोक्याचा. ३
समूळ घेतला पृथिवीचा भार, माझाचि जोंजार काय तुला? ४
नको पाहूं अंत पांडुरंगे ! आई, नामा हरीपाईं घाली मिठी. ५

नामदेवाची गाथा.

---

## सुभाषितमाला.

### श्लोक.

घोडे कधीं न खळती रविच्या रथाचे,
उल्लंघितो पवन भाग सदा नभाचे;
भूभार शेष धरि संतत मस्तकांहीं,
राजा सविश्रम तसा क्षणमात्र नाहीं. १
एकीकडेस विधु अस्तगिरीस जातो,
एकीकडे रवि पहा उदयासि येतो.
तेजस्वियांसहि लयाभ्युदयादि होती
लोकस्थिती अशिच हें जणुं सूचवीती ! २
लब्धार्थ शांत करि उत्सुकता मनाची,
चिंता मनांत उभवी परिपालनाची.
देतें नृपास सुखदुःखहि राज्य तैसें
छायार्थ छत्र धरिलें स्वकरांत जैसें. ३

तरुवर सुफलांच्या आगमीं नम्र होती,
जलदहि जलभारें खालती शीघ्र येती;
सुपुरुष विनयातें भाग्यकालीं धरीती
उपकृतिकरित्यांची जाणिजे हेचि रीती. ४
ज्यांच्या मुखीं दिसति कोमलदंतपंक्ति,
जे बोबडे मधुर शब्दहि बोलताती;
अंकीं असे तनय घेउनि खेळवीती
ते पुण्यवंत नर धन्य जगांत होती. ५
कष्टें जना कुलधनें अनुरंजवावें,
जें मी दुरुक्त वदलों तुज तें नसावें.
जें नित्य सुंदर सुगंधि शिरीं धरावें
तें पुष्प काय चतुरें चरणें चुरावें ? ६
सदा प्रीती चित्तीं, विनयमधुरा वाणिहि सदा,
स्वभावें कल्याणी मति परिचया भेद न कदा;
पुढें किंवा मागें मनिं रसविपर्यास नसती,
रहस्यें साधूंचीं अकपट विशुद्धेंच असती. ७
गुरू विद्या प्राज्ञा जशि तशिच अज्ञाहि वितरी,
तयांची धीशक्ती अधिक अथवा न्यून न करी;
तथापी दोघांच्या बहुतचि फलीं भेद दिसतो,
जसा बिंबग्राही शुचि मणि तसा लोष्ट नसतो. ८
प्रसवति बहुकामां, घालवी दुर्दशेसी,
उपजवुनि सुकीर्ती दुष्कृतातें विनाशी;

सतत सदय माता मंगलाचीच मानूं,
सुकवि वदति वाचा सूनृता कामधेनू.
पदार्थांच्या योगाप्रति किमपि अभ्यन्तरिं वसे,
निमित्त प्रीतीला उघड उपधी कारण नसे;
प्रकाशीं भानूच्या कमल उमले वासहि सुटे,
विधूच्या पाषाणा उदयिं विधुच्या पाझर फुटे.
न तेजस्वी साहे प्रकटपरतेजोबलमदा,
जयाचा जो आहे प्रकृतिगुण लोपे नच कदा;
मयूखांनीं जेव्हां प्रखरतर चण्डांशु तपतो,
रविग्रावा तेव्हां अनलसम तेजास वमतो.

भोगूनि दुःखें सुख शोभते जनीं,
घनान्धकारांत दिवा जसा वनीं;
सुखापुढें होय दरिद्रता नरा,
असोनि देहीं मृततुल्य तो खरा.

चिंतेचें घर हेंच वैर दुसरें लोकांत होतें सदा,
निंदा मित्रजनांत कारण निजद्वेषास हें सर्वदा;
जाया बुद्धि वनास देह सहसा, जाया सदा लाजवी,
शोकाग्नी हृदयस्थ हा परि तनू जाळी न संतापवी.

उत्कंठितासि हृदयानुगुणा प्रिया हे,
जायास वेळ सहजांत विनोद आहे;
चित्तास शांत करण्याविषयीं प्रवीणा,
वाद्यांत वाद्य सुखदायक हेच वीणा.

शाखा सद्गुण, पालवी विनयही, विश्रंभ मूळें, दया
छाया, स्वाचरण प्रकांड, फुललीं चारित्रपुष्पें जया;
सत्कारोपकृती फळें, रस सुधातुल्या गिरा वाहती,
ऐशा सज्जनपादपावरि सुहृत्पक्षी सुखें राहती. १५
जनामधें जो धनहीन झाला,
असोनिही जीवित काय त्याला ?
कोपास ज्याच्या फळ येत नाहीं,
तैसें प्रसादासहि ये न कांहीं. १६

**आर्या.**

सत्पक्षरहित पक्षी, शुष्क तरू कीं तडाग जळहीन,
दंष्ट्राहीन भुजंगम तैसा धनहीन होय नर दीन. १७
भीतास अभय देता आणि रसिक जो परोपकाराचा,
जरि होय नाश त्याचा लोकीं तो गुणचि त्या उदाराचा. १८

**श्लोक.**

धर्मसंग्रहिं सदा तुह्मि भागा, ध्यानदुंदुभिरवासह जागा;
इंद्रियें विषम चोरचि येती, धर्मवित्त चिरसंचित नेती! १९
अशरणा शरणप्रद हे तरू, असुखिता सुखहेतु जसे गुरू;
नगर सोडुनि राहति हे वनीं, तरि खरे उपकारक या जनीं. २०
क्रोधानें निजदोष झांकुनि परा मोहामधें पाडिती,
येती न्यायसभेंत साधुहि तरी साधुत्व ते सोडिती;
बोलायास सभेंत कल्पितवचें चित्तांत भीती नसे,
द्रष्ट्याचा गुण तो सुदूरचि वसे, दोषोक्ति सोपी असे. २१

आर्या.

दुर्बळ चक्षु नृपतिचें शक्त न तें तत्त्वदर्शनीं जेथें,
वक्त्यास दैन्य केवळ किंवा अश्लाघ्य मरण वा तेथें. २२

श्लोक.

होतां विकास पहिल्या समयीं फुलातें,
येती जसे मधुप सार लुटावयातें;
दैवेंचि होय पुरुषास विपत्ति जेव्हां,
पाहूनि छिद्र बहु येति अनर्थ तेव्हां. २३

शाकुंतल, उत्तररामचरित आणि मृच्छकटिक.

---

## वैराग्यवचनें.

श्लोक.

अभिज्ञांस तों ग्रासिलें मत्सरानें, धनाढ्य प्रभू व्यापिले दुर्मदानें;
शिरीं थोर मूर्खांस अज्ञान ओझें, जिरालें निजांगींच पांडित्य माझें. १
कांहीं द्रव्य असेल कीं उकरिली म्यां या श्रमें ही मही;
राजेही बहु सेविलेचि; गिरिचे म्यां जाळिले धातुही;
रात्रीं मंत्रजपें श्मशान धरिलें; पाथोधि उल्लंघिला;
झाली प्राप्त कपर्दिका न मज तों; सोडीं दुराशे! मला. २
म्यां साहिली खलजनोक्ति कठोर पां ही;
पोटांत दुःख वरिचेवरि हांसलोंही;
कीं प्रार्थिलें स्वजठरार्थ मदांधलोकां;
आशे! अशीच मज नाचविसी किती कां? ३

दिसे ज्या प्राणांची स्थिति जलजपत्रोदक जसें,
तयांसाठीं केलें विविध बहु म्यां पातक असें;
पुढें द्रव्याढ्यांच्या प्रचुरधनलोभास्तव वृथा,
विलज्जें म्यां केली बहुतर मृषात्मस्तुतिकथा. ४
वदना रदनावलिनें त्यजिलें, शिर सर्वहि शुभ्रपणें पिकलें,
उठतां बसतां अणु शक्ति नसे, परि आस निरंतर गाजतसे. ५
आशा थोर नदी, मनोरथ तिचें पानीय, वीची तृषा,
स्त्रीपुत्राद्यनुराग हीं जलचरें जे पूर्ण कूलंकषा,
संसारभ्रम भोंवरा गरगरी, चिंताच जीचीं तटें,
तीतें जे तरले मुनीश, न कधीं ते पावती संकटें. ६
गंगेनें स्वतरंगसुंदरकणीं जीं भोंवतीं शिंपिलीं,
जीं का चारुशिलातलीं बसुनिया विद्याधरीं सेविलीं,
स्थानें काय हिमाद्रिचीं क्षयदशा तीं सर्वही पावलीं ?
कीं पोटें अपमानपूर्वक नरीं अन्यालयीं पोशिलीं ? ७
ते कंद काय अवघेचि गळोनि गेले ?
किंवा प्रवाह नदिचे अतिशुष्क झाले ?
कीं वाण आजि विपिनीं तरुवल्कलांची ?
कां पाहताति वदनें न कळे खळांचीं ? ८
होती वासर दीर्घ जे धनपतिद्वारीं तयां प्रार्थितां,
नानासौख्यभरें क्षणोपम मला जे लोटले नेणतां,
निःसंगत्वपणें धरूनि बसलों हे पर्वताची गुहा,
आतां त्या दिवसांसि हांसत असें ध्यानावसानीं पहा ! ९

गेला तो नृप, ते प्रधान अवघे, ते पंडितांची सभा,
गेली ते नगरी, तशा शशिमुखी ज्या तप्तहेमप्रभा,
गेला तो नृपपुत्र, त्या शुभकथा, म्यां देखिलें सर्व जें,
तें जेणें स्मरणास योग्य रचिलें, कालासि त्या वंदिजे. १०

गतीनें सूर्याच्या पळपळपणें माप भरतें,
नसे व्यासंगानें दिवसरजनीज्ञान पुरतें;
जगीं पाहे दुःखें विविध, नुपजे आसहि जरा,
कशी या लोकाला बहुत चढली मोहमदिरा ? ११

येतो वासर तोच, तेचि रजनी, व्यापार नाना परी
प्राणी हे करितात, आयु सरतें हें नेणवें अंतरीं.
तुच्छें चर्वितचर्वणोपमसुखें जीं, तींच तीं भोगितां,
संसारीं विरक्तिप्रसंग नुपजे, हे कोण निर्लज्जता ? १२

तूं राजा जरि, मी श्रुतिस्मृतिमहाविद्याभिमानी असें,
भाग्यें विश्रुत तूं, मदीय कवितासत्कीर्ति लोकीं वसे,
आहे अंतर फार तूज मज रे! तूं गर्व जैं दाविशी,
मी ही निस्पृह, भाग्यवंतगणना नाहीं मला फारशी ! १३

गगनीं रजनीस शशी विलसे, दिवसा रवि त्या स्थलिं नांदतसे,
उदयास्त अशांस न हे चुकती, स्थिर मानितसे जन हा कुमती ! १४

जधीं कांहीं कांहीं 'हरि, कवि' असे शब्द शिकलों,
तधीं मी सर्वज्ञ द्विपसममदें याच भरलों;
जधीं 'कांहीं नेणें' ह्मणुनि वदले पंडित मला,
तदा माझा गर्वज्वर सकलही हा उतरला. १५

गेला मान जनांत भाग्य सरलें, भृत्यादिकीं सोडिलें,
झाले याचकही पराङ्मुख घरीं, तारुण्यही लोटलें,
सुज्ञांहीं मग युक्त हेंचि करणें, कीं जन्हुकन्यातटीं
सेवावा बरवा निकुंज गिरिचा किंवा गुहा गोमटी. १६
हिमाचलशिलेवरी सुरनदीतटीं बैसुनी,
त्यजूनि जनसंगती सुदृढबंध पद्मासनीं
सुखेंकरुनि डोलतां प्रचुर योगनिद्राभरें
कधीं डवचिती मला हरिणपोत शृंगांकुरें ? १७
स्वर्गापासुनि शर्वमस्तकतटीं, तेथूनिया भूधरीं,
ग्रावाग्राहुनि भूतलीं उतरली ते स्वर्णदी सत्वरीं;
गेली तेथुनि अर्णवाप्रति मदें, ते वंद्यही कष्टली,
जे का दुर्मद त्यां अधःपतनता आहे बरी निर्मिली. १८
लक्ष्मीनें जरि तुष्ट तूं, बहुसुखी मी वल्कलानें असें;
दोघांचा परितोष तुल्य असतां आधिक्य कांहीं नसे;
आशा ज्यास, दरिद्र तोचि समजे; नैराश्य पैं बाणतां,
भाग्याचा नर कोणता मग बरें? निर्भाग्य तो कोणता? १९
ज्यांचें पात्र पवित्र पाणियुग हें, भिक्षान्न जे भक्षिती,
ज्यांचें वस्त्र दिशा, जयां मल नसे, शय्या जयांची क्षिती,
ज्यांला दैन्य नसे, विरक्ति वनिता, जे तीसवें नांदती,
ज्यांला कर्मकलाप बाधित नसे, ते धन्य येणें रिती. २०
माते मेदिनि ! मारुता स्वजनका ! तेजा सख्या सोदरा !
तोया ! आणि नभा ! तुह्मां नमितसें जोडूनि भावें करां;

जालें ज्ञान भवत्कृपेस्तव मला, आतां पहा सत्वरी,
ब्रह्मीं मी मिळतों, जलीं समरसें वर्षोपलांचे परी. २१
जों हे स्वस्थ तनू, जरा वसतसे जों दूर, जों इंद्रियें
शक्तें, कीं सरलें न आयु पुरतें जों, पंडितानें स्वयें
आत्मप्राप्तिसुखार्थ यत्न करणें कीं तोच हो फारसा,
होतां मंदिर दीप्त कूपखननीं उद्योग तो कायसा? २२

वैराग्यशतक.

---

## कविवंदन.

### ओंव्या.

समस्त कवींस नमस्कार, जो जगद्गुरु आचार्य शंकर,
जेणें मतें उच्छेदोनि समग्र, शुद्ध मार्ग वाढविला. १
सकळ मतवादी दरिद्री, शंकर समर्थ पृथ्वीवरी,
संन्यासदीक्षा निर्धारी, स्थापिली जेणें विधियुक्त. २
अवघे मतवादी रजनीचर, शंकर त्यांवरी रघुवीर,
कीं कौरव वधावया यादवेंद्र, अति उदित साक्षेपें. ३
तैसा शंकराचार्य सकल, कुमतें छेदी तत्काल,
त्या आचार्यांचें पदकमल, श्रीधरभ्रमरें वंदिलें. ४
श्रीधराचार्य टीकाकार, त्यांसी नमस्कारी श्रीधर,
मधुसूदनादिक कवींद्र, ग्रंथ अपार जयांचे. ५
जो शृंगारवनींचा विहंगम जाण, तो जयदेव पद्मावतीरमण,
त्याची काव्यरचना पाहून, पंडितजन तटस्थ. ६

जो वेदांतक्षीरार्णवींचा मीन, जेणें विवेकसिंधु रचिला पूर्ण,
तो मुकुंदराज गुणनिधान, तयाचे चरण वंदिले. ७
तारावया जन समग्र, पुन्हा अवतरला रामावतार,
गीतार्थ केला साचार, तो ज्ञानेश्वर जगद्गुरु. ८
जो भानुदासकुलभूषण, प्रतिष्ठानवासी परिपूर्ण,
त्या एकनाथें ग्रंथ संपूर्ण, बहुसाळ कथियेले. ९
जें चातुर्यराजधानीचे कळस, मुक्तेश्वर मुद्गलदास,
ज्यांचे ग्रंथ पाहतां सुरस, ब्रह्मानंद उचंबळे. १०
जैसे चंडांशु व्योमीं, तैसेचि केवळ वामनस्वामी,
ज्यांची श्लोकरचना या भूमी–मंडळावरी अपूर्व. ११
कृष्णदासजयराम, जो शांतिदयेचें निजधाम,
ज्याचे ग्रंथ ज्ञानभरित परम, जो निःसीम ब्रह्मचारी. १२
श्रीरामउपासक निर्मळ, जो भक्तसरोवरींचा मराळ,
तो रामदासमहाराज केवळ, भक्ति प्रबळ लावी जना. १३
ब्रह्मानंदस्वामीचा बंधु सत्य, नाम तयाचें श्रीरंगनाथ,
ज्याची कविता समस्त, ऐकतां जन उद्धरले. १४
असो आतां समस्त कविवर, अवघे ब्रह्मानंदरूप साचार,
त्यांसी अनन्यशरण श्रीधर, द्यावा वर ग्रंथासी. १५

रामविजय.

# दुर्योधनाची राजनीति.

## श्लोक.

शत्रून्मूलनतत्परा नृपतिची घेवोनी आज्ञा चर,
एकांतीं रिपुवृत्त सर्व मग त्या लागे वदूं सादर;
बव्हर्था रुचिराक्षरा परिमिता वाणी मनोहारिणी
योजी भाषणिं तो प्रमाणसहिता ऐसी किरातग्रणीः १
“ भूपा! सेवक हेचि नेत्र असती भूमीपतींचे बरे,
त्यां तद्वंचन योग्य होय न कधीं हें जाण बापा! खरें.
या साठीं करिं तूं क्षमा जरि गमे मद्वाक्य हें वाइट,
भूपाळा! हित आणि गोड असलें बा बोलणें दुर्घट. २
सांगेना हित जो प्रभूस ह्मणती त्यालागि दुःसेवक,
ऐकेना हित जो प्रभू ह्मणति त्या दुष्ट क्षमानायक.
या साठीं अनुकूळ वागति जरी राजे तसे चाकर,
संपत्ती त्यजिना तयांप्रति परी राहे सदा सुस्थिर. ३
जात्या दुर्ज्ञेय ऐसें नरपतिचरित श्रेष्ठ तें होय कोठें!
अज्ञानग्रस्तबुद्धी मजसम असले क्षुद्र जंतूहि कोठें!
आतां मीं जाणिलें जें रिपुचरित असें तें न माझें गणावें
सामर्थ्य क्षोणिपाला ! परि सकलहि हें जाहलें त्वत्प्रभावें. ४
तुह्मी तों वनवासि आणि नृपतिस्थानीं रिपू तो तरी,
राज्या घ्याल हिरावुनी अशि सदा शंका स्वचित्तीं धरी;
द्यूता खेळुनियां जिता वसुमती ही गोष्ट नोहे बरी,
यासाठीं तिस नीतिनें वश करूं इच्छीतसे अंतरीं. ५

मोठा तो कपटी, तथापि तुमच्यापेक्षां गुणी आगळा
आहे, या रिति मानि त्या जन, असें वागे बहू चांगला;
होतें प्राप्त महत्व यास्तव मला वाटे असें मानसीं
कीं बा दुर्जन संगतीहुनि बरा विद्वेषही साधुशीं. ६
कामक्रोधादिकाभ्यंतर रिपु जिणुनी साहि यत्नें नृपा! तो,
मोठ्या दुःसाध्य ऐशा मनुविहितपथें वागण्याला पहातो;
टाकोनी आळसाला निशिदिनिं अपुल्या वाटुनी सर्व वेळा,
उद्योगाला करी तो सतत झटुनियां नीतिमार्गें नृपाळा ! ७
तो दुर्योधन मानितो अनुचरां प्रेमें स्वमित्रांपरी,
मित्राचा करितो सदैव अपुल्या सत्कार बंधूंपरी;
बंधूंतें गणितो स्वतांपरि, नृपस्थानावरी संस्थित,
ऐसा तो अभिमानशून्य विनयें लोकीं असे वर्तत. ८
सामालागी करीतो त्यजुनि कपट तो दानही देउनीयां,
दानातेंही करीतो विपुल परि न तें सत्कृतीवांचुनीया;
त्याचा सत्कार कोणा गुणरहित नरां प्राप्त नोहे कधींही,
ऐशी योग्य व्यवस्था सकल करितसे सामिं दानींहि पाहीं. ९
दंडातें करितो जरी, तरिहि तो लोभें न अर्थाचिया,
कोपाचा तरि लेशही न वसतो चित्तामधें त्याचिया;
हा तों केवल राजधर्मचि असे या हेतुनें मात्र तो,
चित्ता आकळुनी जितेंद्रियपणें शिक्षार्थ तो दंडितो. १०
भेदीं निष्णात ऐसे अनुग चहुंकडे फार विश्वासु ठेवी,
राहे साशंक चित्तीं, तरि वरि वरि तो स्वस्थता थोर दावी;

कार्यांतीं देणग्या ज्या भरपुर अपुल्या देतसे सेवकांतें,
त्या 'मोठा जाणता हा नृप उपकृतिचा!' दाविती हें जनांतें. ११
राज्या आकाळितो व्यवस्थितपणें योजूनि सामादिकां,
तो दुर्योधन या रिती नरपते! चाऱ्ही उपायां, निका;
ईर्ष्येनेंचि जणूं फला प्रसवती ते एकमेकांचिया,
ऐसें वाटतसे विलोकुनि बहू त्याच्या धनाच्या चया. १२
भूपा! भूपतिच्या सदैव दिसती प्रासादपंक्तीपुढें
राजांचे रथ, वाजि, उंटहि तसे लक्षावधी रोकडे;
भेटीचे मदमत्त हत्ति झुलती, ज्यांच्या मदाच्या जलें,
झाली अंगनभूमि पंकिल असें ऐश्वर्य त्या लाभलें. १३
कष्टावांचुनिही जमीन पिकते, झाले सुखी कर्षक,
केले पाट चहूंकडे, नच असे पर्जन्य आवश्यक;
ऐसे हे कुरुदेश संप्रति बहू संपन्नता पावले,
कांकीं देशहितेच्छु राज्य करितो हा भूपते! चांगलें. १४
चित्तीं थोर दयाळु आणिक बहू वृद्धी सुखाची करी,
बाधा ज्या विविधा तयां सकलिकां यत्नें करी तो दुरी.
ऐसा श्रीदसमान हा ह्मणुनियां याच्या गुणांनीं क्षिती,
आपोआपचि पान्हवून दुभते सद्रत्नराशींस ती. १५
मोठे शूर तसेचि मानधन तें ज्यांनीं असे अर्जिलें,
युद्धीं विक्रम दावुनी क्षितिवरी जे कां बहू गाजले;
स्वार्था सोडुनि ऐकमत्य करुनी जे झुंजती उद्भट,
प्राणा वेंचिति जे हितार्थ पतिच्या, ऐसे तयाचे भट. १६

मोठे विश्वासु ऐसे चर निवडुनियां धाडि देशांतराला,
तद्द्वारा भूपतींच्या मसलति कळती सर्व दुर्योधनाला;
त्याच्या ज्या का स्वतांच्या नचि समजति त्या कार्यसिद्धयंत लोका,
धात्याचें तेविं त्याचें अभिमत समजे कार्य पाहोनि देखा. १७
धनुष्याला दुर्योधन कधिंहि दोरी न चढवी,
कदापि क्रोधानें नचि वदन वा नेत्र फिरवी;
गुणांच्या लोभानें सकळहि धराधीश्वर बरे
तयाची माळेच्या परि धरिति आज्ञा निजशिरें. १८
स्थापोनी यौवराज्यासनिं तरुण अशा बंधु दुःशासनाला,
राज्याच्या कारभारा, सकल करवितो तत्करें भूमिपाला!
साहाय्या घेउनीयां निज कुलगुरुच्या यज्ञयागादि कर्मे,
भक्तीनें आचरोनी निरलस पुजितो अग्निला युक्तधर्मे. १९
पादाक्रांत समस्त भूपति, तसी राज्यस्थिती सुस्थित,
शास्ता एकचि सर्व भूमिवलया आतोयधी निश्चित.
तत्रापी तुजपासुनी बहुभया तो वागवीतो मनीं,
थोरांच्यासह शत्रुभाव बरवा नोहे कधींही जनीं. २०
प्रसंगें गोष्टींच्या जइं तव नृपा! नांव निघतें,
तयीं चित्तीं त्याच्या विजयबल मोठें अठवतें;
करी खालीं डोकें व्यथित मनिं दुर्योधन तसा,
असह्या मंत्रातें श्रवण करितां सर्पचि जसा ! २१
तुला जिंकायाला सकपट सदा तो झटतसे,
प्रतीकारा त्याच्या करिं, तव मना येइल तसें.

निरोपे बा आह्मी तिळहि नकळे यांत अमुतें
जनीं देखावें जें कथन करिजे हेंचि कळलें
बोलोनी यापरी तो वनचर नृपतीपासुनी बक्षिसा
पावोनी स्वालयाला बहुताचि हृदयीं तुष्ट होवो
कांतेच्या मंदिरांत प्रभुवर मग तो जाउनी उक्त
सांगे भावांसमक्ष क्षितिपति दयितेलागिं तें वृ

व्यवसायदीपन–किर

---

## न्या० महादेव गोविंद रानडे

### श्लोक.

प्रचंड नगराज तो हिमगिरी असे लोळला!
अगाध अथवा पयोनिधि अशेष तो आट
दुभंग अथवा अहो! धरणिगोल हा जाहला!
अकांत असला कसा भरतभूतलीं मातला?
हळाळति कशामुळें जन लहान मोठे वदा,
विलापरव एवढा परिसिला न कोणीं कदा
हताश जन सर्वही, कवण विघ्न हो पातलें?
दिसे भरतभूमि ही सकल आर्त शोकानलें
"हिरा बहुत साजिरा, रुचिर कोहिनूराहुनी,
क्षणीं हरपला!" असें वदति दीनसे होउनी

दुजे "गगनिं लोपला अतुलतेज तारा!" असें
वदूनि असुं ढाळिती, परिमिती तयाला नसे. ३
पडे मसलतींत जें गहन पण्डितां सांकडें
जया पुढति मांडितां उलगडा तयाचा पडे.
रमेसह सरस्वती विसरुनी जुनें वांकुडें
यदीय गृहिं नांदती ! परि न गर्व ज्याला चढे. ४
परोपकृतिचें महाव्रत अखंड ज्या आवडे,
निरुद्यमाचि रोगियाप्रति कुपथ्यसें वावडें.
पदोपदिं जयाविणें प्रगतिकाज सारें अडे
दिसे विबुधवृंद ज्याविण अनाथसें बापुडें ! ५
"स्वकीय कुलदीप हा हरपला!" अशी ओरडे
स्वदेशजननी, खळे नच अजूनि तीचें रडें.
यदीय मृति सर्वही स्वजनकार्यभागीं नडे
रमारमण तो असा कवण नेणती रानडे ? ६
गुणी बुधशिरोमणी जनपदाग्रणी धोरणी
स्वदेशहितकारणीं झिजवि देह रात्रंदिनीं,
सुत्हृद्व्यसनवारणीं, श्रम गणी न विद्यार्जनीं,
हिरा जाडितकोंदणीं विलसला तसा सज्जनीं. ७
जया उपजतां दिली अतुल ईश्वरें तीक्ष्ण धी,
जयें श्रमुनि जोडिला अति अगाध विद्यानिधी.
जयाविण सरस्वतीसदन शून्यसें जाहलें,
यदीय निधनीं नसे कवण भाग्य हो लोपलें ? ८

तया गणिति भानुच्या सम, कितीक बिसार्कसे,
अनन्वयनिदर्शन प्रकट तच्चरित्रीं दिसे;
अमोल गुणसंहती; सुगुण पोषिती दोष ते
तया सदृश तोच ! हें उचित मन्मना भासतें. ९
तुह्मी भरतखंड हें निजकुटुंबसें लेखिलें,
हिताहित पित्यापरी सतत आमुचें देखिलें;
शिरीं सतत वाहिलें स्वजनकार्यचिंताभरा,
प्रनष्ट जनछत्र हें ह्मणुनि जीव हा घाबरा. १०
दिनान्तसमयीं तुह्मीं सहल अन्यमित्रांसवें,
करूं निघतसां, मला सकल आज तें आठवें!
सुबोध तुमचा तदा गमलि मेजवानीच, तें
रसायनचि मानसा सुखवि, पोषि चिच्छक्तितें. ११
कड्यावरुनि कोसळे खळखळे जशी पर्वतीं
प्रशांत मृदुशाद्वलीं झुळुझुळूं झरी सैकतीं;
तशी विषयधोरणें चटुल वाग्नदी वाहिली,
निमालि, परि मर्मरश्रवणरूप ती राहिली! १२
कठोर शठनास्तिकांविषयिं बोलतां ती गिरा,
हिमालयगिरींतुनी घसरते जशी घोगरा;
प्रसादयुत सज्जनाविषयिं बोलतां शांत ती
प्रयागपुर सोडितां स्थिर गभीर भागीरथी. १३
जनस्थिति सुधारणाविषय वर्णितां कोमळ
नदी प्रभवनिर्गता रव करी जसा मंजुळ;

परेशमहिमा तया प्रिय निरूपितां प्रेमळ
अगाधजल सिंधुचा प्रवह ज्यापरी निर्मळ. १४
परोपकृतिच्या कृती तुमचिया स्मरूं मी किती ?
अनेकविध उद्यमा तुमचियाच त्या वर्णिती !
शतांश तुमचा जरी इतर मानवा साधता
तरी खचित तो जनीं बहुत पावता धन्यता. १५
विशाल पथिवीपरी सुयश विस्तरा पावलें,
ह्मणूनि गुणकीर्तनीं पृथिविवृत्त हें साधिलें;
सुवर्ण कुसुमें चितेवरी सुहृद्गणीं वाहिलीं,
यशस्तनुस अर्पिली सबहुमान पद्यावली. १६

बिरुदावलि.

---

## करुणालहरी.

### श्लोक.

प्रभुवरा! शरणागतवत्सला!
करुनियां करुणा सुखवीं मला;
तव पदीं अतिदीन रमावरा!
विनत मी, न तमीं भ्रम हा बरा. १
शुभकरा! उपलां असु अर्पिशी,
उपलसेतुहि सागरिं तारिशी;
तव चमत्कृतिकारि दिसे जना
विभव हें, भवहेतुविभंजना! २

झगडती जनका! अरि हे सहा
  भ्रमवुनी भवजालिं मला पहा;
तव दयामृत इच्छि दयालया!
  सकल हा कलहाग्नि शमावया. ३

प्रणतसंकटिं सत्वर धांवशी
  विमल कीर्ति तुझी मिरवे अशी.
सदय होउनि तारियलें जनीं
  गजवरा जवलाघव दावुनी. ४

भजक फार तुला प्रिय वाटती,
  तदवनीं तव संतत जागृती.
द्रवुनि अंतरिं मारिशि धांव रे !
  द्रुपदजा पद ज्या समयीं स्मरे. ५

सकललोकपिता ह्मणती तुला,
  न महिमा तव जाणतसे तुला;
अखिलरक्षाणिं दक्ष तुझ्या पदा
  नत, नुता ! तनुतापहरा ! सदा. ६

दिनमणी गगनीं अगदीं फिका.
  विधुसि कोठुनि सुंदर चंद्रिका !
सफल काय असे शिखिचें जिणें ?
  न भगणा भग नाथ ! तुझ्याविणें. ७

भुवनिं थोरपणा तव ठाउका
  प्रभुवरा ! सकलां नतसेवकां;

प्रणत मी तुजला बहु आळवीं,
नृपतिता पतिता मज दाखवीं. ८
हृदयमंदिरिं तूं वससी सदा,
परि न ओळखितां स्थल तें कदा
कितिक धुंडिति पाद रमावरा !
जन वनीं नवनीरदसुंदरा ! ९
स्तुतपदा ! विपदर्णव आटवीं,
त्वरित दग्ध करीं विषयाटवी;
सुख अनश्वर अंतरिं साठवीं,
भव मना वमनासम वाटवीं. १०
मज कधीं वदनांबुज दाविशी,
मजवरी करुणामृत सिंचिशी?
हरिशि ताप कधीं मम? तापहा !
वद मला, दमला अति जीव हा. ११
विमल भाव, सख्या! तुज अर्पितों,
नति तुझ्या चरणांवरि घालितों;
क्षणभरींहि उपेक्षिसि तूं जना
न विनता, विनतात्मजवाहना! १२

पद्यमंजरी.

## अंगदशिष्टाई.

### आर्या.

" हे रात्रिंचर राजा ! रामाचा दूत अंगदाभिध मी,
कोणी मला पुसाना, ' कोण असें?' काय बैसलों अधमीं? १
वैदेहीच्या रमणें वीरें करुणाकरें जगद्वीतें
पाठविलें मज, त्याच्या ऐकें कल्याणहेतु सद्वीतें. २
' चतुरानन जगदीश्वर, त्याचा तूं पौत्र भूतपतिदास,
श्रुतसंपन्न, नयज्ञ, ब्राह्मणसुत, पावलासि सुपदास. ३
सुरभूसुर यत्नानें पूजावे, धर्मसेतु रक्षावे,
निर्मल यश जोडावें, व्यसनानाचार ते उपेक्षावे. ४
या विहिताचारातें, सोडुनि धरिलीस वृत्ति जननीचा,
अनुसरलासि दशास्या ! पक्षाला तूं स्वकीयजननीचा. ५
विधिवरसामर्थ्यानें, होउनि मदमत्त वन्यकुंजरसा,
धर्मद्रु मोडिले हे केली ध्वस्ताचि वेदकुंजरसा. ६
विप्रामर भजनीय स्तुत्य, तयांसींच लाविलें वैर,
कैरवपातिनिभ पूर्वजयश मळवायासि वर्तसी स्वैर. ७
शमदमनयभयलज्जा सोडुनि हरिशी परांगनावित्त,
वित्तम होउनि निरयप्रद मार्गीं काय ठेविलें चित्त ! ८
स्वकुलाला अंजन जो लावी, तो पुत्र न, प्रसूविष्ठा,
शिष्टाचरणीं यास्तव नित्य असावी यशःप्रदा निष्ठा. ९
कारिशी अन्याय बळें, हितोपदेष्टा तुला गमे द्वेष्टा,
स्वेष्टासि मंतुवांचुनि धिक्कारिशि, हे बरी नव्हे चेष्टा. १०

जनकमहाराजसुता रविकुलतिलकाजसूनुची सून,
तूं न कळत नेली, तरि दे, हो सद्वृत्त आजपासून. ११
अपराध हा महाजननिंद्य तशी हे जनाधमा! केली,
अद्यापि मी पुलस्त्यद्विजाकडे पाहुनि क्षमा केली. १२
रघुकुलज श्रीमंत प्राज्ञ प्रबल क्षमादयानिलय,
शरणागतवत्सल हे ख्यात जनीं, शत्रुचा करूनि लय. १३
रविवंशज राजांची बहुसरला भ्रूलताहि चापलता,
ते वक्रा झाल्यावर, चालेना जिष्णुचीहि चापलता. १४
नाहीं तुजसीं मजसीं वैर, तथापि प्रियावियोग मला,
दिधला, यावरुनि तुझा स्वभाव विपरीत सर्वथा गमला. १५
वैदेहीला तूं जरि आणुनि देशील आझुनी मजला,
मीही लंकाजीवन अभय, समर्पीन तत्क्षणीं तुजला. १६
नाहीं तरि सायक हे, हे भुज, हा खड्ग, हें धनूरत्न,
मीं सज्ज जयधनातें, तूं निधनातें, स्वयें करीं यत्न.’ १७
यापरि तुज राजेंद्रें कथिलें, आतां करूं नको उशिर,
सीतोपायन घेउनि, ठेवीं, ये तत्पदांबुजीं स्वशिर. १८
तूं करुनि समर, न मर; भ्रमरसम रघूत्तमांघ्रिनवपद्मीं,
रम; रस घे; अमराचि हो; भ्रमरहित स्वस्थ नांद निजसद्मीं! १९
दे उत्तर, निजलासा, बहिरासा, मूकसा, नको राहूं,
याहुनि हित काय वदों; न वदसि कां आझुनीहि चोरा! ‘हूं’! २०
अनल अनिल यम यक्षप वरुण विधु ब्रध्न सर्प गंधर्व,
सर्व पराजित केले, परि रामाशीं करूं नकों गर्व. २१

राम प्रणतजनांचा त्राता, रिपुलोककाल, यापाशीं
चेष्टा करितां दुष्टा! भ्रष्टा! पडशील मृत्युच्या पाशीं. २२
राम धनंजय तूंही कापुर तृण तूळ काष्ठ घृत तैल,
शैलहि पिचविल, हें तुज नुमजे, तूं मातला जसा बैल. २३
यतिवेषें चोरानें, बाटवुनी रामचंद्रदलकुटिला,
कुटिलानें रत्नातें नेलें, तो शत्रु पाहिजे कुटिला. २४
गिरिदलन मस्तकानें, स्वशिरोभंगार्थ दुर्मते! करिशी,
करिशील तूं मदांधा! नरकपुरी इच्छितोशि लौकरिशी" २५

मंत्ररामायण-युद्धकांड.

---

## वर्षाऋतु.

### श्लोक.

वर्षास येइ परि ही सकलास वर्षा
देऊनि जीवन, करी बहुत प्रहर्षा;
आईच ही स्वशिशुतापनिवारणाला,
अत्यंत तत्पर असे जनपोषणाला. १
ढगापाठीमागें ढग जमुनि हे थाट असती,
जसे योद्धे अंगीं धरुनि कवचें कृष्ण दिसती;
पुढें वारा सेनापतिच सरसावूनि हटवी,
तपर्तूतें मागें अणिक बहु तच्छक्ति बटवी. २

सूंसूं अगोदर सुटे घनघोर वारा,
मागोनियां सरसरा पडताति धारा;
व्योमीं विजा लखलखा लवताति भारी,
गर्जे बहू कडकडा घन भीतिकारी. ३
धाराभिघात अचलावरि होत आहे,
मित्रा तरी तिळहि हे ढळती न पाहे;
जे उच्च त्यांस व्यसनें जारि फार आलीं,
तत्रापि ते स्थिरचि होत विपत्तिकालीं. ४
वाटा तृणें उगवतां सकळा बुजाल्या,
संस्कारशून्य बहुसंशयदायि झाल्या;
विद्या जशा परिचयाविण संशयातें,
देताति लुप्त बहु होउनियां जनातें. ५
आकाश हें सगुण त्यास धरूनि राहे,
हें इंद्रचाप गुणशून्यहि शोभताहे !
ये निर्गुणास गुणसंगतिनेंच शोभा,
हें जाणती धरिति ते गुणिसंगलोभा. ६
चंद्र प्रकाशित करी सकळा घनांतें,
त्याचेंचि रूप घन झांकिति हे पहा तें;
आहे तयास फळ अल्पदिनांत हानी,
साहंकृती मलिन जो गुरुला न मानी. ७
होतां कलाधिप तमांत विलुप्त सारा,
खद्योतसंघ करि हा अपुल्या प्रसारा;

विद्वत्प्रसंग नसतां बहु सावकाश,
  स्वच्छंद मूर्ख करिती अपुला प्रकाश. ८
होतां अखंड घनगर्जित त्यांत भेक,
  टों टों ध्वनी मिळुनि हे करिती अनेक;
मूर्खें उगेंच विबुधांपुढतीं बसावें,
  हासास पात्र न कदापि वदून व्हावें. ९
पूरें समुन्नत तरू उपटून गेले,
  होऊन वेतस विनम्र तसेचि ठेले;
अत्यंत नम्रचि सदा प्रबळास व्हावें,
  ह्या वेतसांपरि समुन्नतिला भजावें. १०
हे क्षुद्र ओहळ जळें भरले, क्षणांत,
  होऊन उत्पथ विशुष्कहि तत्क्षणांत
झाले; अदृष्ट वळतां अजितेंद्रियाला
  ऐश्वर्य येइ, परि शीघ्र विनाश त्याला. ११

ऋतुवर्णन.

---

## समुद्राचा विस्तार.

### श्लोक.

जाती लोटत लोटत क्षणभरीं थारा न त्यांतें कुठें,
  अन्योन्यावरि आदळून पडती तो शब्द मोठा उठे;

ऐशा ह्या लहरींबरोबर, सख्या ! क्रीडा करीं सागरा!
तूंतें थांबवुं एक ईशच शके वाटे जलाधीश्वरा! १
सरोवर नद्या वनें बघुनि पर्वतांचीं शिरें,
अचिंत्य विभुचें मनामधिं महत्व बिंबे खरें;
परंतु तनु होय जों तव विलोचना गोचर,
भयें अणिक विस्मयें अमति होय वेडा नर. २
शुंडादंडीं दिगंतीं उचलुन धरिजे त्वज्जला दिग्गजांनीं,
लांबी रुंदीहि खोली तव किति तरि तो कोणता मर्त्य जाणी ?
भूमी व्यापून पोटीं जलधि पसरशी कीं चतुर्थांश तीन,
लाटांचे लोट मोठे ध्रुवचरणिं सदा जाउनी होति लीन! ३
हत्ती अनंत हयपत्ती नृपा! तवहि बत्तीसलक्षण गुण,
सांडा सवार, भर भांडार पूर्ण, यश कांडास ये हटकुन;
लक्षावधीं भट सुशिक्षायुत स्थित विपक्षास भीतिद रणीं,
इंदूद्भवा परि न सिंधूपुढें तवहि बिंदूसमान करणी! ४

समुद्र.

---

## दांभिकांची निंदा.

### अभंग.

ऐसे संत झाले कळीं, तोंडीं तमाखूची नळी. १
स्नानसंध्या बुडविली, पुढें भांग ओढवली. २
भांग भुर्का हें साधन, पचनीं पडे मद्यपान. ३
तुका ह्मणे अवघे ढोंग, तेथें कैचा पांडुरंग. ४

आली सिंहस्थपर्वणी, न्हाव्या भटा झाली धणी. १
अंतरीं पापाच्या कोढी, वरी बोडी डोई दाढी. २
जें बोडिलें तें निघालें, सांग काय पालटलें. ३
पाप गेल्याची खूण, नाहीं पालटले अवगूण. ४
भक्ति भावें वीण, तुका ह्मणे अवघा शीण. ५

आशाबद्ध वक्ता, भय श्रोतियांच्या चित्ता. १
गातो तेंही नाहीं ठावें, तोंड वासी कांहीं द्यावें. २
झालें लोभाचें मांजर, भीक मागे दारोदार. ३
उभयतां लोभी मन, वायां गेलें तें भजन. ४
माप आणि गोणी, तुका ह्मणे रितीं दोन्हीं. ५

बोली मैंदाची बरवी असे, वाटे अंतरिं घालावे फांसे. १
कैसा वरिवरि दिसताहे चांग, नव्हे भाविक केवळ मांग. २
टिळा टोपी माळा कंठीं, अंधारिं नेउनि चेपी घांटी. ३
तुका ह्मणे तो केवळ पुंड, त्यावारि वाजती यमदंड. ४

डोई वाढवूनी केश, भूतें आणिती अंगास. १
तरी ते नव्हती संतजन, तेथें नाहीं आत्मखूण. २
मेळवूनी नरनारी, शकुन सांगति नानापरी. ३
तुका ह्मणे मैंद, नाहीं त्यापाशीं गोविंद. ४

कन्येचा जे नर करीती विकरा, ते जाती अघोरा नरकपाता. १
नाम गाऊनीयां द्रव्य जे मागती, नेणों तयां गती कैशी होय. २

केसें होइल त्यांचें तेचि हो जाणती, आह्मांसी संगती नलगे त्यांची. ३
आमुचा सांगाती आहे तो श्रीहरी, नलगे दुराचारी तुका ह्मणे. ४

टिळे टोपी उंच दावी, जनीं मी एक गोसावी. १
अवघा वर रंग सारा, पोटीं विषयांचा थारा. २
मुद्रा लावीतो कोरोनी, मान व्हावयासी जनीं. ३
तुका ह्मणे ऐसे किती, नरका गेले पुढें जाती. ४

चातुर्याचे योगें कवित्व करीती, प्रासादिक रंग आणितां नये. १
संन्याशाचें सोंग संपादिलें सांग, वैराग्याचें अंग आणितां नये. २
चंद्रसूर्य चित्रें लिहिताति भिंती, प्रकाशाचें अंग लिहितां नये. ३
शिपायाचें सोंग आणितां येईल सांग, शूरत्वाचें अंग आणितां नये. ४
तुका ह्मणे गाउन नाचून करतील सीमा, पांडुरंगीं प्रेमा आणितां नये.

तुकारामाची गाथा.

---

## वसंतलक्ष्मी.

### श्लोक.

शीतासवें शिशिर सोडुनि विश्व जाई,
शौर्यें वसंतनृप सर्वहि राज्य घेई;
पर्णें गळूनि नव कोमल पल्लवांच्या
वृक्षीं ध्वजा फडकल्या मधुराजयाच्या. १

आधीं फुलें बकुल, नंतर मोतियाही,
त्याच क्रमें कनकचंपक फुल्ल होई;
तो पारिजात करि मौक्तिक पोवळ्यांचा,
वर्षाव; दे, फुलुनि गंध, गुलाब साचा. २
हे दोहदाविण अशोकहि फुल्ल झाले,
जाणों वसंतयश निर्मळ तें उदेलें!
झाले पलाशतरु रक्तचि कुड्मलांहीं,
पुष्पोद्भवें नटुनि सज्ज वसंत होई. ३
वायु स्वयें शिरुनियां वनवंशरंध्रीं,
वाद्यें सुमंगलचि वाजवि मोदकारीं;
गुंजारवें भ्रमर गुंगुनि त्यांसवें तें,
झाले विशंक नृपवादक मोददाते. ४
मंजुस्वनें पिक न, भाटचि या नृपाचे,
स्वारीमध्यें फिरति गात यशासि साचे;
ही सारिका मधुर गान करूं निघाली,
झाले मयूर नट नर्तक याचि कालीं. ५
पुष्पान्विता नवलता जणुं पौरनारी,
पुष्पांजली उधाळिती आणि भद्रकारी;
जो झाकिला सुरभि दिव्य पराग त्यांहीं,
तेणेंचि राजपथ रंजित होय पाहीं. ६

तुरतरंगिणीकाव्य—प्रसंग २

# विश्वामित्राभिगमन.

## ओंव्या.

दशरथाचे सुपुत्र, ऐकोनीयां विश्वामित्र,
ऋषीश्वरांमाजी पवित्र, आला सत्वर यज्ञसिद्धचर्था. १
आला ऐकोनि विश्वामित्र, सामोरा धांवे नृपवर,
लोटांगणीं नमस्कार, हर्षें निर्भर गृहा आणी. २
घालोनियां वरासन, मधुपर्कविधि गोदान,
सुवर्णसुमनें केलें पूजन, सुखसंपन्न ऋषि जाला. ३
वसिष्ठविश्वामित्रां भेटी, आलिंगनीं पडली मिठी,
दोघांची एक झाली दृष्टी, दोघांचे पोटीं सुख एक. ४
दशरथाचे सभास्थानीं, बैसले वसिष्ठ विश्वामित्र दोन्ही,
तेणें शोभली ते अवनी, जेंवि गगनीं शशिसूर्य. ५
दशरथ ह्मणे विश्वामित्रा, तूं होसी प्रतिसृष्टीचा धात्रा,
उद्धरावया कुलगोत्रा, परमपवित्रा आलासी. ६
धन्य भाग्याचे आजि आह्मी, धन्य अयोध्येची भूमी,
जे कृपेनें आलेती तुह्मी, जे व्रतजपें तपें न भेटां. ७
जेथें संतोषोनि साधु आले, तेथें सकळ कल्याण मुसावलें,
तीर्थाचें फळ तेंही पावलें, भवाब्धीचें भलें परतारूं. ८
जेथें तुमची कृपादृष्टि पाहे, तेथें भगवन्त अवश्य आहे,
जगद्वंद्य तुझे पाय, बहू मी काय अनुवादूं ? ९
संतोषोनि बोले दशरथ, विश्वामित्रा तुझे मनोरथ,
सिद्धी पाववीन समस्त, हें निश्चितार्थ मद्वाक्य. १०

जे जे तुझें मनोरथ, ते ते जाण म्यां केले कृतार्थ,
तेणें वाक्यें संतोषयुक्त, स्वयें बोलत विश्वामित्र. ११
" दशरथा! तुझें औदार्य, धैर्य वीर्य गुणगांभीर्य,
तुझ्या पुरुषार्थाचें शौर्य, स्वर्गीं सुरवर वानिती. १२
रणीं जिंकोनि शक्रासी, सुखी केलें देवगुरूसी,
यश दिधलें इंद्रासी, तूं सूर्यवंशासी मंडण." १३
ऐकोनि ऋषीची वचनोक्ति, राजा सुखावला चित्तीं,
त्या सुखाची सुखस्फूर्ति, काय ऋषीप्रती बोलत. १४
होवोनि अतिविनीत, जोडोनि दोनी हस्त,
ऋषीचे कृतकार्यार्थ, असे पुसत स्वानंदें. १५
" गायत्रीमंत्रकृतकार्या ! विश्वामित्रा ! ऋषिवर्या !
तूं आलास कोणा कार्या ? महाधैर्या मज सांग. " १६
ऋषि ह्मणे, " सूर्यवंशीमहावर्या, ऐकें नृपा ! परोपकार्या,
सुरसिद्धकृतकार्या, मागणें राया अवधारीं; १७
माझें मागणें नव्हे वित्त, माझें मागणें नव्हे प्राकृत,
माझें मागणें रघुनाथ, यज्ञसिद्ध्यर्थ कृतकार्या ! " १८
ऐकोनि ऋषीचें वचन, गजबजिलें रायाचें मन,
वीर्य गेलें हरपोन, कंपायमान सर्वांगीं. १९
चणे वानरा गालींचे, कां धन जैसें कृपणाचें,
भाणें नेलें भणगाचें, तैसें मन रायाचें श्रीरामीं. २०
प्राण जातां देह विकळ, मन बुद्धि होय व्याकुळ,
राम जातांचि तात्काळ, रायासि केवळ दैन्य तैसें. २१

चाचेसि दृढ पडलें मौन, त्यासि नेदी प्रतिवचन,
समयाचें चातुर्यज्ञान, विचारून बोलत. २२
ह्मणे " यज्ञा विघ्न करिती राक्षस, मनुष्यमारक कर्कश,
राम केवळ बालवेष, धनुर्विद्याभ्यास नाहीं केला. २३
नाहीं रणांगण देखिलें, नाहीं पूर्वीं युद्ध झालें,
त्यासि राक्षसांसिं पहिलें, युद्ध करविलें केविं जाय ? २४
मी केवळ पुत्रकृपण, श्रीराम माझें निधान,
श्रीराम केवळ जीवन, तो न देववे दान राक्षसभक्षा. २५
जें जें मागाल तुह्मी समर्थ, देईन राज्याचा राजपदार्थ,
शेखीं देईन जीवित्व, परि न रघुनाथ देववे ." २६
ऐकोनि रायाचें वचन, विश्वामित्र कोपायमान,
ऐसा क्षोभोनियां आपण, काय वचन बोलत. २७
" अरे मी भेटलों दशरथ, द्विजा तुजे मनोरथ,
आजि झाले कृतकार्यार्थ, ऐसें सभेआंत जल्पसी. २८
तेंचि मागतां दान, न देववें ह्मणसी आपण,
हेंचि मुख्यत्वें कुलदूषण, दिधलें दान तें मिथ्यत्वें. २९
हरिश्चंद्रें स्वप्नदान, जागृतीं सत्य केलें संपूर्ण,
आपणा विकिलें आपण, दक्षिणावचनसत्यत्वें. ३०
त्या वंशीं तूं जन्मलासी, दिधलें दान तें न देशी
हें सामर्थ्य तुजचि पाशीं, सूर्यवंशासि निंदका! ३१
तूं रामासि जाणसी बाळ, हे बुद्धि मुख्यत्वें स्थूल,
श्रीराम अवतार निर्मळ, जाण केवळ सुरसाह्य. ३२

श्रीराम नव्हे बाळक, राक्षसकुळासी अंतक,
स्वधर्माचा संस्थापक, साधूंचा अवश्य सहाकारी.
श्रीराम धनुर्विद्येसी नेणे, हें वचनचि अप्रमाण,
राम सकलविद्याजन्मस्थान, शस्त्रास्त्रजीवन निजबीज रा
श्रीराम मनुष्य नव्हे पाहीं, राम देहींच विदेही,
श्रीराम चैतन्यविग्रही, राम स्वदेहीं परब्रह्म.
राया! तूं नेणसी निश्चित, श्रीरामा मानिशी प्राकृत,
वसिष्ठासि पुसे हा वृत्तांत, तो यथार्थ सांगेल.
आतां स्वस्ति असो तुह्मांसी, सकळ कल्याण श्रीरामासी,
मी जाईन स्वाश्रमासी," ह्मणोनि ऋषी निघाला.
तंव वसिष्ठ ह्मणे, " नृपवरा! क्षोभऊं नको विश्वामित्रा,
हा प्रतिसृष्टीचा धात्रा, भस्म कुलगोत्रा क्षणार्धें करील.
वसिष्ट गुह्य सांगे रायासी, शांत करी विश्वामित्रासी,
"दोघे पुत्र द्यावे त्यासी, दोघे पुत्र तुह्मांपासीं क्रीडार्थ.
आज्ञा वंदूनि शिरसीं, लोटांगण विश्वामित्रासी,
"रामलक्ष्मण दिधले तुह्मांसी, दोघे मजपासीं राहूं द्या."
विश्वामित्र ह्मणे, "भलें झालें, श्रीरामें नव्हे काय केलें ?
सर्वे लक्ष्मणासि दिधलें, भाग्य फळलें पैं माझें."
ऋषिरामां जाली भेटी, आनंद विश्वामित्राच्या पोटीं,
जयजयकारें गर्जत उठी, श्रीराम दृष्टी देखोनि.

भावार्थरामायण—बालकांड, अ० ८

# धन्यनर.

## श्लोक.

शोधी स्वयें सकल तत्व विचारयोगें,
मोठे असें ह्मणति यास्तव घे न मागें;
सत्याविणें इतर ज्यास नसेच वर्म,
तत्वावबोधरत जो त्यजितो न धर्म. १
जो इंद्रियां वश नसे, मरणा न जो भी,
निंदा नसे प्रिय, तरी स्तुतिचा न लोभी;
मोठ्या पदासि चढला पर पाहुनीयां,
हर्षें मनीं भरतसे, न करी असूया. २
व्याजस्तुतीहुनि असे वच दूर ज्याचें,
जीच्या समान न मनीं परशल्य जाचे;
धर्माहुनी इतर नीति नसे जयाची,
जो वाट सेवि नच राजमता नयाची. ३
छिद्रें न जो परिसतो इतरा गृहींचीं,
जो आत्मसंमतपथास न सोडितोची;
ज्याला अहंकृति शिवे नच ती स्तुतीही,
यन्नाशसाधनिं न लाभ जनांस कांहीं. ४
जो ध्यातसे निशिदिनीं पद ईश्वराचें,
निष्काम भक्तिरत मानस तें जयाचें;
जो नित्यकर्म विचरूनि दिनावसानीं,
मित्रांसवें अनुभवी सुख काव्यगानीं. ५

आशा न बद्ध करितेच तया नराला,
लोकीं निराश मन दूर करी भयाला;
आत्मप्रभु, प्रभु जरी नच भूमिकेचा,
जोडी अकिंचन जरी, परमार्थ साचा ! ६

त्यालाच धन्यनर सत्य सदा वदावें,
त्याचेंच आचरण निर्मल आचरावें;
त्याचेंच शिक्षण वरूत समस्त लोकीं,
त्याचेंच सौख्य विलसे जगतीं विलोकीं. ७

कुसुमांजलि.

---

## शांति.

### श्लोक.

निशा प्रभाता, जग शांत हें अति,
विषण्ण चित्ता सुख दे पहा किती !
अबाधिता शांति कशी विराजते
फलावपातें क्षण एक मोडते ! १

वसे वनीं कुंजनिकुंजभीतरीं,
दलांवरी, मौक्तिकशा दंवावरी;
सुशुभ्र त्या कौलिकजालकांवरी,
जया सुवर्णी नटवी रवी करीं. २

प्रशांत तें तेज वनान्त लोभवी,
    फलीं विनम्रा तरुंनाहि शोभवी;
नदीतटीं त्या कुटि दाट थाटल्या,
    गिरींद्रभू उंच, लहान भासल्या. ३
समीर हा शांत असे, जसा मुनी,
    न पान हाले पिंवळे पडे वनीं;
समुद्र हा शांत, न वीचि हालती,
    प्रशांत ये व्योम वरूनि खालती. ४
प्रशांत झाला मम मित्र हा तसा,
    फिरूनि देतो सुख लोचनां कसा ?
ह्मणूनि ये शांति मदीय मानसा,
    निराश होतां वद शोक कायसा ? ५

कुसुमांजलि.

---

## ज्ञानेश्वरीची प्रस्तावना.

### ओव्या.

आतां भारतकमळपराग, गीताख्य प्रसंग,
    जो संवादला श्रीरंग, अर्जुनेसीं. १
ना तरी शब्दब्रह्माब्धि, मथियला व्यासबुद्धि,
    निवाडिलें निरवधि, नवनीत हें. २

मग ज्ञानाग्निसंपर्कें, कडसिलें विवेकें,
पद आलें परिपाकें, आमोदासी. ३
जें अपेक्षिजे विरक्तीं, सदा अनुभविजे संतीं,
सोऽहंभावें पारंगतीं, रमिजे जेथ. ४
जें आकर्णिजे भक्तीं, जें आदिवंद्य त्रिजगतीं,
तें भीष्मपर्वीं संगती, सांगिजेल. ५
जें भगवद्गीता ह्मणिजे, जें ब्रह्मेशांनीं प्रशंसिजे,
जें सनकादिकीं सेविजे, आदरेंसीं. ६
जैसें शारदींचिये चंद्रकळे, माजि अमृतकण कोंवळे,
ते वेंचिती मनें मवाळें, चकोरतलगें. ७
तियापरी श्रोतां, अनुभवावी हे कथा,
अति हळुवारपण चित्ता, आणूनियां. ८
हे शब्दंवीण संवादिजे, इंद्रियां नेणतां भोगिजे,
बोलाआदि झोंबिजे, प्रमेयासी. ९
जैसे भ्रमर पराग नेती, परी कमळदळें नेणती,
तैशी परी आहे सेविती, ग्रंथीं इये. १०
कां आपुला ठाय न सांडितां, आलिंगिजे चंद्र प्रगटतां.
हा अनुराग भोगितां, कुमुदिनी जाणे. ११
ऐसेनि गंभीरपणें, स्थिरावलेनि अंतःकरणें,
आथिला तोचि जाणे, मानूं इयें. १२
अहो अर्जुनाचिये पांतीं, जे परिसणया योग्य होती,
तिहीं कृपा करूनि संतीं, अवधान द्यावें. १३

हे सलगी म्यां ह्मणितलें, चरणां लागोनि विनविलें,
प्रभू सखोल ह्रदय आपुलें, ह्मणूनियां. १४
जैसा स्वभाव मायबापांचा, अपत्य बोले जरी बोबडी वाचा,
तरी अधिक तयाचा, संतोष आथी. १५
तैसा तुह्मीं मी अंगिकारिला, सज्जनीं आपुला ह्मणीतला,
तरी उणें सहजें उपसाहला, प्रार्थूं काई. १६
परी अपराध तो आणीक आहे, जें मी गीतार्थ कवळूं पाहें,
तें अवधारा विनवूं लाहें, ह्मणऊनियां. १७
हें अनावर न विचारितां, वायांचि धिंवसा उपनला चित्ता,
येरवीं काय भानुतेजीं खद्योता, शोभा आथी. १८
कीं टिटिभू चांचुवरी, माप सूयें सागरीं,
मी नेणत त्यापरी, प्रवर्तें एथ. १९
आयका आकाश गिवसानें, तरी आणीक त्याहूनि थोर होआवें,
ह्मणऊनि अपाड हें आघवें, निर्धारितां. २०
तया गीतार्थाची थोरी, स्वयें शंभू विवरी,
जेथ भवानी प्रश्न करी, चमत्कारोनि. २१
तेथ हर ह्मणे नेणिजे, देवी जैसें कां स्वरूप तुझें,
तैसें हें नित्य नूतन देखिजे, गीतातत्त्व. २२
हा वेदार्थसागर, जया निद्रिताचा घोर,
तो स्वयें श्रीसर्वेश्वर, प्रत्यक्ष अनुवादला. २३
ऐसें जें अगाध, जेथ वेडावती वेद,
तेथ अल्प मी मतिमंद, काय होय ? २४

हें अपार कैसेनि कवळावें, महातेज कवणें धवळावें,
गगन मुठीं सुवावें, मशकें केवीं ? २५
परी एथ असे एक आधारू, तेणेंचि बोलें मी सधरु,
जैं सानुकूल श्रीगुरु, ज्ञानदेवो ह्मणे. २६
येऱ्हवीं तरी मी मूर्ख, जरी जाहला अविवेक,
तऱ्ही संतकृपादीपक, सोज्वळ असे. २७
लोहाचें कनक होये, हें सामर्थ्य परिसींच आहे,
कां मृतही जीवित लाहे, अमृतसिद्धि. २८
जरी प्रगटे सिद्धिसरस्वती, तऱ्ही मुकया आथि भारती,
एथ वस्तुसामर्थ्यशक्ती, नवल कायी. २९
कां जयातें कामधेनु माय, तयासी अप्राप्य कांहीं आहे?
ह्मणऊनि मी प्रवर्तों लाहे, ग्रंथीं इये. ३०
तरी न्यून तें पुरतें, अधिक तें सरतें,
करूनि घ्यावें हें तुमतें, विनवित असें. ३१

ज्ञानेश्वरी—अध्याय १.

---

## मानसिंगाचा भीमास निरोप.

### आर्या.

प्रथितप्रतापशाली आहें मी कीर्तिधाम हे राजा !
द्यावी कन्या मातें अन्य वराला न योग्य ही भाजा. १

देतां नृपास अन्या भीमा ! होईल विघ्न संततिला;
कृति ऐशीच करावी. कीं स्तवितिल दुष्कृतघ्न संत तिला. २
भीमा ! उदेपुरेशा ! मानीं नृप अन्य तुच्छ पामर ते.
हस्ता जोडुनि येती शरण मला त्यांचि कीं त्रपा मरते. ३
संग्रामीं माझ्याशीं कोणी अद्यापि बा न ते टिकले;
पाटीरकस्तुरीचे होती राजे न लावुनी टिकले ! ४
मजला जरी न देतां अन्याला द्याल या कुमारीला,
जाणा तरि मग तुमच्या माझी पृतना हरील राज्याला. ५
कार्य न होतां माझें, योद्धे अमुचे रणास वरितील;
हरितिल तुमची कीर्ती, भट तुमचे अश्रुपात करितील. ६
कृष्णेला देतां मज जामाता हें असें तदा नातें;
उभयकुळाला भय मग अरिपासूनी कदा असे ना तें. ७
आहें प्रबळ नृपति मी; दुर्बळ अन्यास ये न यश कांहीं;
सिंहपराभव होइल सांगा कधिं तरि बलाढ्य मशकांहीं ? ८
जो नृप मत्पदिं होता वाचादत्ता तदीय ही भार्या,
आहे विश्रुत सर्वा; सुज्ञें मोडूं नये वचा आर्या ! ९
मत्पूर्वनृपा दिधली होती, मग तीच काय अन्यास
द्यावी ? उचित न वाटे द्यावा ज्याचा तयास कीं न्यास. १०

पद्यरत्नमाला.

# दुष्यंत व शकुंतला यांची भेट.

## ओव्या.

कौरववंशीं प्रख्यातकीर्ती, दुष्यंतनामा गुणैकमूर्ती,
श्रेष्ठ भूपाळचक्रवर्ती, वीर्यें शौर्यें आगळा. १
प्राची प्रतीची दक्षिणोत्तरा, चारी दिशा चतुःसमुद्रा,
आक्रमूनि महीमहीध्रा, सुरेंद्र तैसा भूलोकीं २
हिंसाकारी अधर्मकारी, अथवा वर्णसंकरकारी,
दुष्यंतराज्यीं अनाचारी, स्वप्नींही परी असेना. ३
धर्मरीती धर्मधन, सेवूनि संतुष्ट सर्व जन,
स्वस्वकर्मीं सकळ वर्ण, विहिताचारें वर्तती. ४
रोग दारिद्र्य कीं बंधन; दुःख, दुर्भिक्ष्य, अकालमरण;
सर्प, वृश्चिक, तस्कर जाण, दुष्यंतराज्यीं असेना. ५
स्वकाळीं पर्जन्य वोपी उदका, रत्न धान्य समृद्धि पिका,
पृथ्वी पिके हे मांत्रिका, फळे जैशी श्रीविद्या. ६
विष्णूसमान सत्ता बळ, प्रताप सूर्य तेजाळ,
धरातुल्य सहनशील, अक्षोभ जैसा सागरू. ७
निपुण शस्त्रास्त्रप्रहरणीं, आरुढों जाणे सर्ववहनीं,
ऐसा भूपाळचूडामणी, दुष्यंतराजा भूलोकीं. ८
सप्तसमुद्रींचे लोट, धरामंडळीं एकवट,
तैसे सेनेचे संघाट, घेऊनि वना चालिला. ९
वाजी वारण रथ पदाती, संख्या करितां न धरवे गणती,
सेनावसनें सर्व जगती, पांघुरविली समर्थें. १०

देखे प्रचंड महागिरी, विशाळ पर्वताचिया दरी,
जळें तुंबलीं मरितासरीं, समुद्रतुल्य अगाध. ११
नाना वृक्षांचीं अचाट, डांगें लागलीं घनदाट,
माजी निर्झरोदकांचे पाट, सरोवरा धांवती. १२
मस्तकें उचलूनि दिनकर, छाये रक्षिला अंधकार,
माजी श्वापदगणांचे भार, सुखावले सुखवस्ती. १३
मृग मारूनि असंख्यात, भक्षूनि भर्जित अभर्जित,
पारधी खेळतां झाले श्रांत, ते विश्रांति पावले. १४
अवलोकूनि तें वन, राजा करी पुढारां गमन,
तंव देखिलें कश्यपारण्य, सिद्धसाधकीं वसविलें. १५
नदी मालिनी पवित्रजीवनी, वाहे जैशी देवतटिनी,
तरंगालिंगें सुफेनसुमनीं, सुपूजिता शोभती. १६
साष्टांग करूनियां नमन, राहवूनि सेना प्रधान,
निःसंग एकाकी आपण, कश्यपाश्रमीं प्रवेशे. १७
अवलोकूनि कश्यपाश्रम, आंत जों पाहे नृपसत्तम,
तंव कण्वऋषीचा आश्रम, अतिरमणीय देखिला. १८
आदरें जाऊनि तया निकटीं, आंत पाहे पर्णकुटी,
मनुष्यावीण सर्व दृष्टी, गृहसामग्री दिसताहे. १९
मग गर्जून नराधीशें, ह्मणितलें ‘ आश्रमीं कोण असे ? ’
हें परिसोनि इंदिरावेशें, लावण्यकालिका प्रगटली. २०
कनकलतिका सौदामिनी, कीं चंद्रकलिका तनुधारिणी,
सुवर्णकेतकीपत्रवर्णी, सुवर्णखाणी हरिणाक्षी. २१

रूपयौवनचातुर्यलता, बाहेर पातली मुनीश्वरदुहिता,
अत्यादरें धरित्रीकांता, पवित्रासन ओपिलें. २२
स्वागत वदूनियां वचनीं, अर्घ्यें पाद्यें विधिपूजनीं,
राजा तोषवूनि बहुमानीं, कुशलवृत्त विचारिलें. २३
'दर्शनें आनंद जाहला नयना, नाम श्रवण करवावें श्रवणा,
परिचयज्ञानें अंतःकरणा, आप्तभाव भेटवणें.' २४
ऐकोनि चातुर्याची गोष्टी, राजा चमत्कारला पोटीं,
ह्मणे, 'हे वयें अति धाकुटी, परि विचारें वृद्ध दिसताहे!' २५
राजा बोले 'या जगतीं, दुष्यंतनामा चक्रवर्ती,
ऐकिला असेल तरी हे मूर्ती, ओळखें दृष्टी सुजाणे. २६
कण्वऋषीचें दर्शन, इच्छूनि येथें ममागमन,
केव्हां होईल बोल वचन, विलंबें कीं अविलंबें?' २७
शकुंतला ह्मणे, 'नृपती! मम पिता विवेकमूर्ती,
वनफळें घेऊनि शीघ्रगती, आतांच येईल आश्रमा. २८
या लागीं नरेंद्रचूडामणी, क्षण एक बसावें या स्थानीं,
इच्छित कामना ऋषिदर्शनीं, पूर्ण होईल निर्धारें.' २९

दुष्यन्तशकुंतलाख्यान.

---

## रामाचा धांवा.

### आर्या.

श्रीरामा तूं स्वामी अससी माझ्या शिरावरी जागा;
आह्मांसि तुझ्या पायांवांचुनि निर्भय नसे दुजी जागा. १

बहुजन्म विसरलों तुज, परि तूं आह्मांसि विसरला नससी;
अन्तर्बाह्य कृपाळा सर्वा जीवांसि वेष्टुनी असती. २
आतां प्रभो ! दयाळा ! मज दीनावरि करूनियां करुणा,
स्वपदाब्जीं मन्मानसभृंग रमो; उगवुं दे कृपाअरुणा. ३
पायें मज दीनाला, रामा ! लोटूं नकोचि बा दूर;
उद्धरिले बहु पापी, या विषयीं तूं रघूत्तमा शूर. ४
धांव, समर्था! सदया! भवपंकामाजि बुडतसे गाय,
निकटस्था ! धर्मज्ञा ! कौतुक अद्यापि पाहसी काय ? ५
संकट वारूनि रामा ! निजगुणकीर्तन करावया योजीं,
आपलिया थोरपणें, रामा ! मजला स्वकिंकरीं मोजीं. ६
तूं जरि न पावसी तरि पाचारूं संकटांत मी कवणा ?
श्रवणारूढ करुनि हे विनती, रक्षीं मला पदप्रवणा. ७
चरणविलोकनतत्पर वानर आह्मांत राघवा ! गणिले;
साधुद्वेषी जे जे कुल त्यांचें त्वां समूलही खणिलें. ८
त्वद्गुणकीर्तन करितां लज्जा हे पापिणी धरूं न गळा;
हे ताटकांतका ! हा परमार्थ इणेंचि बुडविला सगळा. ९
केले म्यां मनुजांचे आर्जव बहु चाटुकारही जालों,
परि तेथ ताप पाउनि पुनरपि तुजलागिं शरण मी आलों. १०
मन हेंचि फार इच्छी कीं आतां सेवणें तुझे पाय,
तुजवांचुनि इतरांच्या भजनीं मजलागिं होय फळ काय? ११
शरण तरी तुज यावें नमन करावें तुलाचि सुज्ञानें,
गावें तुझेंचि यश बा! सेवावें तुजचि मादृगज्ञानें. १२

ह्मणवुनि तुमचें नामाचि 'राम,' असें हें मुखीं सदा राहो;
हा ज्ञानहीन दीन प्रसन्न होऊनि शीघ्र तारा हो! १३
पाळक तूं विश्वाचा बाळकसा तोंड पसरितों बा! मी;
व्यालकरालकठिनतर काळ कसा वारिसी न हा स्वामी? १४
स्तुति करुनि तुझी तुजला आह्मी अज्ञान काय बा रिझवूं?
गाउनि अमृतगुणांतें हृदयींचे ताप आपले विझवूं. १५
विश्व तुझ्या ठायीं, तूं नामीं, तें नाम साधुच्याहि मुखीं;
तत्संग दे मला मग गुंतेना मी कदापि तुच्छ सुखीं. १६
चापशरधरा, धीरा, आपद्ग्रस्तासि मज नको विसरूं;
या परम संकटीं मीं बा! पदर तुझ्यापुढें किती पसरूं! १७

आर्याकेकावली.

---

## प्रभातवर्णन.

### श्लोक.

निस्तेज शुभ्रांशु दिसे प्रभातीं,
सुधीपुढें अज्ञ जसा विकांती;
प्रदीप शोभालवहीन तैसे,
निष्किंचनांचे गुण होत जैसे. १
तारा होती विरल, निकरीं लोक निःशौर्य जैसे,
जाई तेव्हां तिमिर पळुनी देखतां चोर तैसें;

होई सारें नभ शुचि, जसें साधुहृत् कीं सुहंस,
जाई रात्री त्यजुनि मनुजा श्री जशी आळशास. २
सुकून जाती कुमुदें प्रभातीं
संफुल्ल होती कमलें किती तीं;
चंद्रास्त सूर्योदय या द्वयातें
करी, पहा दैवचरित्र हो तें ! ३
आकाशामधुनी पडो जलनिधीमाजीं रवीं वा बुडो
जावो वा परलोकिं शूर लढण्या, ध्वांतासुराशीं भिडो;
देऊनी क्षितिभृच्छिरीं अहरहः पाद प्रकाशे च हा
तेजस्वी न ढळे जरीहि विपदा येती तया दुःसहा. ४
ते अद्रिराज शरणागत अंधकारा
तैं स्वोदरीं दरिंत रक्षिति देति थारा;
येतां रवी धरिति पाद शिरीं तयाचे
तो त्यां करीं अभय दे सुजनत्व साचें ! ५

**दिंडी.**

कुंदचंदनमकरंद घेत येई !
जलावरुनी स्वच्छंद मोद देई;
मधुपवृंदा करि अंध सुगंधांहीं,
वात ऐसा सुखकंद मंद वाही. ६

षड्ऋतुवर्णन.

## ११

# शिवधनुर्भङ्ग व सीताविवाह.

### श्लोक.

'हां जी ! श्री गुरुजी समर्थ ! ' ह्मणुनी माजीं कटारी सजी;
राजीवाक्ष, अजिंक, निस्तुल नृपांमाजी कशी कास जी.
माजी राम धजी, सभा गजबजी, हे लोकराजी त्यजी
या जीवांतिल काळजी, जनकजी जोडा दिसे सत्य जी. १

ठाके राम उभा, सुनील मृदुभा देखोनि सारी सभा
झाली चित्रनिभाचि चाविति जिभा साश्चर्य लक्षूनि भा.
तेजें दाहि दिशा झळाळित; निशानाथाभमुक्तावळी,
नानारत्नमणीं विभूषणमणीं छाया दिसे भूतळीं. २

जैसा सिंह उफाळला हिमगिरीच्या गव्हरापासुनी;
किंवा दुर्धर धीरधिंग उठिला शार्दूळ उल्हासुनी;
लीले खेळत इक्षुदंड कवळें वेतंडशुंडा उभी;
तैसा राम उठावला धनुवरी, लक्षी मृगाक्षी उभी. ३

झेंपावे जवळीं, मुठीसि कवळी, तों चापघंटावळी
घोषें गाजति, रम्य वाजति, धनुःकोटी गुणीं आवळी;
ओढी, तेचि घडी स्वशक्ति उघडी, गांठी मुठीची मिठी,
ओढी कानवरी, तदाचि नवरी, लाजोनि, लक्षी दिठीं. ४

रामें, लोकाभिरामें, मदनशतसमें, पूर्णकल्याणधामें,
लीलाभूभृल्ललामें, तुकुनि शिवधनू, ओढिलें पूर्णकामें.

ओढी घेतां तडाडी; निबिड दशदिशीं घोष मोठा झडाडी;
मध्यें भंगे; कडाडी; प्रतिनदन नभीं मेघ जैसा गडाडी. ५

विद्युल्लता पडति भूमितटीं तुटोनी;
कीं ते कडे उलथले गिरिचे खुटोनी,
तैसा उठे धनुसि नाद, नभीं भरोनी,
टाळी बसे; कवण सावध सांवरोनी ? ६

श्रीराम, लक्ष्मणहि, गौतमपुत्र, राजा,
गाधेय, जानकि, अशां न पिडी अवाजा.
हे मात्र सावध सहा; इतरां जिवांसीं
मूर्च्छा जडे; विकल ते पुरदेशवासी. ७

ओढूनि कार्मुक करें, अतिलाघवानें
कीं दाविला रस महाद्भुत राघवानें.
केली सभा तदविमोहित तत्क्षणानें.
लक्षी सुलक्षण वधू सुरसेक्षणानें. ८

कौंडिण्य, कौशिक, पराशर, योगिराजे;
शांडिल्यगोत्र मधुकादिक अंगिरा।
ते नाचती गुणकथा कथिती गिरा जे;
तो घोष दोषहर सद्गतिलागिं राजे. ९

देखोनि दोर्बलगती रघुराजयाची
आनंदले द्विज; गुढी उभिती जयाची;
ज्याच्या पदासि वरदेवसमाज याची;
तेही मुखीं करिति भाट्विकी जयाची. १०

कोणी एक सतोष नाचत ऊठे, 'रामा! भला रे!' ह्मणे.
एकीं वल्कल अर्पिलें रघुविरा, छाटी तिज्या ब्राह्मणें;
एकीं व्याघ्रकडासनें उडविलीं, कृष्णाजिनाचीं शतें;
श्रीरामें बहु मानिली स्वशिरसा; आश्चर्य तें भासतें. ११
तों, त्या सौधतटीं सख्यांस निकटीं चांपेकळी, गोरटी,
सीता सिंहकटी ससंभ्रम उठी, कासे घटी गोमटी;
सज्जी चालत सज्जनस्तुतगुणा, ते भव्य भागीरथी
पावे दाशरथी कृपाब्धिजवळीं; ते कोण लीला कथीं? १२
सकलहि कलहंसीसारिख्या चांगचाली
चमकति सखिया, त्यांमाजि सीता निघाली;
उतरति तरुणांगी सौधसोपानमाला;
निरखिति निजभावें आवड्या राघवाला. १३
सहज जंव विलोकी श्री वराया वरा या,
तइं निरखुनि डोळां देवरा देवराया;
हृदयिं बहु सुखावे; पावली भावलीला;
प्रणमन करि रंगीं ते धुनी मेघनीला. १४
समजति मनिं जीतें योगिये योगमाया,
अतिघनगतिनें ते शीघ्र येती नमाया;
अतुर तरि तशी ते जानकी रामचंद्रा
निरखि निजअपांगें, योगिहृद्व्योमचंद्रा. १५
हळुहळु अमलांगी, संगती राजबाळी,
जवळ जवळ आली; डोलते घोंसबाळी;

स्वकरिं कुसुममाला घेउनी, त्या कृपाळा,
धरुनि सुखउमाळा, लक्षिती लोकपाळा. १६
सीतेला स्मरसा धनूसी हरसा, राजा दिसे वीरसा;
मूढाला नरसा, जना नृवरसा, भक्तासि माहेरसा;
देवा ईश्वरसा, रिपूसि गरसा, ज्ञात्यासि चित्सारसा;
ऐसा सर्वरसांसि हेतु परिसा, जो सूर्य हृत्सारसा. १७
आनंदें अळुमाळ लक्षित पदा, वेल्हाळ त्या आंगणीं
लज्जानम्र मदालसा चमकतां, कोल्हाळ भूपागणीं;
हांसे मंद अनालसा अलिकुलस्तोमालका मंगला
रंगीं भव्यतमालनीलविभुच्या ते माळ घाली गळां. १८

सीतास्वयंवर.

---

## वर्षाकाळांतील ओढ्याला कोणी ह्मणतो.

### श्लोक.

वेड्या ओढ्या ! उपकृति करी नित्य जो वारिदानें,
तूतें पुष्टी परम दिधली आज त्या वारिदानें.
या वित्ता का चिरसमय तूं मानिशी राहणारें ?
मूढा आत्मस्थितिस न कधीं विस्मरे शाहणा रे ! १
सत्संगानें क्षणभर गड्या ! लाभसी संपदेतें,
गा गर्वाढ्या ! मज तव परी वृत्ति ही कंप देते.

संपत्तीला विनय खुलतो तो अलंकारसा रे,
लोकीं दोषास्पद समजती हा अहंकार सारे. २
ग्रीष्माचें का स्मरण तव तें जाहलें नष्ट सर्व ?
लक्ष्मीस्पर्शें तुजसि सहसा हा चढे काय गर्व ?
उद्दामोक्ति प्रबळ करिसी, धांवसी स्वैर काय ?
ध्यानीं आणीं परभृत असे हा तुझा पुष्ट काय ! ३
अंधा ! मंदा ! विफळ गगनीं झोंकतोसी तुषार,
पंकक्लिन्ना स्वतनु बघुनी काय ताठा अपार !
वाटे सर्वां उपहससि तूं दावुनी फेनराशी !
या कृत्यानें पतन वरितें रे ! त्वरेनें नराशीं. ४
दुर्दैवाचा कतिपय दिनीं कोरडा लागलाची,
कीं झालासी प्रकट समजें कोरडा लागलाची.
जेव्हां जाई सकल सरुनी हा घनाधार साचा.
तेव्हां मानीं सरस सरला संघ सारा रसाचा. ५
ग्रीष्मीं वारी सरुनि तव हें शुष्क होणार पात्र,
स्रोतःस्थानीं मग दिसतिल प्रस्तरश्रेणि मात्र.
प्राणी कोणी निकट तव ते नाहिं येणार जाण,
आसन्नांता ! त्यज मद, वचें मान माझीं प्रमाण. ६
देती मोदें कुसुमित लता आज पुष्पांजलीतें,
वारा वारी तृणचवर हें तेज शोभे जलीं तें.
जाणारें हें सकळ परि गा ! अन्यपुष्टा लयाला,
अन्यांसाठीं तरि सुविनयें आज वेंचीं तयाला.

गर्वें चित्तीं गणिसि अधुना आपणाशीं नदीन,
जातां मासत्रय परि पुढें होसि गा! दीनदीन.
आली लक्ष्मी तुज घनकृपें; वृत्ति तूं गोड ठेव.
होई मान्य प्रियहि सकलां, कीर्तिची जोड ठेव. ८

काव्यरत्नावली.

---

## अन्योक्तिविलास.

### श्लोक.

पराग कमलांतला करि सुगंधि यज्जीवन
अशा रुचिरमानसीं प्रथम जो करी जीवन;
द्विजेंद्र कलहंस तो वसति केविं आतां करी
वर्दे मलिनपल्वलीं, जमति ज्यांत भेकावली. १
तव मधुर मरन्द स्वेच्छ लाभे जयांना
अलि, कमलवरा! ते मंजु घेतात ताना;
पवन फुकट वाही गंध दाही दिशांला
खचित तव असे तो बंधु कांहीं निराळा! २
'माझी ही तनु चंडभानुकिरणीं ग्रीष्मीं कृशा होइल
संतापाकुल पांथसंहति तदा कोणाकडे पाहिल?
लागे अंतरिं सारखें झुरणिला कासार या आधिनें,
त्याचें जीवन धन्य होय भुवनीं, धिग् वारिधीचें जिणें ! ३

गेले नभीं चहुंकडे उडुनी पतंग,
बैसे रसालकलिकांवरि भृंगसंघ,
पद्माकरा! तनु तुझी सुकतांचि हाय!
हा दीन मीन गतिहीन करील काय? ४
ग्रीष्मीं भानुप्रखरकिरणीं पुष्टि जी या तरूशीं
मालाकारा ! करुनि करुणा, अल्पतोयेंहि देशी;
ती का बापा! कधिं तरि असे शक्य त्या वारिदाला ?
धों धों वर्षासमयिं वितरी जो जनीं वारिधारा. ५
न जेथें भीतीनें निवसति मदोन्मत्त करटी,
जिथें मुक्तामाला करिवरविमुक्ता विखुरती !
अहा ! आतां जातांक्षणिंच परलोकां मृगपती
तयाच्या त्या द्वारीं, शिव! शिव! शिवा शब्द करिती. ६
करी मालाकार प्रकट समदृष्टी तरुकुलीं,
न दावी तो येथें विपुलकरुणा बालबकुलीं;
परी हा एकाकी निजकुसुमगंधास विखरी
दिशा दाही, पाहीं, अलिमधुरवें संकुल करी. ७
मूल स्थूल सुबद्ध, पीवर बृहत् शाखा तुझ्या पादपा !
दुर्गीं भूधरिं वास, भीति कुठुनी आहे तुला सांग पा ?
ज्वालादारुण सर्वभक्षक असा हा क्रूर दावानल
थोडासा परि माझिया उपजवी चित्तांत चिंताज्वर. ८
येतां रम्य वसंत, कोमल नव्या यन्मंजरी सेविल्या,
गीतें मंजुल गाउनी मदभरें लीला तुवां दाविल्या;

दैवें तोचि रसाल दीन सहसा झाला कृशत्वें, तया
त्यागीशी! जरि षट्पदा! तुजपरी तूं धन्य पृथ्वींत या! ९
गजेंद्रा ! सोडोनी निबिड वन हें जा, पळ कसा
न जीवाचा येथें क्षणभरि मदान्धा ! भरंवसा.
करी मानोनीयां प्रखरनखरीं खंडित करी
शिलासंघां; तो हा मृगपति निजे शैलकुहरीं. १०
तरू लावी बागेमधिं चतुर माळी निजकरीं,
तयांमध्यें कोठें तरि बकुल तो स्थापित करी.
असे कोणा ठावें, बसुनि तरु कोणांतरिं असा
भरोनी टाकील प्रचुरनिजगंधें दशदिशा! ११
स्वर्गालंकृति तूं अपूर्व, अमरद्रूंचें विहारस्थल,
इंद्राचें शशिचेंहि, नंदनवना ! पुण्यावलीचें फल.
हें तों सत्य, परंतु नित्य रसिक प्रार्थी विधीला मनीं
'राहो खांडवरंगभूमिनट तो दूरी तुझ्यापासुनी !' १२
जन्म स्वच्छजलांतरीं, मधुरता रामामुखा लाजवी,
वास श्रीहरिच्या करीं, सुरगणां सौगन्ध्य आनंदवी;
कामाचें कविवाणिचेंहि असशी सर्वस्व अंभोरुहा !
ऐसा तूं अतिलुब्ध होशि मधुपीं, मोठा चमत्कार हा! १३
जन्म क्षीरसमुद्रिं, तीन भुवनीं औदार्य ठावें असे,
इंद्राच्या वनिं वास, गंध हरितो देवांचिंही मानसें,
हे सन्मान्य, सुरद्रुमा! गुण तुझे; बा न्यूनता एक ही
पात्रापात्रविचार दानसमयीं नाहीं तुला अल्पही. १४

प्राण्यांना फसवूनि निष्ठुरपणें मी काय तो संहरीं
पश्चात्ताप असा नको करुं, सख्या व्याधा ! कधीं अंतरीं.
पुण्यक्षेत्रि तसा नृपालभवनीं त्वत्तुल्य बा आढळे
मोठा तो खलवृन्द, इंगित जनीं ज्याचें न कोणा कळे. १५
अत्यंत थोर जन दारुणसंकटांत
औदार्यवैभव अपूर्वचि दावितात.
अग्नींत कृष्ण अगरू पडतां विलोकीं,
लोकोत्तर प्रकटि तो निजगंध लोकीं. १६
नम्रत्वें निजगुरुवाक्प्रहार साही
तो मोठें पद मिळवी जगांत पाहीं.
यत्नानें निकषिं न घासिलें जयास
रत्ना त्या नृपतिशिरीं घडे न वास. १७
लोकोपकार करि आपण होउनीच
आजन्मसिद्ध जनिं सज्जनवृत्ति हीच;
इन्दु प्रफुल्लित करीं करि कैरवांला
हें कार्य काय कथिलें कवणें तयाला? १८
पत्रप्रसूनफलभार शिरीं धरीशी;
शीतातपादिकहि संतत सोशितोसी;
तूं वेंचिशी परसुखार्थ निजा तनूही
वृक्षा ! उदारतिलका ! प्रणती तुला ही. १९
इच्छा करी प्रलयपावकचुंबनाची,
वांच्छा धरी खचित चित्तिं हलाहलाची;

भेटावयासि करि यत्न भुजंगराया,
    जो दुर्जनासि वश इच्छितसे कराया. २०
क्षेत्रें हीं किति तरि शुष्क जागजागीं !
    औदार्य प्रकटिशि थोर शैलशृंगीं !
पावोनी पद बहु उंच, माद आला
    तेणें कीं वद, जलदा! विवेक गेला? २१
जो स्वोदरार्थ उसनें धन घेउं लागे
    त्याच्या मुखास जनिं थोर कलंक लागे
आश्चर्य यांत न; परार्थ समुद्र याची
    काळी समग्र तनु होय तया घनाची ! २२
मानोनी मनिं गजराज तुंगगंड
    खंडी जो खरनखरीं शिला प्रचंड,
त्या सिंहावरि विपरीत काळ आला
    मांसाचा कवलहि त्या अलभ्य झाला ! २३

महाराष्ट्रभामिनीविलास.

---

## कर्णार्जुनयुद्ध.

### आर्या.

वर्षति अन्योन्यावरि कर्णार्जुन ते घनावरी घनसे,
    पूरुहूतदूतवातद्युमणिकरां शरगृहांत रीघ नसे. १

तों आला वधसमय द्विजशापहि भूमुखेंचि तो डावें
गिळवी रथचक्र ह्मणे, 'रामास्त्रा प्रेम तूंहि सोडावें.' २
चक्र क्षितिनें गिळितां न स्मरतां भार्गवास्त्र रविजाला
स्पर्शे विषाद, ह्मणती बळतेजोनाश हेतु कवि जाला ३
व्यसनीं पडतां क्षात्रीं धर्मीं होऊनि तो विरस हाय
कर्ण ह्मणे धर्मासहि मानी कीं हा नव्हे चिर सहाय. ४
विधि फिरतां जरि दिधला व्यसनें त्या फार कंप दात्यातें,
परि परिरंभण देउनि होती शुचिसत्वसंपदा त्यातें. ५
तो वृष भूमिग्रस्तस्यंदनचक्रासि उद्धरायातें
उतरे स्वरथाखालें करुनि असें अतुल युद्ध राया! तें. ६
उद्धरण करूं पाहे कर्ण भुजांनीं धरूनि चक्राचें,
परि पृथ्वी सोडीना जाणो व्रत घेतलेंचि नक्राचें! ७
सद्रसना नामातें, कीं सोडी बंधुता न दायातें,
तैशी क्षिति चक्रातें, श्रम झाला फारसा तदा यातें. ८
त्या व्यसनीं तो पाणी आणी नेत्रांसि वृष ह्मणे हाय
काय करील न साहे ते बहु मर्मींहि साहिले घाय. ९
स्ववधोद्यतार्जुनातें कर्ण ह्मणे, 'बळ तुझें अनंत रहा.
स्वस्थ मुहूर्तभरि रणश्रद्धा पुरवील गा अनंतर हा. १०
तूं स्वरथिं, क्षितिवरि मी, तूं सायुध, मी अशस्त्रकवच रणीं,
न वधावें मज जों मी रथचरणीं, लाग तूंहि भवचरणीं. ११
भ्यालों न तुज हरीसही जो न तुला विमुख काय कातर तो?
कथितों यास्तव कीं जन धर्में भवसिंधुनायका! तरतो. १२

रक्षावा धर्म बुधें कुशळाचा धर्म हा निधी, राहें
    स्थिर, जें करिसि निरायुधमथन करिल धर्महानि धीरा हें.' १३
कृष्ण ह्मणे, ' राधेया ! भला बरा स्मरसि आजि धर्मातें
    नीच व्यसनीं बुडतां निंदिति दैवास न स्वकर्मातें. १४
जेव्हां तूं दुर्योधन दुःशासन शकुनि एकमति झालां,
    कैसें कपटद्यूतीं चित्तींहि न धर्म लंघितां भ्यालां. १५
जेव्हां सभेसि नेली पांचाळी मानिलें मनीं शर्म,
    तेव्हां गेला होता कोठें राधासुता तुझा धर्म? १६
फेडी वस्त्र सतीचें जेव्हां उघडें करावया आंग,
    गेला होता कोठें धर्म तुझा तेधवां वृषा सांग? १७
चारुनि विषान्न भीमा सर्प डसविले असें नृपें खोटें
    कर्म करवितां कर्णा! होता तव धर्म तेधवां कोठें? १८
केले दग्ध जतुगृहीं त्वां पांडव वारणावतीं जेव्हां,
    गेला होता कोठें धर्म तुझा सूतनंदना! तेव्हां? १९
अभिमन्यु बाळ बहुतीं वधितां त्वां वारिलें न तें कर्म,
    तेव्हां गेला होता कोठें राधासुता तुझा धर्म? २०
पूर्वीं धर्म न रुचला त्यजिला निपटूनि तो जसा कुचला,
    आतांचि बरा सुचला! काळगृहा सर्व व्हा परासु चला. २१
मागेंचि तुह्मी भजतां धर्माला तरि तुह्मांस वांचविता,
    आतां मरा, न वांचे दीप्तगृहीं जो न तोय सांचविता. २२
मागेंचि धर्म करितां जरि देतां राज्य धर्म वांचविता,
    न जगे जो दुर्भिक्ष व्यसनापूर्वीं न धान्य सांचविता. २३

आतां रक्षील कसा धर्म तुह्मीं वित्तमद्यमत्तांनीं
जो लोटिला दहादां स्वहितहि मानूनि अहित लत्तांनीं. २४
रक्षावा धर्म असा करिशी उपदेश तरि असे मान्य,
राक्षितसों धर्मातें आह्मांला धर्म ठाउका नान्य!' २५
आश्रितजनाभिमानी प्रभु बोले जेधवां असें रागें
निःश्वास वृषें लज्जावनतमुखें सोडिला जसा नागें. २६
न वदे कांहींच रथीं वेंघे, घे सूर्यसूनु चापातें,
सोडी बाण कराया मूर्च्छित शक्रासि सूनुचा (च्या)पातें. २७
तेव्हां परपुरुष ह्मणे, 'पार्था दिव्यास्त्रवात सोडावा,
झोडावा मोडावा वैरद्रुमकर्ण बाण जोडावा.' २८
कर्णावरि बहु कोपे पार्थ जंई तेधवां अनळसाचा
देह ज्वाळामाली भासे त्या रणमखीं अनळ साचा! २९
शर सोडिला रविसुतें धीरजनेंहि स्वधीर या मार्गें
जो सोडिलाचि नव्हता व्यसनांत कधींहि माणि जसा नागें. ३०
तो शर गरधरवरसा पविसा रविसा सरारिसायकसा
पार्थभुजांतरिं शिरला, वल्मीकामाजिं नागनायकसा. ३१
त्या खरशरप्रहारें विव्हळ झाला महेंद्रसुत राया !
जरि होता निकट कुशल मंत्री प्रभु बाणसर्प उतराया. ३२
ऐसा निजभुजविक्रम दाउनि सर्वां भटांसि शुद्ध रणीं
उतरे वृष दावाया भूग्रस्तरथांघ्रिच्याहि उद्धरणीं. ३३

बहु यत्न करी प्रार्थी परि धरिलें सोडिनाचि चाक रसा
द्विजशाप मान्य पतिसा गुरु कर्ण न मान्य तीस चाकरसा. ३४
देव ह्मणे, ' पहिलें गुरुनाम मग स्वधनु बाण बरवें घे,
खंडीं शिर रिपु पुनरपि जों रथरत्नाचिया न वर वेंघे. ' ३५
प्रभुची आज्ञा होतां पार्थ प्रखरेषु सोडुनी त्वरित
रणदक्षा स्वविपक्षा करि कक्षाकेतु खंडुनी ज्वरित. ३६
तुटला ध्वजचि न केवळ विजयाचा भरंवसाहि तुटला हो !
सुहृदश्रुबिंदुसह तो पडला बळधैर्यसेतु फुटला हो ! ३७
केतु च्छेदुनि पार्थ द्युमणिसुताचे हरावया प्राण
जोडी गांडीव गुणीं शत्रुहर हरायुधा असा बाण. ३८
योजुनि महास्त्रमंत्रित शर विजय ह्मणे ' जरि स्वगुरु सर्व
तोषाविले असतील, ज्ञानबळाचा नसेल तिळ गर्व, ३९
विधिनें जोडुनि नेलें असेल जरि कीर्तनें न तप नाशा
तरि या शरें वृष मरो हरिचीच पुरो, पुरो न तपनाशा.' ४०
ऐसें वदोनि पार्थें ओढुनिया सगुण बाण कर्णान्त
पाठविला काळें निज दूत तसा व्हावयासि कर्णान्त. ४१
नयनाग्निकील नीलग्रीवाचा मीनकेतुवरि जैसा
अरिवरि सायकनायक जाय कराया क्षय त्वरित तैसा, ४२
शाणनिशितमुखबाण प्राणभृदीड्यार्कसूनुच्या अमळा
खंडी नाळापासुनि कमळा मारुत तसा शिरःकमळा. ४३
सास्राश्रु शिर वृषाचें प्रथम क्षोणीतळीं गळालें हो,
मग सकुसुमवृष्टि तनू सधर्मभय शत्रुबळ पळालें हो ! ४४

कर्णशरीरापासूनि तेज निघालें दिवाकरीं शिरलें,
गुरुहृच्छोक तमावरि जाणों सत्पुत्ररत्न तें फिरलें! ४६

महाभारत—कर्णपर्व.

---

## तारा आणि काजवा.

### श्लोक.

झालें निद्रित विश्व; शान्त रजनी होती तशी जाहली,
मच्चित्तीं परि शांतता नच मुळीं; नाना विचारावली
येवोनी मम मानसा दुखविती; निद्रा न ये लोचना
आरामीं पडलों ह्मणोनि शयनीं आराम द्याया मना. १
ताऱ्यांची गगनांगणीं द्युति अती होती वरी फांकली,
खालींही पण काजवे पसरिती अल्पप्रभा आपुली;
झाली वृत्ति मदीय या उभयतां तल्लीन ती पाहुनी
गर्वे तारक काजव्यास वदला तारस्वरें तो झणीं:— २
" खद्योता ! द्युति अल्प रे तव किती स्पर्धा कशाला तरी
माझ्याशीं करिशी ? नभांत उडशी तूं व्यर्थ वेड्यापरी;
आहे का उपयोग बोल कवणा त्वद्दीप्तिचा या जनीं
स्पर्धा आजवरी कधीं बलवतासंगें न केली कुणीं. ३
" कोठें कांच ? हिरा कुठें? गगन तें कोठें? धरा ती कुठें ?
राजा थोर कुठें? भिकार तसला तो रंक सांगे कुठें!

मर्यादा त्यजुनी न वर्तन असें थोरांसवें आचरीं,
जा जा जा! तरि खालतींच मशका! येऊं नको तूं वरी!" ४
अंगाचे मग तारकें करुनियां विक्षेप नानापरी
खद्योतास किती तरी हिणाविलें त्या काय सांगूं परी?
खद्योतें परि आपुली न समता ती अल्पही सोडिली
बोले नम्रवचें पुढें करुनियां त्याच्या प्रणामांजली: ५
" व्योमीं वास तुझा, धरेवर असे माझा, मला हें कळे,
तें तूं स्पष्ट वदोनि सांग तुजला मोठेपणा का मिळे?
स्वप्नीं देखिलही खरोखर कसा हेवा न ठावा मशीं
कां रे! व्यर्थ अशीं घरें कटुवचें मन्मर्मि तूं पाडिसी? ६
" गर्वोक्ती परि ही तुझी परिसतां खेदोर्मि हेलावती,
तूं रे थोर जरी तरी तव मला येते अहा कींव ती!
कां हा गर्व असा मनीं धरिशि तूं त्वद्दीप्तिचा निष्फल
चंद्राची द्युति रे! तुझ्याहुनि, रवी त्याच्याहुनी उज्ज्वल. ७
" रे! एकाहुनि एक थोर असती तूंतें न कैसें कळे!
बुद्धिभ्रंश घडे त्वदीय गमतें हा आज गर्वामुळें!
येतां मेघ तुझ्यावरी मग कुठें त्वत्कांति लोपेल रे!
छे! छे! मेघ तरी कशास? नलगे, आहे धुकेंही पुरे. ८
" कान्तीचा जरि आव घालुनि नभीं टेंभा असा वाहसी
आहे अल्प धुकें तया विझविण्यातें शक्य वाटे मशीं
माझी दीप्ति पुरे, मला न कवणा झाला तरी लाभ तो,
गर्वाचें घर खालतीं तव परी येईल हें सांगतों." ९

झालें भाषण हें तदीय न पुरें तों मात ही जाहली
 एकाकीं श्रवणीं कडाड रव ये ! ज्वाला नभीं फांकली !
तारा तो तुटुनी धरेवर पडे खद्योत त्या पाहता
 'गर्वें घातचि जाहला तव बरें !' झाला तया बोलता. १०
हा ! हा ! यापरि आज थोरगरिबां गर्वान्ध धिक्कारिती,
 त्यांनीं मानसिं तारकस्थिति परी ही ठेवणें जागती;
येतां मन्मनिं हा विचार हृदया शान्ती अती वाटली
 निद्रेला वश जाहलों सहज मीं बागेंत रम्यस्थलीं. ११

काव्यरत्नावली.

---

## कुंभकर्णाची झोंप.

### आर्या.

मग सत्वर रात्रिंचर गेले तो कुंभकर्ण उठवाया,
 पाठविले दशवदनें जे तन्निद्राधनासि लुटवाया. १
त्याच्या निकट मधुरुधिरघट शतसंख्याक ठेविती पूर्ण,
 मत्स्यवराहमहिषमृगमांसांचे राशि निर्मिती तूर्ण ! २
विंध्य तसा निजला तो; वदनदरीमाजि निबिड आंधार,
 फार भयंकर भासे, पातालाचेंचि काय तें दार! ३
श्वासानिलरयपतित क्षणदाचर तूलतुल्य ते भ्रमती;
 नासाप्रवेशनिर्गमगतागतें मशकसे किती भ्रमती! ४

हे कुंभकर्ण! राजा बलावितो, मारिती अशा हाका;
हा कांहींच वदेना, निद्राप्रिय इंद्रशत्रुचा काका. ५
एकसहस्र महारवदुंदुभिंसहि ताडिलें कितेकांहीं;
मुद्गरमुसलें करिती ताडन, परि लागती न ते कांहीं! ६
शतसंख्याक जलाचे कुंभहि आणूनि रिचविले कानीं;
केशोन्मूलन केलें, झाले निजकंठ शुष्क हाकांनीं ! ७
चाउनियां काय, बलें धांवति अंगावरूनियां हसती;
मृतवन्यगजास जसे वायसगण वेष्टिती तसे दिसती. ८
दशशतगज देहावर चालविले, ताडिलीं शिलाशिखरें;
निद्रापराजयास्तव केलें त्यांहीं प्रसिद्ध युद्ध खरें ! ९
ऐसा बहुतां यत्नें जागा केला जसा महाकाल,
मधुलोहित घट घटघट सेवी मांसासमेत तत्काल. १०
क्षुत्तृट्परिहारातें करूनि निद्रालसस्वभावानें
क्रव्यादांसि ह्मणे, ‘ मज ऊठविलें किंनिमित्त भावानें ? ’ ११

मंत्ररामायण—युद्धकांड.

---

## सज्जनप्रशंसा.

### ओंव्या.

आतां वंदीन संतसज्जन, जे परमार्थाचें अधिष्ठान,
जयांचेनि गुह्यज्ञान, प्रगटे जनीं. १

जेथ आक्षेप आटले, जेथें प्रयत्न पस्तावले,
जेथें तर्क मंदावले, तर्कितां निजवस्तूसी. २
वळे विवेकाची वेगडी, पडे शब्दाची बोबडी,
जेथें मनाची तातडी, कामा नये. ३
तेचि वस्तु संतसंगें, स्वानुभवें कळों लागे,
त्याचा महिमा वचनीं सांगे, ऐसा कवण? ४
संत आनंदाचें स्थळ, संत सुखाचि केवळ,
नानासंतोषांचें मूळ, ते हे संत. ५
संत विश्रांतीची विश्रांती, संत तृप्तीची निजतृप्ती,
नातरी भक्तीची फलश्रुति, ते हे संत. ६
संत धर्माचें क्षेत्र, संत स्वरूपाचें सत्पात्र,
नातरी पुण्याची पवित्र, पुण्यभूमि. ७
संत समाधीचें मंदिर, संत विवेकाचें भांडार,
नातरी बोलिजे माहेर, सायुज्यमुक्तीचें. ८
मोक्षश्रिया अलंकृत, ऐसे हे संत श्रीमंत,
जीव दरिद्री असंख्यात नृपति केले. ९
महाराजे चक्रवर्ती, झाले आहेत पुढें होती,
परंतु कोणी सायुज्यमुक्ति, देणार नाहीं, १०
ऐसा संतांचा महिमा, बोलिजे तितुकी उणी उपमा,
जयाचेनि मुख्य परमात्मा, प्रगट होय. ११

दासबोध.

# कालियमर्दन.

## श्लोक.

आतां शुकाचार्य ह्मणे, ' नृपा हे, दंडप्रसंगांत कृपाच पां हे,
कीं पादपद्में जगदीश्वरानें, तो मर्दिला सर्प रमावरानें. १
क्रुद्ध तो ऱ्हद्‌जळीं परमेशा, लक्षितो दुरुनि साप रमेशा,
त्या खळा फणिसही हरि पाहे, ते कथा परिस दिव्य नृपा हे. २
थोर वेग वदनीं रसनांचे, दुर्विष प्रतिमुखीं रस नाचे,
दंत आंत शिशु भूमिधराचे, प्रांत चाटित असे अधरांचे. ३
ज्याच्या विषाचे उदकीं चपेटे, वनाग्नि ज्याच्या नयनेंच पेटे,
देखे असा गर्व भुजंगमाचा, निर्माणकर्ता स्थिरजंगमाचा. ४
जवळि खेळत खेळत पातला, झडप घालुनियां कर घातला,
गरगरां धरुनी भ्रमवी नभीं, गरुड सर्प जसा धरितां न भी. ५
अहो तोंही पाहे अवसर डसायास हरिला,
परंतु श्रीकृष्णें भ्रमण करितां गर्व हरिला
शरीरीं फांसोळ्या बहु खुळखुळ्या होउनि ढिल्या,
गती तत्प्राणाच्या सकळहि गळ्यामाजिं चढल्या. ६
नासिलें भ्रमवितांचि बळातें, क्षीण देखुनि खळा प्रबळातें,
शेंपुटी धरि अधोमुख हातीं, कौतुकें स्वजन सर्व पहाती. ७
समग्रही सत्व अलक्ष यातें, नेलें तरी देहबळ क्षयातें,
निःसत्व मानी फणि आपणातें, तरी बळें तो उचली फणातें. ८
अधोमुख श्रीहरि साप हातीं, धरी असा गोपवधू पहाती
डसावया जों मुख सांवरी तों, देखे हरी तो सहसा वरी तो. ९

मुरडुनि नरडी करें दुजानें, धरुनि असें धरिलेंच पुच्छ ज्यानें,
रगडुनि फणिकंठ कैटभारी, उपरि चढे करि नाट्य नीट भारी. १०
फणांवरी सारथि पांडवांचा, आरंभ मांडी मग तांडवाचा,
पादांबुजीं देवशिखामणीचा, फणीचिया दीप्ति शिखामणीचा. ११
उदक चंचळ चंचळ त्या फणा, फिरवितो फणि जे रिति गोफणा,
चपळ नृत्य करी वरि मोकळा, सफळ ज्या करितां सकळा कळा १२
जो प्रवर्तक विलासकळांचा, जो कलाप्रद कला सकलांचा,
जे शिवादिक गुरू नटनाचे, त्यांसि आदिगुरु तो नट नाचे. १३
जो रची अघटिता घटनातें, तो करी फणिवरी नटनातें,
काय विस्मय विलासमयाचा, हा कथारस तया समयाचा. १४
चपळ तो पळतो उदकावरी, उखळतो खळ तो हरि आंवरी,
कुलपती लपती फणि ते किती, भुजग ती जगती तळ टाकिती. १५
आरंभल्या ऊपरि नृत्य काय, तेथें करी कौतुक विश्वकाय,
देवीं कसा श्रीहरि पूजिला हो, श्रोत्यांसि या ऊपरि तोचि लाहो १६
विमानांतुनी वृंद वृंदारकांचे, नभीं मल्लिकाकुंदमंदारकांचे,
फुलांचे समूह स्वनाथावरी ते, बहू वर्षती ज्यासि लक्ष्मी वरीते. १७
आणूनि नानाविध पूजनाचे, पदार्थ जेथें सुरराज नाचे,
ते पूजिती त्या पुरुषोत्तमातें, जो पूज्य सर्वां सुरसत्तमातें. १८
पूजूनि पुष्पादि अनेकरीतीं, स्तोत्रें विचित्रें नमनें करीतीं,
सुवाद्यघोषें सुर गीत नाना, गंधर्व गाती करिती तनाना. १९

# तुफान.

## श्लोक.

कधीं क्षुब्ध राज़ाधिराजासमान
करी गर्जना घोर जेव्हां तुफान,
धडाडा धडाके उठे लाट घाया
पहा डोंगरा भूमि लोकांस खाया! १

प्रभंजन भयंकर ध्वनि करीत जेव्हां सुटे,
तदा जलसमूह पर्वतसमान वेगें उठे;
अनंत लहरी अनंतर विशाल पृष्ठावरी
तुझ्या दिसति, शेष कीं उचलुनी फणांतें धरी. २

जेव्हां देवहि दैत्य धीर अमृता काढूं तुझ्या सज्जले,
तेव्हां मंदर मंथदंड करुनि त्यांनीं तुला मंथिलें.
त्या काळीं तव देहिं वेग शिरला आहे अजूनीहि तो
वेळोवेळ फिरून बाहिर पडूं हे सागरा! पाहतो. ३

अक्राळ विक्राळ करीत गर्जन
भूतें स्मशानीं करितात नर्तन,
मदांध कल्लोळ असे भयंकर
उठूं पहातात निळ्या जलावर. ४

पूर्वीं सुरा पिउन ज्यापरि मत्त झाले
अन्योन्य दैत्य तव तीरिं लढूं निघाले,
कल्लोळ हे उठुन यापरि आपसांत
भांडावया बघति धांवति गर्जतात. ५

ते रोषें उठती जसे महिष कीं रोंखूनियां चालती
रानीं धुंद वराहसे धडकुनी ब्रह्मांड नादावती
खालीं नंतर अव्यवस्थितपणें लोटांगणें घालिती
वारा येउन त्यां पुन्हांहि उठवी! चाले अशी पद्धती. ६
ऐसें तूं अनुरूप कर्म करितां हे सागरा! घोरसें
तूतें पाहिल कोण? धीर नर तो भीती कुणाला नसे ?
प्राणी कोण अधन्य ऐहिक सुखा कंटाळला बापुडा
हाकूं इच्छिल जो जहाज करुनी धैर्ये जिवाचा धडा. ७

समुद्र.

---

## ईशवैभव.

### श्लोक.

पांथा! तूं दैवशाली बघ बघ हिरवी वृक्षराजी दरी हे!
वेंघोनां पर्वताली वरुन रुचिरसें विश्वसौंदर्य पाहीं.
पाहें तीं दूर कैशीं अभिनव शिखरें चुंबिती व्योमभागा,
मैदानामाजिं शेतें लघु लघु हिरवीं साजिरीं देख तूं गा. १
मोठाले राजवाडे, लघुगुरु शिखरें साजिरीं मंदिरांचीं,
मेदी तीं मेघ जेथें, बघ बघ नगरें हीं अशीं दक्षिणेचीं,
अद्रीच्या पायथ्याशीं खचुन तरुलता माजलें रान भारी,
अस्मानी धीर पाहे गुरुतर पसरे सिंधु हा दूरवेरी. २

ही नैसर्गिक रम्य विश्वरचना आह्मीं रचावी कशी,
हे पांथा! कुतुकें विशुद्ध ह्रदयें हीतें न कां पाहशी,
शोभा सुंदर विश्वनिर्मित जधीं चित्तीं ठसावेल ती,
तेंव्हां होशिल धन्य; होइन असा तल्लीन मी त्वन्मती. ३
ओढा निर्मळ आणि सुंदर असा वाहे तुझ्या कारणें,
वाहे मंद वसंतवात तुझिया सौख्यार्थ तूं जाणणें,
पाहें खोल दरींत, घोर विपिनीं या अद्रिच्या गव्हरीं,
आनंदध्वनि मंजु मंजु निघती, सौख्या तुझ्या कोटरीं. ४
सारें विश्व जसें महा चतुरता खर्चूनियां निर्मिलें,
पांथा! ओळखुनी तया, सुह्रदयें, घे सौख्य लोकीं भलें,
पाहें शुष्क सुमीं किती कुशलता ! सौंदर्य आहे किती !
वर्णावा कवणें अगाध महिमा धन्या प्रभूची कृती ! ५
खालीं सर्व अफाट विश्व ! वरतीं तेजोनिधी गोल हा,
कैंचा तर्क इथें, सुरेख घटना कारागिराची पहा,
यंत्रें तीं चुकतील, चूक न इथें, आश्चर्य भावी मती,
वर्णावा कवणें अगाध महिमा धन्या प्रभूची कृती ! ६
सृष्टीची दाखवूनी, अघटित घटना मूर्त सौंदर्यखाणी,
जो नाना गौरवांची सहज जनमुखें गाववी गोड गाणीं,
मोदें ऐशा प्रभूचे चरण धरुन तत्प्रेमदीक्षेसि घेसी
तूतें लाधेल पांथा ! सुखसदन तयें धन्य कैसा न होसी ? ७

काव्यरत्नावली.

# कवीचें मन.

## श्लोक.

तो रामराजा जग त्यास जाणी, विख्यातिही सोज्वळ काय आणी!
युद्धीं जरी हा कृतकार्य होतो, कीर्तीस वाल्मीकिच मूळ होतो. १
किती अल्प राजे सुकीर्तीस आले, कवी ज्यांस वर्णावया सिद्ध झाले
किती थोर राजेहि लोपूनि गेले, कथाग्रंथ कोणींच ज्यांचे न केले. २
तीं रामसीता हनुमान् हि तो कीं, लंकेंत तो रावण दुष्ट लोकीं;
रानें नद्या डोंगर दूरदेश, आले मनीं सर्व जगत्प्रदेश. ३
मधुवनीं मग तो रचना करी, कविविना न घडेच अशी खरी;
सकल विश्व जणों दिसतें पुढें, मन तसें रचतां, रमतां गढे. ४
चित्रें अशीं रेखटिलीं सुरेख, त्या वाल्मिकीची अतिशक्ति देख;
रे देव होता ऋषि तो खरा कीं, ज्याचें फिरे तें मन या त्रिलोकीं. ५
तो कल्पनामूर्ति स्वतांच ओती, तेथें पुढें रंग अनेक येती;
वीरादि सारे पसरून जाती, निर्माण होतात नव्याचि जाती! ६
तन्द्री मनाची कवि मात्र जाणी, जेव्हां मनीं विश्व अनंत आणी;
हा देह, हा मी, नच भान ज्याला, पाही जगांतील अनंत लीला. ७
अंतर्गोल दिसे कवीस मुखसा कीं पाहतां आरसा,
आहे ज्ञान कसें? प्रकारहि किती? शोधी करी आरसा;
ज्ञानीं ज्ञान वसे, दिसे नवलसें चित्तीं स्वताच्या अहा!
कैसे हे स्मृतिचे तरङ्ग उठती? आश्चर्य होतें पहा! ८
आहे दुःख कसें, कसें सुख असे, हें सर्व जाणे कवी,
इच्छा काय मनीं प्रकार करिती, ह्या शक्तिला चाळवी;

आहे द्वेष कसा? कसा भ्रमवितो लोकांस जों पाहिलें,
तों तों शुद्धमनें विचित्र मननें सृष्टींत या तो झुले. ९
चित्तीं आंत कसा प्रयत्न घडतो, जीवास जो त्रासवी,
कैसी आग सदा मनीं धडकती हें सर्व पाही कवी;
आहे धर्म कसा, अधर्महि कसा, हें स्वच्छ ज्याला कळे;
ह्या वाल्मीकिकवीश्वरें मधुरसे काव्यार्थ ते जोडले. १०

मन.

---

# ईशप्रार्थना.

## श्लोक.

सदाश्रितपदा! सदाशिवमनोविनोदास्पदा!
स्वदासवशमानसा! कलिमलांतका! कामदा!
वदान्यजनसद्गुरो! प्रशमितामितासन्मदा!
गदारिदरनंदकांबुजधरा! नमस्ते सदा. १
व्रजावन करावया बसविलें नखाग्रीं धरा,
सलील तइं मंदराख्यहि नग स्वपृष्ठीं धरा;
वराहतनु घेउनी उचलिली रदाग्रें धरा,
सुदुर्धर तुह्मां कसा पतित हा न कां उद्धरा? २
नतावनधृतव्रत! ज्वलन तूंचि बाधावनीं,
पदप्रणतसंकटीं प्रजव तूंचि बा! धावनीं;

दया प्रकट दाखवी कवण सांग त्या वारणीं ?
    सतीव्यसनवारणीं ? जयजयार्थ त्या वा रणीं ? ३
मला निरखितां भवच्चरणकन्यका आपगा
    ह्मणे ' अगइ ! ऐकिलेंहि न कधीं असें पाप ! ' गा;
कर श्रवणिं ठेवि ते, नुघडि नेत्र, घे भीतिला,
    न घालिन भिडेस मी जरिहि कार्यलोभी तिला. ४
पटुत्व सकलेंद्रियीं, मनुजता सुवंशीं जनीं,
    द्विजत्वहि दिलें भलें, बहु अलभ्य जें कीं जनीं;
यशःश्रवणकीर्तनीं रुचि दिली. तरी हा ' वरा, '
    ह्मणे, 'अधिक द्याच कीं,' अखिल याचकीं हावरा. ५
दयाब्द! वळशील तूं तरि न चातकां सेवकां
    उणें किमपि; भाविकां उबगशील तूं देव कां?
अनन्यगतिका जना निरखितांचि सोपद्रवा,
    तुझेंचि करुणार्णवा! मन धरी उमोप द्रवा. ६
कळी करि सुनिर्मळीं परम उग्र दावा नळीं,
    तयांत अविशुद्ध मी, शलभ जेविं दावानलीं;
व्रणार्थ पशुच्या शिरावरि वनीं उभे काकसे,
    स्मरादि रिपु मन्मनीं; अहि न काळ भेका कसे? ७
जिणें रस पहावया प्रशिथिलीं रदीं चाविलीं,
    सुवासहि कळावया प्रथम नासिकीं लाविलीं;
तुह्मांसि शबरी तशीं बदरिकाफळें दे, जुनी
    कथा आशि असो, पहा स्वचरितें तुह्मीं मेजुनी. ८

चिकित्सक भला भला ह्मणुनि फार वाखाणिला,
जरी बहुजनामयद्रुम समूळही खाणिला;
तथापि अतिदुःसह स्वगद शत्रुच्या अत्यया
विना न हृदयीं धरी सरुज पामर प्रत्यया. ९
' भले परिशिले सुरासुरनरीं तसे लक्ष मी, '
ह्मणोत ह्मणणार बा! तुज असा नसेल क्षमी;
उरीं भृगुपदाहती मिरवितोसि, अद्यापि ती
कवी तव यशःकथा नवसुधानवद्या पिती. १०
तुझ्या गुणकथा महासुरभि, त्यांत ही रासभी
शिरे विषयवासना, जसि शुका अहीरास भी;
तसी न इतरांसि भी, इस सदंडही हाकिती,
तथापि बहु लाथळी; मग अदंड मी हा किती? ११
कथासुरभि या भल्या स्वजननीहुनी वाटती,
शिशूंस जरठांसही निरखितां रसें दाटती;
दुहोत भलते सदा तरि न लेशही आटती,
स्ववत्समल भक्षिती परि न सर्वथा बाटती. १२
ध्रुव स्तवनिं आवडी धरि, ह्मणोनि अत्यादरें
तुह्मीं करुनि दाविलीं, शिवुनि गल्ल सत्या दरें.
तसें मज करा, कराबुज धरा शिरीं मावरा !
वराभयपरा ! पराक्रमपटो ! मना आंवरा. १३
करांबुज असो; नसें उचित त्यास मी पामर,
प्रणाम करिती पदाप्रतिहि सन्मुनी सामर;

पदाब्जरजही जगत्त्रयनमस्क्रियाभाजन,
प्रसादचतुरा ! कसा तरि करा बरा हा जन. १४
किती वय ! कसें तप प्रखर ! काय विश्वास तो,
ध्रुव ध्रुव खरा; स्तवा उचित होय विश्वास तो.
कशी तुळितसां तुह्मी प्रकट मेरुशीं मोहरी ?
प्रसाद करितां उणें अधिक नाठवा हो ! हरी ! १५
तुह्मांसमच हें गुणें अणु उणें नसे नाम, हा
दिसे अधिकही तसा गुण तुला असेना महा;
सदैव भलत्यासही सुलभ; आणखी गायका
छळी न; न अधोगति क्षणहि दे जगन्नायका! १६
छळाल कृपणासि कां? अजि दयानिधे! कांपिती
भटांसि भट संगरीं; परि न कातरां दापिती;
कराल तितुकी कृपा बहु अहो! शरण्या! तमीं
बुडोनि शरणागत श्रमतसें अरण्यांत मी. १७
मुखासि जंव पातलीं 'श्रम, ' अरण्य' ऐसीं पदें,
निजस्मृतिस जाहलीं विषय तीं तव श्रीपदें;
गुरूक्तिस करावया सफळ जानकीजीवना!
धरासुरतपःफळें त्वरित धांवलीं जीं वना. १८
तईं प्रभुवरा! तसे सदय; कां असे आज हो!
विचारुनि पहा बरें निजमनीं महाराज हो!
वनोवनिं फिरा पिशापरि; ह्मणा अहोरात्र 'हा!'
नसे कुशल भाषणीं, परि असे कृपापात्र हा. १९

प्रसिद्ध तुमचे महासदय पाय; जीवांकडे
चुकी ह्मणुनि होतिल क्षणहि काय जी! वांकडे?
न निष्ठुर पिता; ह्मणे मनिं ' न हो प्रजा टोणपी? '
अपथ्यरुचि रुग्ण तो कटुक ओखदें कोण पी? २०
तुझें यशचि तारितें; परि न केवळा तारवे,
सहाय असिला असे तरिच शत्रुला मारवे;
न भागवत भेटतां, न घडतांहि सत्संगती,
न अज्ञहृदयें तसीं तव यशोरसीं रंगती. २१

केकावली.

---

## स्फुटकविता.

### श्लोक.

रुंडें ज्यावरि लोंबती सुरसरिद्वारी स्त्रवे ज्यावरी,
विद्युत्प्राय ललाटलोचनपुटज्योती जयातें वरी;
ज्यामाजीं लघुकेतकापरि गमे बालेन्दुलेखा मना,
रक्षो नागनिबद्ध तो शिवजटाजूट त्रिकाळीं जना. १
हे देवा, विश्वमूर्ते! नमन करुनियां मी तुझ्या पादपद्मा,
मागें, दे तूं मला श्री दुरित सकलही नाशुनी, भद्रसद्मा!
श्रेयोदायी प्रभांची खनिच असशि तूं, विश्वनाथा! प्रसादें
जेणें होईल माझें सकलहि बरवें, ऐशिया वाग्रसा दे. २

शास्त्रज्ञता शिक्षितवाक् विशुद्ध,
प्रौढत्व आणी सहज प्रबोध;
कालज्ञता स्फूर्ति अशा गुणांहीं
जो युक्त त्या कांहिं अशक्य नाहीं.
मूढें आणिक कातरें गुण नव्हे भक्तीहि भृत्यें तसा,
प्रज्ञाशौर्ययुतेंहि भक्तिरहितें होईल तो कायसा?
प्रज्ञाविक्रमभक्तियुक्त असती ते भृत्य भूतिप्रद,
अन्य स्त्रीसम पोषणीय, सदसत्काळीं दयेचें पद. ४
आधीं राजास भ्यावें, मग नृपसचिवां किंकरां भीत जावें,
तत्प्रेमस्थां विटांही भिउनि परिजनां सेवकानें झिजावें;
पोटासाठीं मुखातें पसरुनि शुनकातुल्य दैन्यें बसावें
स्वामिद्वारीं, तयानें हडहड करितांही तया न त्यजावें. ५
विद्यासागर फार थोर, कधिंही मिथ्या न जे बोलती,
तेहीं नित्य उठूनियां गुण नृपीं खोटेहि वाखाणिती;
दैन्याचें घर एक लोभ, फळ हें त्याचें असे, अन्यथा
राजाही तृणसा तया गमतसे निर्लोभ जो सर्वथा. ६
कुलातें लज्जेतें त्यजि, निजयशातें न समजे,
जनीं सन्मानातें, हित अहित कांहींच नुमजे;
निजा देहातेंही विकुनि धनिकाला, शिरिं धरी
तदाज्ञा; लोभें जो परवशचि तो काय न करी? ७
जी बीजोत्पत्तिहेतु, प्रथमचि विधिनें निर्मिली जी, हवी जी
घे, विश्वा वांचवी जी, ह्मणति गुण जिचा शब्द, होत्री असे जी,

ज्यांच्या अस्तोदयांनीं पळविपळघटीज्ञान होतें जगाला,
ह्या ज्याच्या आठ मूर्ती प्रकट दिसति तो शंभु रक्षो तुह्मांला! ८

मालतीमाधव, मुद्राराक्षस व शाकुंतल.

---

## महाभारताची थोरवी.

### ओंव्या.

आतां अवधारा कथा गहन, जे सकळकथां जन्मस्थान,
कीं अभिनव उद्यान, विवेकतरूचें. १
नातरी सर्वसुखांची आदी, जे प्रमेयमहानिधी,
नानानवरससुखाब्धी, परिपूर्ण हे. २
कीं परमधाम प्रगट, सर्व विद्यांचें मूळपीठ,
शास्त्रजातां वसौट, अशेषांचें. ३
नातरी सकळ धर्मांचें माहेर, सज्जनांचें जिव्हार,
लावण्यरत्नभांडार, शारदेचें. ४
नानाकथारूपें भारती, प्रगटली असे त्रिजगतीं,
आविष्करोनि महामती, व्यासाचिये. ५
ह्मणोनि हा काव्यां रावो, ग्रंथगुरुवतींचा ठावो,
येथोनि रसां झाला आवो, रसाळपणाचा. ६
तेवींचि आयिका आणीक एक, येथूनि शब्दश्री सच्छास्त्रिक,
आणि महाबोधीं कोंवळीक. दुणावली. ७

येथ चातुर्य शाहणें झालें, प्रमेय रुचीस आलें,
आणि सौभाग्य पोखलें, सुखाचें येथ. ८
माधुर्यीं मधुरता, शृंगारीं सुरेखता,
रूढपण उचितां, दिसलें भलें. ९
येथ कळाविद्पण कळा, पुण्यासि प्रताप आगळा,
ह्मणऊन जनमेजयाचे अवलीळा, दोष हरले. १०
आणि पाहतां नावेक, रंगीं सुरंगतेची आगळिक,
गुणा सुगुणपणाचे बिक, बहुवस एथ. ११
भानुतेजें धवळलें, जैसें त्रैलोक्य दिसे उजाळिलें,
तैसें व्यासमति कवळिलें, मिरवे विश्व. १२
कां सक्षेत्रीं बीज घातलें, तें आपुलियापरी विस्तारिलें,
तैसें भारतीं सुरवाडलें, अर्थजात. १३
नातरी नगरांतरीं वसिजे, तरी नागरचि होइजे,
तैसें व्यासोक्तितेजें, धवळत सकळ. १४
कीं प्रथमवयसाकाळीं, लावण्याची नव्हाळी,
प्रगटे जैसी आगळी, अंगनाआंगीं. १५
नातरी उद्यानीं माधवी घडे, तेथ वनशोभेची खाणी उघडे,
आदिलापासोनि अपाडें, जियापरी. १६
नाना घनीभूत सुवर्ण, जैसें न्याहाळितां साधारण,
मग अळंकारीं बरवेपण, निवाड दावी. १७
तैसें व्यासोक्तीं अळंकारिलें, आवडे तें बरवेपण पातलें,
तें जाणोनि आश्रयिलें, इतिहासीं. १८

नाना पुरतिये प्रतिष्ठेलागीं, सात्विव धरूनि आंगीं,
पुराणें आख्यानरूपें जगीं, भारता आलीं. १९
ह्मणवूनि महाभारतीं नाहीं, तें नोहे लोकीं तिहीं,
येणें कारणें ह्मणिजे पाहीं, व्यासोच्छिष्ट जगत्त्रय. २०

ज्ञानेश्वरी, अ. १

---

## हंस नलाकडून दमयंतीकडे जातो.

### श्लोक.

खग मग नगरीचे गोपुरीं झेंप घाली,
मृदुपवनगवाक्षीं बैसतां झोंप आली;
तदुपरि जवशाली वेंघला चंद्रशाला,
निरखि विततशाला राजधानी विशाला. १
तेणें तसें नगर तें धरितां निढारीं,
तेथें विलासवन एक दिसे पुढारीं;
जेथें सुशीतळ महीतळ सांद्र साई,
जाई जुई फुलमयी बहु आंबराई. २
तो मंडळाकृति फिरे उतरावयाला,
भैमीमुखेंदुपरिवेष ह्मणों तयाला;
तेथें महीवरि असा खग बैसताहे,
कीं सुंदरी निजकुतूहल जेविं पाहे. ३

जो बैसतां चपळपक्षपुटीं धरेला,
हाणीतसे फडफडां ध्वनि हो उदेला;
पाहे तया खगवरासि वरानना हे,
मानी मनीं नवलही मग बोलताहे. ४
‘ असा पक्षी लक्षी बहुविहगलक्षीं न मिळता
सुवर्णी जो वर्णी वद कवण वर्णी कवयिता ?
अगाई ! हा बाई ! त्वरित वरि जाईल पळुनी !
धरूं जातें हातें हळुहळु तयातें न कळुनी.’ ५
ऐसें वदे मग तयास धरावया हे
तैं होय हंसगमना पहिलीच आहे.
वाजेच ना वलय नूपुरनाद नोहे
तो तद्गतीस निरखूनि कसा न मोहे? ६
हे मंदमंदपद सुंदर कुंददंती
चाले जसा मदधुरंधर इंद्रदंती,
हंसा धरूं जवळि जाय कृशोदरी ते
निष्कंप कंकणकरासि पुढें करीते. ७
गवसलाच असा खग भासला,
तंव तदीय सखीजन हांसला;
मग सवेंच बुझावुनि हांकिला,
उडविलाचि पिटाळुन लाविला. ८
कांहीं उडोनि गगनीं मग नीट येतो
नाहींच दूर न समीप बसे तसा तो

पाहे सुधाकरमुखी कलहंसराया
लाहे मनोरथ तयास पुन्हां धराया. ९
' हंस धरीन ह्मणोनि मनोरथ हा मज, होय विनोद तुह्मांला!
हा कलहंस पिटाळवितांहि, पुन्हा उडवाल तया विहगाला!
जा परत्याच! तुह्मी नलगेचि,' असें वदुनी नृपराजसुता ते
राहविला सखिचा जन, आपण मात्र तयास धरूं मग जाते. १०
रागेजली अरुणकांति विराजवाते,
ही एकली सुतनु चंद्रकला तशी ते;
गेली हळूच कलहंस समीप केला,
कांहीं पुढें फडकला अवलोकिजेला. ११
आणीकही पद न वाजत मंद चाले,
जो चालतां पदर सांवरिला न हाले;
हेंही करी निज करीं खग सांपडेसा,
तोही हळूहळुच होय पलीकडेसा. १२
मदगजगमनेनें मागुती चाल केली
विनत तनुलता हे तत्समीपास गेली;
पुनरपि फडके तो फारसा दूर नाहीं,
जवळि जवळि ऐसा भासला हंस कांहीं. १३
हंसें तदा चतुरसंमत युक्ति केली,
ते चालवीत सुतनू बहु दूर नेली;

छाया तियेसि दुसरी तिसरी वनाळी,
जे सांवळी युवतितुल्य दिसे निराळी. १४

नलोपाख्यान.

---

## मातेचें प्रेम.

### श्लोक.

' आहे पैल समुद्र, तत्तल तुवां बा! काय रे! पाहिलें?
किंवा तत्सिकताकणां निजबळें आहेस कां मोजिलें?
पाहें अंबर हें वरी, गणियली उंची तयाची तरी '?
'नाहीं! ' धिक् ! गणिशी अगाध जननीप्रेमा कसा यावरी?' १
' आकाशीं प्रभुचा निदेश वरुनी राज्यीं तयाच्या फिरे,
त्या सूर्यासह दोन शब्द वदुनी आलास तूं काय रे?
स्वर्गीं इंद्रसभेंत तूं बघितलीं कार्यें सुरांचीं तरी '?
'नाहीं'? धिक् ! मग जाणशील जननीप्रेमा कसा यावरी?' २
' पाहें तत्परतें खपोनि जमवी रात्रीं दिनीं जी मधा,
ऐशी ती मधुमक्षिका त्रिभुवनीं मान्या असे सर्वदा,
तीचे ते श्रम सर्वही बुधवरा ! आहेत तीकारणें
मातेचे श्रम निष्कलंक अपुल्या बाळार्थची जाणणें. ' ३
प्रेमाचें अतिदिव्य कोमल असें वारें बघूं पाहसी ?
बुद्धीचे अतिशुद्ध, सत्य, अवघे सिद्धांत तूं मागसी ?

तूंतें शुद्ध अगाध वत्सल असें बा पाहिजे चित्र रे ?
  पाहें प्रेमळ दृष्टि ती जननिची ! ब्रह्मांड तेथें भरे.' ४
'ऐशी प्रेमळदिव्यदृष्टि जग हें निर्माण झालें जधीं,
  तेव्हां पासुनि नीतितें शिकवुनी विद्वान् करी धीरधी,
संतां यापरि दुस्तरा भवजलीं नौकाचि ती जाहली,
  धन्या इच्छितकामदा त्रिभुवनीं ही कामधेनू भली.' ५
'वायूच्या पटलीं, धरातळवटीं, नीलांबरीं सारिखें
  शोभे ईश्वरवैभव ! क्षण सुधी जे पाहती कौतुकें,
ऐसें अद्भुत तेज दे, करि कृपा ईशावरी जी भली,
  धन्या प्रेमळ दृष्टि ती त्रिभुवनीं ! धन्याचि ती माउली ! ६

काव्यरत्नावली.

---

## शारदानमन.

### ओंव्या.

आतां नमूं सरसिजोद्भवकुमरी, जे विलसे सदा कविजिव्हाग्रीं,
  जीचे वरें मूकही करी, वाचस्पतीसीं विवादा. १
जे आनंदसरोवरमराळिका; जे चातुर्यचंपककळिका,
  जिचे कृपेची करून नौका, कविबाळका नेत परतीरा. २
कृपें तुझे विरंचिकुमरी, जन्मांध होती महा जोहरी,
  अति मूढ तो वेदार्थ करी, शक्रपदीं बैसे रंक. ३

अंबे! तूं कविहृदयाब्जभ्रमरी, कीं निजानंदसागरींची लहरी,
वाग्वल्ली तूं बैसे जिव्हाग्रीं, विरूढे सफळ सर्वदा. ४
विवेकहंस शुद्ध धवळ,त्यावरी तुझें आसन चंचळ,
तप्तकांचन जैसें सुढाळ, तैसें निर्मळ निजांग तुझें. ५
शुभ्र कंचुकी शुभ्र अंबर, दिव्य मुक्तलग अलंकार,
निजबोधवीणा घेऊनि सुस्वर, गायन करिसी स्वानंदें. ६
ऐकतां शारदेचें गायन, तन्मय विधि विष्णु ईशान,
अंबे! तुझें सौंदर्य पाहून, मीनकेतन तटस्थ. ७
रंभा उर्वशी तिलोत्तमा, सावित्री आणि मुख्य रमा,
तुझ्या चातुर्यसमुद्राची सीमा, त्याही कदा न पावती. ८
अंबे! तुझे गुण केंवि वर्णावे, केंवि अर्कासी अर्कसुमनें पुजावें,
अंबर कैसें मुष्टींत सांठवे, पालवीं बांधवे वायु कैसा? ९
न करवे उर्वीचें वजन, न गणवे सिंधूचें जीवन,
सप्तावरणें भेदून, मशक केंवी जाउं शके? १०
ऐकोनि बाळकाचीं वचनें, जननी हृदयीं धरी प्रीतीनें,
तैसें सरस्वतीनें निज कृपेनें, घातलें ठाणें जिव्हाग्रीं. ११
माझें मन मूढ चकोर, कुहूमाजी इच्छी रोहिणीवर,
परी सरस्वती कृपाळू थोर, शुद्धबीज प्रगटली. १२

रामविजय.

# रामाची बालक्रीडा.

## श्लोक.

धरूनियां रूपचतुष्टयाप्रती, लीलामनुष्याकृति तो रमापती,
भूभारनाशार्थ करूनियां पण, जाला जगत्पाळक बाळ आपण. १
पीतां स्तनातें क्षणमात्र राहणें, महादरें मातृमुखासि पाहणें,
वक्त्रांत तें दुग्ध तसेंचि वाहणें, तेणेंचि फूत्कार करूनि नाहणें!२
मुखांतुनी दुग्ध गळे सुनिर्मळ, उरावरी ये अतिशुभ्र वोगळ,
मंदाकिनीचा गगनीं प्रवाह तो, चंद्रप्रभापांडुर काय वाहतो ! ३
पीयूषगर्वापहमाधुरीधरा, त्रैलोक्यतापान्तकरा, सुखाकरा,
निजाननें श्रीश रमामनोरमा, चुंबी पदा दीनजनावनक्षमा. ४
बैसोनि हर्षें जननीचिया कडे, विलोकुनी तन्मुखनीरजाकडे,
स्मितामृतापूरित बोल बोबडे, बोले तदा ब्रह्मसुख स्वयें दडे. ५
अत्यंतशुद्धस्फाटिकालयांतरीं, क्रीडा करी राम जधीं परोपरी,
नानासुतप्राप्तिसुखासि मावली, विलोकुनी तत्प्रतिबिंब पावली. ६
स्वनंदनातें प्रतिबिंबमंडलीं, धौतामलस्फाटिकमंदिरस्थलीं,
माता न जाणे बहु शोधितां भ्रमें, परंतु पावे सुख ती अशा श्रमें!७
धात्री जई रामकरांबुजांप्रती, धरूनियां चालविती स्खलद्गती,
चुंबी धरा ती प्रभुपादनीरजें, अलभ्य ज्यांची दिविषज्जनीं रजें!८
पित्यापुढें रत्नविराजिकंकणें, करें नमस्कार करूनि ठाकणें,
धात्र्युक्त सारें निजवृत्त सांगणें, अशा गुणें तो करि नाक ठेंगणें !९
भूपापरी सर्वहि तो सभाजन, त्याचें करी नित्य सुखें सभाजन,
विलोकितां मर्त्यकृतावतारक, न लोचनीं हालति पक्ष्मतारक. १०

आला चतुर्वर्ग नृपालयीं स्वयें, चतुःकुमारात्ममिषेंचि निश्चयें,
तुळा नसे भूपतिच्या सुखाप्रति, स्तवी सदा यास मुखें दिवस्पती. ११
रामासवें लक्ष्मण सर्वदा वसे, शत्रुघ्न तोही भरताश्रयीं असे,
पूर्वीं विभागक्रम जाहले जसे, द्वंद्वें सुखें वर्तति बंधु ते तसे. १२
छाया तनूची तनुला न सोडी, त्या बंधुंची एक तशीच जोडी,
परस्परीं त्यांसि अपार गोडी, त्या मित्रभावा उपमाचि थोडी! १३

छंदोरामायण.

---

## द्वारकावर्णन.

### श्लोक.

अनर्घ्या रत्नांचे कळस नभचुंबीत असती,
रवीचंद्रज्वालानलताडितवेष्टीत वसती;
सुवर्णाच्या भिंती सरितपति दुर्गा गवसणी,
फणाकारा द्वारीं झळकति गृहा रक्तकिरणीं. १
माणिक्यें मणि पुष्पराग मरकें वैडूर्य चिन्तामणी,
गोमेदोत्तम इन्द्रनीळ जडिले पेरोज पाटांगणीं,
पाचीप्रस्तर पद्मराग सरळे वज्रप्रभा सांवळी,
कुंजस्तंभ सुमेद मंडप निके रत्नाचिया पोंवळी. २
सुंदरें मंदिरें दिव्यदामोदरें, वास तेथें किजे नित्य दामोदरें;
लोक संपन्न ते पुत्रदाराधनें, दाससायुज्यता श्रीपदाराधनें. ३

द्वारकेसि उपमा कवणाची ? दिव्य साम्य पुरि वैश्रवणाची,
भुक्तिमुक्तिफळ दे अकलंका, या गुणें अतुलसाम्यक लंका. ४
गोमतीनदितटीं सुरवाडें, पुष्पितें उपवनें फुलझाडें;
डोलती सफल तीं पवमानें, विप्र पाठ करिती पवमानें. ५

द्वारीं मंगलमूर्ति भैरव महासिद्धिप्रदाता सदा,
मुद्रा दिक्पति मातृका नवनिधी हंसासना शारदा;
तेजःपुंजसुदर्शनावरि पुरी निर्माण केली महा,
भोंवे चक्र पळांत एकविमदां. ' शार्दूलविक्रीड ' हा. ६
कृष्णें त्रिशतयोजनें स्थल निकें रत्नाकरा याचिलें,
शेषापासुनि कूर्मचक्र अवघें शोधूनियां पाहिलें;
दीपस्थानक तें बरी रचि पुरी जो विश्वकर्मा स्वयें,
संख्या सप्ततियोजनें नगरिचा आवर्त तो निश्चयें. ७

योजनें स्थल चतुर्दश जेथें, बिंदुमध्य हरिमंदिर तेथें;
अष्टपत्रचतुरस्रविहारी, गोपुरें चहुंदिशाप्रति चारी. ८
वैकुंठ सालंकृत नित्य जेथें वेश्यां मुमुक्षां गति एक तेथें;
भक्तां अभक्तां गति भिन्न नाहीं, 'उपेंद्रवज्रा' पठ वृत्त पाहीं. ९

मुमुक्षु, तडितापडी, जटिल, कंदमूलाशनी
दिगंबर शिवालयीं धरुनि बैसले आसनीं;
उपासक उपासना धरुनि राहिले साधनीं
अखंड मठमंडपीं वसति मंत्रआराधनीं. १०

द्वारका सकलतापहारका, देखिली परमसौख्यकारका;
सप्तमोक्षपुरि त्यांत उन्नता, छंद हा कवि ह्मणे 'रथोद्धता.' ११

कृष्णकीर्तनकथा परोपरी, नृत्यगीत करिती घरोघरीं;
कल्पवृक्ष लवती फुलीं फळीं, मोक्षदायक पुरी महीतळीं १२
जरा ना मरी, शोक ना दुःख कांहीं, सदाचार सत्यव्रती लोक पाहीं;
कथा नृत्यगीतादि होती पुराणें, जगामाजिं वर्ते खरें नामनाणें! १३
गृहें गोपुरें चित्रिल्या पट्टशाला, विराजीत मुक्तामणी रंगमाळा;
प्रदीपावळी सोहळ्याची दिवाळी, असें सौख्य नेणें कदा नाकपाळी १४
वेदान्ती अग्निहोत्री भट गणक महावैद्य गोपाळ मंत्री,
संन्यासी पाणिपात्री जपति हरि मुनी, द्वारका मोक्षदात्री;
सद्विद्याभ्यास रात्रिंदिवस गुरुमुखें साधिती सांख्यशास्त्री,
निर्वैरें पुण्यधात्री वसति जन सुखें अर्जिती कृष्णमैत्री. १५
चतुष्पथ पदोपदीं, मणिमनोहरा वेदिका,
समार्जित सुकुंकुमें सरणि वीथिरथ्यादिका;
पवित्र तुलसीवनें, सजल कुंभ कुंभावरी,
महोत्सव पुरौकसां, नगरि रम्य पृथ्वीवरी! १६

रुक्मिणीस्वयंवर.

---

## हिमालयावरील सृष्टिशोभा.

### श्लोक.

जेथें प्रकल्पित जटेंतुनि शंकराच्या
ही येतसे प्रथम दृष्टिपथा जनांच्या;

तेथें घडीभर बसून समग्र सृष्टि—
सौंदर्य भोंवतिल, देउनि सूक्ष्मदृष्टि १
जातां बघूं, मग किती तरि जागजागीं
चोहींकडील सुमनोहर भूविभागीं
शोभा दिसे ! विविध रम्य किती पदार्थ
देऊन दर्शन तिला करिती कृतार्थ ! २
जैसें वसंतसमयीं मधुमक्षिकेला
चोहींकडून फुलल्या समवाटिकेला
दैवें प्रवेश मिळतां, तिजला अपार
होतो प्रमोद, मनिं उत्सुकताहि फार. ३
तैसेंचि मन्मन यया बघतां नगातें,
आनंदसिंधुलहरींत बुडून जातें !
जो या स्थळीं रुचिर वस्तुसमूह थाटे
तो पाहण्यास मज कौतुक फार वाटे. ४
त्यानंतरें मग जशी मधुमक्षिका ते
सानंद पंख अपुले उडवीत जाते;
एका फुलांतिल पिऊन रसा दुज्यातें,
तेथीलही रस पिऊन पुढें तिजातें; ५
त्या रीतिनेंच मम दृष्टिहि या स्थळींची
शोभा विचित्र रमणीय पहावयाची
इच्छा धरून हृदयांत, यथाक्रमानें
सारे पदार्थ निरखी परमादरानें. ६

जातां दृष्टि प्रथमचि पहा ! या गिरीच्या तळातें,
जें रानाचें वलय दिसतें रुंद याच्या सभोंतें;
त्या ‘ तर्यानी ’ ह्मणुनि वसतें देशभाषेंत नांव,
लोकीं याच्यापरि न दुसरा सांपडे घोर ठाव. ७
होती या उद्गम जवळच्या उंचभागीं जयांचे,
त्या साऱ्याही सलिल जमतें या स्थळीं निर्झरांचें;
त्या योगानें बहु दलदली थोर या घोर रानीं
होती, तापे रविहि वरती लंबरूपीं करांनीं. ८
त्यानें येथें विपिन इतकें किर्र माजून जातें
कीं त्यांमध्यें स्थळ न गवसे पायही ठेवण्यातें;
कोठें माजे यवस, झुडुपें कंटकांचींहि कोठें,
कोठें जाती सरळ गगनीं वृक्षही मोठमोठे. ९
कोठें होतीं अविरल वनें वेतसांचीं अफाट,
कोठें साधारण गवतही वाढतें उंच दाट;
जागोजागीं पडुनि तरुचीं जीर्णपर्णें कुजून,
जातां वाफा विषमय निघूं लागती त्यांमधून. १०
त्यांनीं वातावरण भरतें भोंवतालील साचें
त्यायोगें या स्थळिं न घडतें राहणें मानवांचें;
ऐसें आहे तरिहि, विविध श्वापदें क्रूर चंड
रानीं या निर्भय चहुंकडे हिंडती हीं उदंड. ११
कोठें मत्त द्विरद फिरती थोर यूथें करून
कोठें व्याघ्रप्रवर करिती वास खिंडीमधून,

कोठें कुंजाश्रय करुनियां वन्य गायी रहाती
  कोठें वस्ती वरिति तरुच्या कोटरीं ऋक्षजाती १२
यांतें स्वग्रामधुनिहि नसे मानवी शक्ति ठावी,
  तेंव्हां तीपासुनि मरणभी केविं यांतें असावी?
हें सोडून प्रविततविषोद्गारगंधी अनूप
  जातां कांहीं चढुन वरती, या नगाचें स्वरूप १३
पूर्वीपेक्षां अधिक दिसतें सौम्य, पाहून ज्यातें
  होतें दृष्टीप्रति सुख, महानदही मानसातें!
जातां मार्गीं बघत, लवणांतून दोहींकडे तें
  येथें दृष्टी पडति हिरवीं गार विस्तीर्ण शेतें. १४
कोठें त्यांच्या मधुनि दिसती ओघ हे निर्झरांचे,
  वाहे शुद्ध स्फटिकसदृश स्वच्छ वारी जयांचें;
कोठें कोठें मधुन दिसती रम्य गांवें, तयांच्या,
  भोंतीं ताट्या अविरल पहा लागल्या या फुलांच्या. १५
चाफा, जाई, गुलतुर गुलाबादिकांतें विकास,
  होतां त्यांचा मधुर पसरे गंध दाही दिशांस.
कोठें सौगंधिक शतदली पद्मखंडें विकास
  कासारांच्या धरिति सलिलीं, त्यामधें राजहंस. १६
आनंदानें प्रियसहचरीयुक्त राहून, शांत
  संसारांचीं सकलहि सुखें पूर्ण हे भोगितात.
जे उत्पत्ती धरिति समशीतोष्ण वा उष्णदेशीं,
  ते एकत्र द्रुम सकळही वाढती या प्रदेशीं. १७

कोठें माळावरि उगवती देवदारू विशाळ,
कोठें ओकद्रुम विलसती उंच, कोठें तमाल;
पारंब्याही सुटुनि धरणीमाजि कोठें वडांच्या,
जीं कां त्यांपासुनि उगवती अन्य झाडें तयांच्या. १८
गुंफा होती निबिड, तरुणादित्यतापार्त ज्यातें
कस्तूरीचे मृग निपतती प्रत्यहीं आश्रयातें.
ज्यातें आलिंगिति मधुलता मुग्ध शाखाकरांनीं,
ऐसे आम्रद्रुमहि दिसती नम्र भारी फलांनीं. १९
कोठें नानाविध परभृतश्येनकीरादि साचे
पक्षी वृक्षांवरुनि वसती जे सुखानें, तयांचे
एके जागीं ध्वनि मिसळतां सर्व होतो विशिष्ट
जो कां नूत्नध्वनि मधुर तो हें करी चित्त हृष्ट. २०
जो या स्थानीं सतत घुमतो कंदरांतून वारा
त्या मानून स्तनित, अपुला चित्रवर्णी पिसारा
सारा प्रेमें पसरुनि, गलत्प्रेमनेत्रांबुपूर
वृक्षस्कंधीं रुचिर करिती तांडवातें मयूर. २१
जी या स्थानीं निबिड जमते शीतकाळीं हिमानी
ती ग्रीष्मींच्या द्रुत वितळतां भास्कराच्या करांनीं,
मोठीं मोठीं हरित कुरणें वाढतीं या विभागीं;
त्यांच्यामध्यें चरति पशुंचे संघही जागजागीं. २२
कांहीं जागीं हरिण चरती हे निजेच्छानुसारें;
कोठें वन्यच्छगल इकडे; ग्राम्य कोठें खिलारें;

कोठें दृष्टी पडति बकरीं, आत्मजातुल्य ज्याशीं
शालीसाठीं जतन करिती लोक काश्मीरवासी. २३
जातां हाहि चढून भाग वरतीं, तेथें दिसूं लागती
साऱ्या वस्तु उदास, रुक्ष. अवघें ओसाड दृष्टीप्रती
भासे. हें स्थळ पाहतां; मधुरसा चाखून त्याच्यावरी
खातां तिंतिडिका घडे तशि अतां मच्चित्त वृत्ती वरी! २४
जातां या स्थळिं खालतीं, वरि, पुढें, मागें, चहूंहीकडे,
सारें बर्फ दिसे, तयाविण दुजें कांहीं न दृष्टी पडे;
वर्षांतून सदैव शीत अपुला आवास येथें करी,
तेणें वृद्धि न उद्भिदां घडतसे या शून्य भागावरी. २५
भूर्जांचे तरु जे क्वचित् खुरटले थंडीमुळें राहती,
त्यांवाचून न कोणतेहि दुसरे येथें तरू वाढती;
कस्तूरीमृग, वा मदोद्धत करी, वा हिंसक श्वापदें,
किंवा पक्षिसमूहही न करिती येथें निवासास्पदें. २६
जातां प्राणिनिवासचिन्हहि बघूं कोठें नसे तत्त्वतां
सारा भाग दिसे भयाण, अवघी भासे उदासीनता!
कोठें उंच कड्यांवरून पडतां वेगें नद्या खालतीं
त्यांचीं पातविशीर्ण तूर्ण शतधा धाराजळें वाहती! २७
तीं वेगें खडकांमधून पुढतीं वाहूं जशीं लागती,
त्यांच्या भीमरवें प्रपूरित दऱ्या साऱ्याहि नादावती;
या येथून विलोकितां दिसति जीं जातां नभोभ्यंतरीं,
स्वर्गारोहणहेतुनिर्मितमहासोपानमार्गापरी. २८

एकामागुनि एक उंच शिखरें या अद्रिचीं, त्यां शिरीं
शोभे क्षीरविपांडु निर्मळ हिम प्रावारवस्त्रांपरी;
ग्रीष्मींचा प्रखर प्रतापहि जरी भास्वान् सहस्त्रां करीं
प्रत्यब्दीं हिम येथलें वितळण्यासाठीं प्रयत्ना करी. २९
सारे व्यर्थ तरीहि; बर्फ न कधीं येथील जातें लया,
ज्यातें थोर निजाश्रया वितरिती, कांहीं नसे भी तया;
जीं येथून समीप फार दिसती तीं स्वच्छ नेत्रांप्रती,
त्यां मागील लगेंच अंधक जरा कांहीं दिसूं लागती; ३०
त्यांहींहून विशेष अंधक दुजीं त्यां मागचीं, यापरी
ओळीनें शिखरें जशीं चढत हीं जाती नभोभ्यंतरीं,
तैसा आदिमवर्ण पालटुनियां नीलत्व त्यां येतसे,
त्यायोगें गगनास आणिक तयां वर्णैकता होतसे! ३१

गंगावर्णना.

---

## भरतभाव.

### श्लोक.

करुनि वंदन जानकिनायका, भरतभाव निरोपिन आयका,
जननि टाकुनि रामपदीं निघे, सुकृति तो मति हे समजोनि घे. १
भरत जवळि नाहीं मातुलग्रामवासी,
भरतजननि धाडी कानना राघवासी;

दशरथ मृत झाला राम जातां वियोगें,
तृण बहुत दिसांचें अग्निच्या जेंवि योगें. २
मग भरत वसिष्ठें आणिला जों अयोध्ये,
नगरि गतधवा ते आणि निर्वीर्य योद्धे,
जन मृतसम देखे हेतु कांहीं कळेना,
जननिकृत कुचेष्टा बुद्धितें आकळेना. ३

वृत्तांत सांगे भरतासि माय, स्वानंद जीचा त्रिजगीं न माय;
भेदूनि वक्षःस्थल शब्द तीचा, करी महाक्षोभ महामतीचा. ४
जाळील तीतें निजदृष्टिपातें, पाहे असा हालवितांच पातें;
ह्मणे, "अहो पापिणि ! पापरूपे, जळो तुझें तोंड जडस्वरूपे! ५
जाळीन हें तोंडाचि जाण आधीं, मुखें जया देसि अनंत आधी,
न माय तूं वैरिण होसि साची, माझे मनीं भाव खरा असाची. ६
केला तुवां देखत भर्तृघात, क्षणें तिवाटा रचिल्या तिघांत,
शत्रुघ्न मी लक्ष्मण राम जोडे, राजा तिजा तींस अनर्थ जोडे. ७
वना धाडिलें जेधवां रामराया, तुवां हेतु केला स्वभर्ता मराया,
अहा राम सीता अशा दंपतीतें, वना धाडिलें मारिलें कां पतीतें?" ८
धिक्कारूनी गोष्टि मातेसि सांगे, कौसल्येच्या ये गृहा सानुरागें,
त्यातें देखे जेधवां राममाय, श्रीरामाचा शोक लोकीं न माय. ९
मोकळा करुनि कंठ तेधवां, आठवूनि मनिं जानकीधवा,
ते रडे भरतही तसा रडे, जोंवरी नयन होति कोरडे. १०

ह्मणे, " वांसरा घात झाला असा रे,
तुझ्या माउलीचेच हे खेळ सारे;

वृथा धाडिला राम माझा वनासी,
न देखों शके त्या जगज्जीवनासी. ११
अरे राघवें व्यापिले लोक सारे, तरी नावेर शोक माझा कसा रे,
तृषाक्रांत डोळे घनश्यामरामा, पहायास रे सर्वलोकाभिरामा. १२
जानकी जनकराजकुमारी, पाय कोमल जिचे सुकुमारी,
चालली जासि वना अनवाणी, बोलली कटकटा जनवाणी." १३
भरत शोक अनेक तिचे असे, परिसतां मग बोलत तो असे
"जननि, गोष्टि समस्तहि हे खरी, परिस येविषयीं मम वैखरी. १४
मी ब्रह्महत्याशतपाप लाहें, ठावें असे लेश जयीं मला हें.
खड्गें वसिष्ठासि अरुंधतीतें, वधीं जरी ठाउक हें मतीतें." १५
ह्मणे राममाता, "अरे वांसरा! मी, तुझा जाणतें प्रेमउल्हास रामीं;
तुला रामसेवेविणें काम नाहीं, न राज्यादिकाची जया कामनाही." १६
तों वसिष्ठ वदला भरतातें, रामपादनिजलाभरतातें,
"पाळिं यावरि समस्त धरा हे, राजनीति करिं सावध राहें." १७
"राजाधिराज रघुराजचि एक जाणा,
पाहों चला सकळ जाउनि त्या सुजाणा,
आम्ही समस्त जन किंकर राघवाचे,
जें रामनाम जपतों आजि नित्य वाचे. १८
विना राक्षसीकैकयी काननातें, चला सर्व पाहूं मृगांकाननातें,
प्रयत्नेंचि घेऊनि येऊं गृहातें, न येतां समर्पूं शरीरें स्वहातें. १९
येणार ते या अथवा नकाही, राहेन मी हें न घडेचि कांहीं,"
बोलोनियां स्पष्टचि चालिला हो, शोकांतही त्रे प्रभुनामलाहो. २०

पायीं निघे भरत सानुज रामवाटे,
रामाविणें इतर इष्ट न काम वाटे,
माथां जटामुकुट वल्कल नेसला हो!
श्रीरामवेष, वदनीं प्रभुनामलाहो. २१

रामवल्कलजटादिक रीती, वेष तो उभय बंधु करीती.
राम सानुज तसें भरतातें, देखती सकळ रामरतातें. २२

तो भेटला गुहकनाम किरात वाटे,
श्रीरामभक्त परमाप्त तयास वाटे;

गंगातटीं रघुपतीशयनास दावी,
ते भक्ति काय ह्मणुनी मुखिं हो वदावी ? २३

दर्भनिर्मित तया शयनातें, देखतां उदक ये नयनांतें,
भूतळीं भरत घालुनि घे हो, त्या स्थळींहुनि न चित्त निघे हो. २४
रामवृत्त रघुवंशवरातें, सर्व वर्णुनि गुहाख्य किरातें,
लंघुनी सुरनदी भरतातें, ने ससैन्य रघुराजरतातें. २५
ब्रह्मा रमा वंदिति नित्य ज्यातें, त्या राघवाच्या चरणांबुजातें,
पाहूं त्वरें हे भरता असोसी, वियोग तो प्राणवियोग सोसी. २६
कैकेयीच्या दुष्टभावें जळाला, इच्छी रामाच्या पदाच्या जळाला,
तो स्वामीच्या देखिलें आश्रमातें, कांहीं चित्तें टाकिलें हो श्रमातें. २७
पादचिन्हित तये वसुधेतें, देखतां तृषित जेविं सुधेतें,
रामचंद्रपदसारसमुद्रा, वाढवी भरतसौख्यसमुद्रा. २८
तनुवरी गुढियाच उभारिती, कविमुखें किति वर्णिल भारती?
भरत ये रितिनें आजि लोळला, प्रभुपदाब्जरजीं बहु घोळला! २९

'हा राम! राम! रघुनंदन!' हेंचि वाचे,
चित्तांत ते चरण दीसति राघवाचे,
'ते रेणु हे मुकुटमंडण जे शिवाचे'
ऐसें ह्मणे त्यजुनि भाव अहो जिवाचे. ३०
भरत पदरजीं त्या घोळला दीर्घकाळ,
त्रिभुवनिंहि सुखाचा होय तेव्हां सुकाळ.
'न मिळति पदरेणू जे विरिंच्यादिकांही,
सुलभ मज,' ह्मणे, 'हें भाग्य माझेंचि कांहीं!' ३१
वामअंकगत भूमिकुमारी, बामबाहु सुरता सुकुमारी,
वल्कलांबर जटा अभिरामा, देखतो भरत त्या रघुरामा. ३२
दूर्वादलश्यामलदीप्ति देहीं, सेवी पदें लक्ष्मण तो विदेही,
गंगातटीं सेवित मंदवातें, देखे अशा श्रीरघुपुंगवातें. ३३
देखोनि ऐशा रघुनंदनातें, धांवे त्वरेनें पदवंदनातें,
अलभ्य जो हर्ष सुरादिकांही, तो होय त्यामाजिच शोक कांहीं. ३४
रडे फुंदफुंदे शिरीं पादपद्मा, धरी सद्म मानी जया नित्य पद्मा,
बळें क्षेम दे त्यास ओढूनि राम, स्वभक्तप्रिय स्वामि विश्वाभिराम ३५
मांडियेउपरि बैसविला हो, अश्रुनीर पुसि दे सुखलाहो,
'वांसरा! न रड सांग सुवार्ता,' शब्द हा निववि दुःखदवार्ता. ३६
तों देखिला गुरु वसिष्ठ तयास वंदी,
ब्रह्मण्यदेव जडला चरणारविंदीं;
तों माउल्या तिघिहि सत्वर पावल्या हो,
भेटोनियां तिघिहि सत्वर सेविल्या हो. ३७

पिता सुखी कीं, ह्मणतांचि रामा, रडोनि त्या सांगति सूपरामा,
रडे अहो! रामहि लोकरीती, स्त्रिया पुन्हा शोक महा करीती. ३८
सपिंडिक्रिया राम गंगेतटाकीं, करी आणि तो पिंड गंगेंत टाकी,
रडे लोकदृष्टीस शोकश्रमातें,प्रभू दाउनी ये पुन्हा आश्रमातें. ३९
तों वदे भरत गोष्टि मनाची, प्रार्थना बहुत आगमनाची,
मांडिली परि न राघव मानी, देखतां सुरवरांस विमानीं. ४०
ह्मणि फिरे स्वपुरीप्रति राम हा, ह्मणुनि आधि मनीं अमरां महा,
भरतशब्द तदर्थ न ये मना, पुरवणें प्रभुला सुरकामना. ४१
" आज्ञा पित्याची मज मोडवेना, वत्सा तुझी गोष्टिहि तोडवेना,
घालूं नको बा मज संकटांत, नको पडों या सहसा हटांत." ४२
असी आयके जेधवां रामवाणी, मुखश्री करी बंधु तो दीनवाणी,
ह्मणे, "तात! आज्ञा मृगांकानना रे, मला सांग जाईन मी कानना रे."
" बापा! ऐसें वर्ततां तों विशेषें, आज्ञाभंग प्राप्त दोघां अशेषें,
एवं राज्यातें तुवां रे भजावें, ताताज्ञेनें कानना म्यांच जावें."४४

येना असें भरत देखुनि रामराया,
गंगातटीं रचुनि दर्भ बसे मराया;
पाहे वसिष्ठ मुनि वक्त्रसरोरुहातें,
श्रीराम आणि खुण दाखवि हो स्वहातें. ४५
कीं सांग गुह्य अवतारचरित्र याला,
जें तारितें चहुं युगांत जगत्त्रयाला;
बोले वसिष्ठ मग सन्निध जाउनीयां,
' कां प्राण टाकिसि ' ह्मणे समजावुनीयां. ४६

" हा राम मारील दशाननासी, यालागिं जातो प्रभु काननासी,
नको निवारूं भरता! तयाला, ब्रह्मादिकांच्या पददातयाला. ४७

येणार मागुति चतुर्दशवत्सरांतीं,
राहो वनांत तितुके दिन आणि राती;
आत्माच तो तुज वियोग तयासि नाहीं,
येऊनियां करिल जे तव कामनाही." ४८

देखोनियां गमननिग्रह राघवाचा,
बोले उभा भरत निश्चयरूप वाचा;
" वर्षें चतुर्दशवरीच धरीन देहा,
त्यानंतरें त्यजिन यास निरोप दे हा. ४९

वर्षें द्विसप्तभरि काल समाप्त जाला,
त्यानंतरें आजि तुझ्या चरणांबुजाला;
स्पर्शें शिरें न जरि देह तयाच वारीं,
यातें त्यजीनाचि विरिंचि जरी निवारी. ५०

वर्षें चतुर्दशहि रक्षिन शासनातें,
अंगीकरीन न बसेन नृपासनातें;
सिंहासनावरि तुझ्या पदपादुका मी
पूजीन जो तव पदांबुजलाभकामी." ५१

पादुका जडित आणुनि हातें, रामचंद्रचरणांबुरुहातें
लावुनी निजशिरीं भरतानें, वंदिल्या रघुवरांघ्रिरतानें. ५२

वामनीग्रंथ.

# सती.

## श्लोक.

‘ गेला ! स्वर्गास गेला प्रियतम निघुनी ! मीं करूं काय आतां ?
होता निश्चित होता त्यजुनि तनुस ह्या हा जरी प्राण जातां !
नाहीं ! हा जात नाहीं ! चिकटुनि बसला दुष्ट या नष्ट देहा !
जाळा ! हा देह जाळा ! पतिसुख नसतां कासया पाहिजे हा ?’ १
‘ लावा भूतदयेस आग तुमच्या ! मी कायद्याच्या भया
नाहीं भीत ह्मणून साफ तुमच्या सांगा तुह्मी राजया !
काढोनी ज्वलनाननांतुनि मला, माझा बळी कासया
देता भर्तृवियोगपावकमुखीं ? ही कोठली हो दया ? २
‘ झाला हा विरहाग्नि दुःसह बहू झाला ! मरूं द्या मला !
घाला नेउनि देह हा झडकरी अग्नींत घाला चला !
व्हा ! व्हा ! शीघ्र तयार व्हा ! निघुनि ही जाईल आतां घडी !
गेल्या ही मग घातलीच समजा कूपांत मी या उडी ! ३
‘ रहा ह्मणतसां ह्मणा, पळ इथें न राहीन मी !
अहा ! करुनि आग्रहा फुकट होतसां कां श्रमी ?
पहा वर पहा जरा ! बसुनि दिव्य यानीं पती
कसा क्रमित जातसे गगन देवलोकाप्रति ! ४
‘ नका जाऊं घाई करुनि इतुकी ही प्रियकरा !
तुह्मांसंगें येतें ! क्षणभरि विमान स्थिर करा !
निघालें ! मी आलें खचित ! जन हो द्या मज रजा !
सरा मागें दादा त्वरित! वहिनी! जा! परत जा! ’ ५

‘ हां हां ! हें ह्मणतेस काय ! करिसी वेडेपणा काय हा !
याचा तूंच जरा विचार करुनी ताई! पहा गे पहा !
नाहीं भर्तृवियोग हा, तुजवरी आकाश हें कोसळे !
नाहीं दुःसह दुःख याहुनि दुजें आह्मांसि हेंही कळे ! ६
‘ प्राणत्याग करोनियां झडकरी या घोर दुःखांतुनी,
व्हावें मुक्त, विचार हाच पहिला येतो स्वभावें मनीं;
ताई ! साहस हें परंतु असलें वाटे करावें जिला,
देहाचा उपयोग योग्य करितां यावा कसा गे तिला ? ’ ७
‘ भ्याली जी विरहव्यथेस ह्मणुनी झाली तनु त्यागिती,
कोणी शूर तिला ह्मणोत; न परी ताई, खरी शूर ती.
येतां दुःख पुढें न धीर धरवे आह्मां जरी माणसां,
ताई ! सांग तरी मनुष्यपण हें लागेल केव्हां कसा ? ’ ८
‘ ह्मणुनि ह्मणतों ताई ! आजी त्यजीं अविचार हा !
कवण तरला आहे लोकीं धरोनि दुराग्रहा ?
ह्मणवुनि सती घेतां येवो अशा तुज साहसें
खचित इतुकें सोपें ताई ! सतीत्व परी नसे ! ९
‘ सतीत्व तुज पाहिजे, सुयशही तसें पाहिजे,
उपाय असती तरी बहु तयासि लोकीं दुजे.
त्यजोनि तनु लाभतें सुयश, लाभती सद्गती,
तरी तनुस कां वृथा झिजविते तपस्वी यती ? १०
‘ वेडी होती खचित ह्मणुनी काय गे राममाता
राहे मागें दशरथनृप स्वर्गलोकास जातां ?

होता जीचा तनय गुणधी धर्म धर्मावतार
त्या कुंतीला कळत नव्हतें काय हें धर्मसार ? ११
'पुण्याची न सरस्वतीस करितां यावी जियेच्या मिती,
जीचा या जगतींत आज महिमा सर्वत्र वाखाणिती,
वेडी होळकरीण काय तुजला वाटे अहल्याहि ती
देहाची ह्मणुनी तिनें न दिधली वैश्वानरीं आहुती ? १२
जो साक्षात् शिव या जगांत ह्मणती धर्मावना येतसे,
त्याची माय असोनि कां पतिसवें गेली जिजाई नसे?
क्षाळी दिल्लिपही पराक्रम जिचा पाहोनि दु:खासवें
कां ती जाय न नातसूनहि तिची तारा पतीच्या सवें? १३
'योषिद्रत्न पुन्हां सृजीन ह्मणण्यापेक्षां जिच्या सारखें
धात्यानें अभिमान सोडुनि मला वाटे रहावें मुकें;
देह त्यागुनि भुक्ति मुक्ति मिळत्या कां ती तरी आपली
शीर्षीं घेउनि राज्यभार बसती विक्तोरिया माउली? १४
'आल्या थोर कुळांत या न ह्मणुनि विख्यात झाल्या भुवीं,
ताई! किंबहुना कुळास महिमा यांचाच दे थोरवी!
ऐशा पुण्यखनी दुज्या बहुजनीं आहेत गे जाहल्या,
लोकीं विश्रुत या परंतु ह्मणुनी म्यां आज सांगीतल्या. १५
'या निःसीम पतिव्रता असुनियां जातां परत्रीं पती
ताई! केवळ आपल्या सुकृतिनें साध्वीपदा पावती.
गेला कांत मरोनि कीं युवतिचें कर्तव्य आटोपलें
ऐसें मानुनि काय दिव्य यश हें आहे तिहीं जोडिलें? १६

'सांगूं मी तुज फार काय? न धरीं आतां पुढें आग्रहा!
आहे प्राण परोपकार करुनी तों कष्टवीं काय हा!
सत्कार्यें करुनी स्वकीर्ति कविला लावोनियां गावया,
ताई! जा मग तूं चिरंतन सुखा निश्चित भोगावया! १७

मोगऱ्याचीं फुलें.

---

## जनाबाईचें दळण.

### ओंव्या.

शेवटील रात्र उरली प्रहर, मागुती आले शार्ङ्गधर,
बैसोनि जनीचे बाजेवर, ह्मणती, 'ऊठ सत्वर लवलाहीं. १
उशीर जाहला जनाबाई, ऊठ लवकर दळण घेई,
जातें झाडोनि लवलाहीं, वाट तुझी पाहातों मी.' २
मानेखालीं घालोनि हात, तीस ऊठवी जगन्नाथ,
माथां पदर आपुल्या हात, रुक्मिणीकांत घालीतसे. ३
केश सांवरूनि ते अवसरीं, जनीस बैसविलें जात्यावरी,
दळणाची पांटी सत्वरीं, आणोनि ठेविली सन्निध. ४
मग ह्मणे रुक्मिणीकांत, 'जातें वोढीन मीच सत्य,
तूं निमित्तमात्र लावोनि हात, गाई गीत निजप्रेमें.' ५
ऐसें बोलतां हृषीकेशी, सावध जाहली जनी दासी,
प्रेमभावें अतिउल्लासी, ओंव्या संतांसि गातसे. ६

" निवृत्ति, सोपान, ज्ञानेश्वर, सोयरे माझे परात्पर,
तयांचे प्रसादें शार्ङ्गधर, कृपा मजवर करीतसे. ७
विष्णुदास माझा पिता, राजाबाई जिवलग माता,
गोराकुंभार सखाचुलता, कबीर सांवता बंधु माझे. ८
यांणीं अघटित केली करणी, काय नवल वानूं साजणी,
स्वाधीन करून चक्रपाणी, स्वानंदजीवनीं तृप्त जाहले. ९
प्रतिष्ठानीं छळितां द्विजवरें, अघटित केलें ज्ञानेश्वरें,
रेडियामुखीं साचारें, श्रुति अपार बोलविल्या. १०
गोरा कुंभार निजभक्त, ध्यानांत आणूनि रुक्मिणीकांत,
बाळक तुडविलें मृत्तिकेंत, परि नाहीं श्रुत तयासी ! ११
टाळिया वाजवितां फुटले हात, अकस्मात् बाळ आलें रांगत,
अघटित तयाची मात, नवल वाटतें देखोनी. १२
कबीर बंधु परदेशी, दूर नांदतो वाराणशी,
त्याचे समागमें हृषीकेशी, विणावयासी बैसला. १३
शिवरात्रिदिवशीं नामयान, नागनाथीं मांडिलें हरिकीर्तन,
नवलक्ष पताका स्वर्गीहून, अकस्मात उतरल्या." १४
ऐशापरी बोढितां जात, ओंव्या गातसे प्रेमयुक्त,
हें ऐकुनी पंढरीनाथ, आनंदें डोलत तेधवां. १५
कर्णीं गीत ऐकोनि त्वरित, गोणाई आली अंगणांत,
जनीसी ह्मणे ' दुसरी एथ, कोण आणिली दळावया? १६
मोलकरीण किंवा शेजारीण, कोण आणिली सांग त्वरेन.'
येरी कांहींच न बोले वचन, धरूनि मौन राहिली. १७

मग गोणाईस क्रोध होऊनि पोटीं, हातीं घेतली वेत्रकाठी,
प्रवेशोनि जनीच्या खोपटीं, ह्मणे 'कोणासीं गोष्टी बोलतेस? १८
दुबळा संसार न पुरे कण, कोण आणिली मोलकरीण,
धान्य घालिसी दळणांतून, आह्मांसि चोरूनि नित्यकाळीं.' १९
काठी मारितांच ते समयीं, देवाचे मस्तकीं लागली पाहीं,
ह्मणे, 'नाम माझें विठाई, आलें लवलाहीं दळावया.' २०
ऐसें वचन ऐकून, नामयासि कळली निज खूण,
मातेसि ह्मणे, ' तो जगज्जीवन, तुज कारण कळेना. ' २१
वचनें ऐकूनियां ऐसीं, लज्जित झाली निज मानसीं,
म्हणे, 'मीं ताडिला हृषीकेशी,' मग परतोनि आश्रमा पातली. २२
म्हणे, 'जनीचें भाग्य अति अद्भुत, स्वाधीन केला रुक्मिणीकांत,
म्यां नेणतां जाऊनि तेथ, केलें विपरीत तें ऐका. २३
ब्रह्मादिकां न पडे दृष्टी, त्यासि म्यां निजकरें मारिली काठी,
जळोत या संसाराच्या गोष्टी, म्हणोनि कष्टी होतसें. २४
सुकुमार परब्रह्म सांवळें, पहातांचि निवती मन डोळे,
तो रुक्मिणीकांत घननीळ, जनीची कळवळ करितसे.' २५
मग पीठ भरूनि चक्रपाणी, ठेविते झाले तयेक्षणीं,
किंचित् उरली होती यामिनी, मग सुखशयनीं पहुडले. २६

भक्तविजय, अ. २१.

## रुक्मिणी आपल्या लग्नाची गोष्ट सांगते.

### आर्या.

‘ कौरवयादवभार्या एका जागां मिळोनियां बसती,
  हरियश गातां पळविति कोकिळशुकसारिकांसि लांब सती. १
श्रीमद्रुक्मिण्यादि प्रभुपत्नींतें अजातरिपुभार्या,
  प्रश्न करि प्रेमें जे मित्र ननांदा प्रियासखी आर्या. २
“ हे वैदर्भि ! स्वमुखें स्वविवाहोत्सवकथा मला सांगें,
  कैसें वरिलें तुजला श्रीकृष्णें दीनवत्सलें आंगें ? ” ३
प्रथम ह्मणे वैदर्भी, बाई, होतें लहान मी कन्या.
  धन्या कृष्णकथा मज तेव्हांच रुचे, न आवडे अन्या. ४
भगवद्भक्त ब्राह्मण जे येती मत्पित्याचिया गेहा,
  जें हारि हरियशोमृत पाजिति तें मात्र चालवी देहा. ५
हरिगुणगायक सज्जन ते धनलोभी नव्हेत, परि हार
  मुद्रा कंकण द्यावें न करिति माता पिताहि परिहार. ६
ज्या दिवशीं हरिचरितश्रवण नसे त्यांत मज दहा दुखणीं;
  दुखणी काय नवखणी माडी नलगे, धरा नखेंदु खणी. ७
श्रीकृष्णाला द्यावी श्रीरामा जानकी तसी दुहिता,
  ऐसी गुरुबुद्धींनीं केली बाई ! विचारणा सुहिता. ८
कृष्णीं माझें अर्पण चित्ता आलेंचि साधुभावांच्या,
  कृष्णगुणीं श्रुत्यर्पण ये जेविं मनास सत्स्वभावांच्या. ९
रुक्मी माझा दादा जो आह्मां साजणांमध्यें मोठा,
  खोटा नव्हेचि परि हरिचरितरसीं तो भिजे न मणिगोटा. १०

त्या स्वगुरुविचारातें निंदुनियां मोहरोगवैद्यातें,
    मजला देऊं केलें दादानें हठ धरूनि चैद्यातें. ११
केला लग्नाचाही निश्चय चैद्यासि धाडिलें मूळ,
    गूळ क्ष्वेडचि वाटे मज, तातविचार होय पांगूळ. १२
न चले कांहीं तेथें जननीचें बंधुचें स्वताताचें !
    होय लवांत दहादा फळ इष्ट अनिष्ट आत्मघाताचें. १३
एक ब्राह्मण केवळ साधु दयामूर्ति, तत्पदीं नमनें
    केलीं पाय धरुनि म्यां एकांतीं विनविला सुदीनमनें. १४
कां तो द्रवता माझा असता जरि भाव पाहिला खोटा,
    जेणें अभयवर दिला त्या गुरुहस्तांत म्यांहि लाखोटा. १५
स्वकरें वसंततिलकावृत्तें पत्रांत सात मोजूनी,
    लिहिलीं होतीं तींही लिहितां लिहितां क्षणांत योजूनी. १६
काय लिहावें म्यां सखि! ज्याचे संपूर्ण वेद निश्वास,
    विश्वास ज्ञानप्रद परि माझा हरिपदींच विश्वास. १७
गेला धांवत घेउनि मत्पत्र द्वारकेस सद्विप्र,
    या प्रणतवत्सलाला आणाया आण घालुनि क्षिप्र. १८
तों आला शाल्व मगधपतिसख, तो चैद्य, मांडलें लग्न;
    झालें पुर तद्दळजळनिधींत, आधींत मन्मनहि मग्न. १९
तांतडि बहु दादाची; कैंचा अवकाश ? लागली हळद,
    खळदर्पघ्न दिसेना जो नतचातकदयासुधाजळद. २०
गरळ विलेपन वाटे लाविति अंगास जी हरिद्रा तें,
    सखि! सुकृपणकृत शुष्कोपचरण निवविल कसें दरिद्रातें ? २१

शतदा ध्वजाचि झाल्यें प्रासादशिरीं पुरेक्षणच्छद्मे,
द्वारवतीपथ पाहति नयनें हरिदिङ्मुखा जसीं पद्में. २२
आली रात्रि सुगात्रि ! द्रौपदि ! अवकाश तीच लग्नासी,
झाली यष्टी कष्टी जें मन त्या आधिभारभग्नासीं. २३
चिंताज्वरांत रात्रौ माझा नाहींच लागला डोळा,
जायासाठीं कंठीं शतवार प्राण जाहले गोळा. २४
लावियला म्यां दुःखीं बाई ! त्या ईश्वरासही बोल,
यत्पदपद्मरजाचें चिंतामणिकोटिही नव्हे मोल. २५
तों ' प्रियकंठीं आपण पडोन हेही सुखांत पाडावी, '
या भावेंचि स्फुरली करि माझी भुजलता कृपा डावी. २६
नेत्रभुजोरुस्फुरणें चिंतेची सोडिली मनें बाज,
माज प्राणांनींही गेल्या धैर्येंहि यावया लाज. २७
तोंचि समूळाधिज्वरहरमात्रा आणुनी उषःकाळीं,
आला द्विज धन्वंतरि, सदय पिताही तसा नसे बाळीं. २८
आधीं विप्रमुखश्री कळवी येतांचि माधवागमन,
मग मुनि सांगत, मज तों ऊठ ह्मणे, 'गुरुपदास लाग,' मन. २९
विप्रें कथिलें मज कीं, ' वत्से ! लिहिलेसि उत्तमश्लोक,
ज्यांच्या अर्थश्रवणें आला धांवोनि उत्तमश्लोक. ' ३०
कृष्णागमनानंदें हृदयांतुनि ज्यां बळेंचि घालविलें
चैद्यादिमनें द्याया स्थळ त्यां चिंतादिकांसि पालविलें. ३१
अंबेच्या नमनाला न्यावी जीचा विवाह नवरी ती,
धरि हरिशंका दादा, देवीयात्रा कुलीं, न नव रीती. ३२

मग बाई ! दादाचे मागधशल्यादिकाहि मेल्यांचे
सैनिक मज रक्षाया आले धाकें विरोनि गेल्यांचे. ३३
स्वसखी धात्री जननी विप्रस्त्री मंडळी न, ती पेटी !
तींत मणी मी, नेलें शुभविधिनें श्रीशिवेचिये भेटी. ३४
पूजुनि पाय निवविली, ' कन्यांतें प्रसवितात ज्या माता,
त्या लटक्या, तूंचि खरी, तुज कृष्णचि योग्य होय जामाता.'
पत्रीं लिहिलें होतें, ' देवीयात्रेंत मज पदें दावा,
दावा बहुतांसीं, हा भाव कळों दुर्जनासि नेदावा.' ३६
तों आला हरि, सुंदरि! जोडा नाहींच त्या महा, भागा
आपुलिया घ्याया, ते कोले वारिति कसे महाभागा ? ३७
हरि रवि मी नलिनी; स्त्री कैरविणी, वीर वायसाराती,
आनंदाची वेळा सांगों तुज साध्वि! काय सारा ती ! ३८
माझा मूर्त मनोरथ तो रथ आला प्रियास घेऊन,
दर्शन नयनें घेती जैसें शिशिरीं दरिद्र घे ऊन. ३९
तों आलि ह्मणे मज,' सखि! सुमनोमाळा वरा वहा यास,
हा या समयीं विधि, मग नित्य असेचि प्रिया पहायास.' ४०
माळा ऊचलितां प्रिय आपणहि रथावरूनियां लवला,
लव लागेना तों घे अंकीं, करुणासमुद्र कालवला. ४१
हंसें मुक्ता नेली मग केला कलकलाट काकांनीं,
हाकांनीं नभ भरलें जाय सुरांच्याहि नाद हा कानीं. ४२

श्वगणांतूनि जसा हरि निजभागा हरि तसाचि अतिधीर,
अबळखळांतूनि प्रभु मजला घेऊनि जाय यदुवीर.' ४३

बृहद्दशम—अध्याय ८३.

---

## जरासंधवध.

### ओंव्या.

सरसावूनि वीरगुंठी, भीम लक्षिला दारुण दृष्टीं,
जैसा मदोन्मत्त करटी, सिंहेश्वरें लक्षावा. १
भीमाआंगीं वीरश्रीचा लोट्ट, धरितां न धरवे अतिउद्भट्ट,
अगस्ति धांवे समुद्र घोटूं, तैसा तगटे पुढारां. २
दोघांनीं पिटिलीं पाणितळें, जानुमूळें बाहुमूळें,
मही ताडितां पादतळें, शैलमौळें थरकती. ३
धावोनि भीमाची वीरगुंठी, मागधें कवळोनियां मुष्टी,
दक्षिणहस्त सूदला कंठीं, काळपाशासारिखा. ४
दांत चावोनि करकराटी, गुडघा स्थापिला हृदयपुटीं,
'सावध' ह्मणती कृष्णकिरीटी, 'बापा भीमा बलिष्ठा!' ५
भीमें भैरवाकार दृष्टी, हृदयीं वोपिली वज्रमुष्टी,
सोडवोनि मगरमिठी, झिंजाडोनि लोटिला. ६
तेणें मागुती उठोनि विकळ, पाडिला जैसा विशाळ ताळ,
पुढती उठोनि उतावेळ, भीममध्य कवळिला. ७

दोन्ही कोंपर दोन्ही मुष्टी, चारी आघात ओपिले पृष्ठीं,
मागधें क्षोभोनि उफराटी, हुमणी हाणिली मस्तकीं. ८
झोंबी सोडवोनि तवकें, मस्तकें मस्तका देती थडके,
सहस्रसंख्या लोट भडके, अशुद्धाचे लोटती. ९
हस्त वोढिती तोडावया, पाय कवळिती मोडावया,
डोळे ताडिती फोडावया, पाडावया दशनांतें. १०
कूर्परप्रहार लत्ताप्रहार, मुष्टिप्रहार मस्तकप्रहार,
मोजोनि मारिती शतसहस्र, 'उसणें घे घे' ह्मणोनि. ११
बाहुगदा बाहुमुसळें, बाहुकातियाकारिवाळें,
बाहुमुद्गर बाहुत्रिशूळें, धांवोनियां मारिती. १२
नरनारी नागरिक लोक, पाहती दोघांचें कौतुक,
विमानयानीं वृंदारक, जय इच्छिती भीमातें. १३
निराहार निरुदक, विसांवा न घेतां पळ एक,
तेरा दिवस पर्यंत देख, युद्ध झालें दोघांसी. १४
चवदावे दिवसाचे अंतीं, मूर्च्छा पावला मागधनृपती,
तैं संकेत दावी हातीं, पांडवातें माधव. १५
'पाय कवळोनि करतळीं, चिरोनि करावीं दोन्हीं फ़ळीं,
जरेनें सांधिला तो उखळीं, सांधा वेगीं बळिष्ठा. १६
या वेगळा उपाय आन, करितां मागध न पावे मरण,
आतांचि होवोनि सावधान, युद्ध करील मागुती.' १७
भीमें रगडोनि दाढा, मध्यभागीं कर्षिला गाढा,
माथां वाहोनियां भवंडा, चक्राकार दाविला. १८

तेथोनियां टाकी भूतळीं, लात वोपी वक्षःस्थळीं,
वज्रें ताडोनियां मौळी, शक्र जेवीं पर्वता. १९
तैंवी पाडोनियां उताणा, वामपदें दक्षिण चरणा,
रगडोनि सव्य पाद जाणा, उभयहस्तीं कवळिला. २०
आंसडोनि बळउद्भटें, मध्यें उतटिला तटाटें,
अशुद्धनदी खळखळाटें, रंगभूमिके लोटली. २१
भीमसेनें आपल्या हातीं, करोनि शकलें सांडिलीं क्षिती,
जरासंधा दिधली मुक्ती, कुंतीकुमरें यापरी. २२

भारत–सभापर्व.

---

## जिजाबाईचें लग्न.

श्लोक.

अंगास लावूनि सुगंधतेला, माता स्वयें न्हाणितसे सुतेला,
टेंकूनियां कुंकुमही कपाळीं, शृंगारिली तैं यदुराजबाळी. १
वेणी गुंफूनि नागिणीपरि नगां घालूनियां मस्तकीं,
भांगीं शेंदुर, भाळिं कुंकुमचिरी, बिंदी हिऱ्याची निकी;
कानीं तानवडे, तसीच नथही नाकीं टिकेची खरी,
कंठीं सुंदर हार रत्नमय तो, तैसीच घाली सरी. २
मोठे गोठ सुकंकणें करयुगीं तोडे जवे पाटल्या
घाली छंदहि बाजुबंद बरवे बोटीं मुद्या दाटल्या.

पायीं पैंजण जोडवीं, कटितटीं शोभे बरी मेखला,
अंगीं कंचुकि रम्य नेसलि असे उंचा पट्ट चांगला. ३
चंद्रीं कलंक अथवा कमलीं सुभृंग,
शोभे तसा यदुसुतावदनीं सुरंग
मोठा खुला तिलक नूतन कस्तुरीचा,
जो रेखिला मुकुर पाहुनियांच साचा. ४
तें आनन स्पष्ट विधूच साजे, जें गोंधिलें तोचि कलंक राजे;
जे केश तें ध्वांतचि हो गणावें, चंद्रोदयीं जें हटतें स्वभावें. ५
वर्णाचा विपरीत भाव नयना आला तरी निश्चयें
पावेना विपरीतता नयन तें जाणोनि कोणी न ये
साम्याला झषपंकजादि, ह्मणुनी वेत्ते रसाचे स्वयें
अत्युत्कृष्ट असें सभेंत ह्मणती त्यांच्या द्वया निर्भयें. ६
कटितटी बहु सूक्ष्म विलोकुनी, मृगपती लपती वनिं जाउनी,
जंव तिची गति उद्धत पाहती, निजमनें गज विस्मय वाहती. ७
रतीपरी ती युवती सभांतरीं, तिच्या सख्या घेउनि येति सत्वरी.
येतांचि तीच्या मुखचंद्रवीक्षणीं, चकोर झाले जननेत्र ते क्षणीं. ८
ठमकत सुगतीनें पातली नोवरी ते,
पतिगळिं कुसुमस्त्रक् घालुनीयां वरीते;
बहुविध तंव वाद्यें वाजलीं त्या सुकाळीं,
तसि सकळ जनांनीं वाजवीलीच टाळी. ९

शिवाजीचरित्र.

---

# किरातार्जुनयुद्ध.

**आर्या.**

जिष्णूग्रतपें भ्याले सर्व तपःश्रीविलाससदनमुनी,
कैलासाप्रति जाउनि कथिती श्रीशंकरासि पद नमुनी. १
भगवान् ह्मणे, 'न भ्यावें त्यांचा संकल्प शुद्ध मी जाणें,
स्वस्थमनें स्वस्थानाप्रति टाकुनि भीतिला तुह्मीं जाणें.' २
मुनि जातांचि किरातत्वाच्छादनमूर्तिसम्पदेवरि घे;
जेथें पार्थ तप करी त्याचि वनीं सानुकंप देव रिघे. ३
आला किरातरूपी शिव जिष्णुसमीप, तोंचि हननाश
दानव वराहरूपी मूकहि, करि जो तपस्विजननाश. ४
दुष्टासि एकदाचि प्रेक्षिति ते वीर पार्थभव दोघे
ह्मणती; 'शरप्रहारा, तापसजन हाय हाय न वदो, घे.' ५
खरतर नरहरशर परजीवन एकक्षणींच संहरिती,
सम देवभक्त ऐसें जाणों कळवावया असें करिती! ६
अर्जुन ह्मणे ' किराता! त्वां मृगयाधर्म लंघिला दर्पें,
स्वांतार्थ मजपुढें अघ केलें, खगपतिपुढें जसें सर्पें. ७
हा प्रथम मत्परिग्रह असतां त्वां ताडिलें कसें किरितें ?
पाथरवटें स्वटंकें भेदावें वज्रपाणिसह गिरितें?' ८
त्यासि किरात ह्मणे, 'रे! मद्धन हें, प्रथम म्यांचि हा पिटिला,
म्यां वधिला असतां तूं कोण शरें हाणणार या किटिला? ९
खद्योतत्व सम असो, रवि कीं तिमिरासि काजवा खाणी?
नवल रविपुढें कीट स्वकृत तमोनाशकाज वाखाणी! १०

मिरविसि सुज्ञत्व वृथा अन्याला स्वकृत ताप लावूनी,
काय न दुगड तपस्वी? भिजला वृष्टींत, तापला ऊन्हीं! ११
जोडुनि पुण्यवनीं तम, बुडसी त्याच्या भरेंचि गर्वतमीं,
तूं मजपुढें किती रे? कोण हरिपुढें ह्मणेल पर्वत मी? १२
हो सिद्ध जरि असेल स्वतपोबलगर्व, सज्ज चाप करीं,
होशील विमद, पडला गरुडाच्या जेंवि मत्त साप करीं.' १३
तें वाक्य अर्जुनाला, गरळ जसें यामुना ह्रदा कढवी,
पढवी जो चापश्रुति रामासि, तयावरी स्वधनु चढवी. १४
शर ते ज्याणें वाहे एक निमेषांत एक लाखोली,
प्रभुची जाणेल कसा बाहुबळें तोचि एकला खोली? १५
स्वरवें गिळों न देते कवलहि सिंहा विदारितेभा, ते
सरले शर, दोन्हींही झाले सहसा तदा रिते भाते! १६
भ्याला परि धैर्य धरुनि ताडी त्या ईश्वरासि कोदंडें,
देता विश्व कवळित्या उग्रा काळासि कंप जो दण्डें. १७
जें युद्धांत ह्मणे, 'हो भास्करजी, न करजाल विकिरा,' तें
गांडीवधनुहि हरिलें कामाद्यरिमदतमोराविकिरातें. १८
ज्याचा पाद ह्मणे, 'रे भक्तभवा! स्वकुदशा न कर, वाळ,'
त्यावरि धनंजयाचा भंगे, पावे यशा न करवाळ. १९
प्रभुला जिंकूं पाहे भुजयुद्धीं, जेंवि काजवा सवित्या,
परि तोषवी स्वधर्में आराधुनि भक्तराज वासवि त्या. २०
'मृत्युभयासि तराया न जडसुधेचें धरा चिबुक,' लीला
ज्याच्या असें सुरांसहि म्हणती, तो प्रभु वराचि बुकलीला २१

शोणित वमला, श्रमला, भ्रमला, गमला नुठेलसा पडतां,
परि उठला, मोह कसा राहेल दयाकटाक्ष सांपडतां? २२
पाहति न जाहलें जें पूर्वी कौतुक कदापि नाकी तें;
विजयार्थ शरण गेला नर नतकामदपदा पिनाकीतें. २३
वाहे पार्थिवलिंगीं भावें जें माल्य तो प्रतापार्थ,
पाहें तेंचि पुरःस्थस्वमदघ्नकिरातमस्तकीं पार्थ. २४
पाय धरुनि पार्थ ह्मणे, ' ब्रह्मांडीं अघ न माय, बा पाहें,
तूंचि हरीं पंक! हरिल अमृताचा न घन मायबापा हें! २५
प्रभुजी! क्षमा करा जी! मागतसें पसरुनि स्वपदरा मी,
या दासींहि करो हें पदयुग जैसें करी स्वपद रामीं!' २६
नमुनि ' क्षमस्व, ' ह्मणतां प्रकट करुनि रूप बाहुंनीं कवळी,
अधराप्रति स्मितानें, स्वयशानें त्रिभुवनासही, धवळी. २७
' सर्वत्र रणीं विजयी तूं नारायणसखा नरा! हो रे!
स्वप्नींहि अयश तुझिया अवलंबुनि पदनखा न राहो रे! ' २८

महाभारत—वनपर्व.

---

## शान्तविलास.

### श्लोक.

अगा जलधिकन्यकानयनपंकजालंबना!
अतिप्रखर ताप हा भवज तापवी मन्मना,
प्रभातकमळें जया बघुनि लाजती अंतरीं
अशा रुचिर लोचनीं मजसि शांतवीं सत्वरी. १

पाताळीं अथवा सुरेंद्रनगरीं जा मेरुच्या वा शिरीं
लंघीं सातहि सागरांप्रति; तुझी आशा न संपे तरीं;
चिंतारोगपराहता जरि नरा! कल्याण व्हावें तुझें
श्रीकृष्णाख्यरसायना भज तरी; निःसार सारें दुजें. २
चित्तीं होतां स्थिर, वितरि जें प्रेम, तें वर्णवेना,
कंठीं येतां, हृदयिं तिमिरा ठाव कोठें मिळेना;
द्राक्षांनींही अतिशय जिची माधुरी आदरावी,
ती कृष्णाख्या वदुनि, रसने! नाम अन्वर्थ दावीं. ३
पक्षी होती विविध भुवनामाजिं सौंदर्यखाणी,
माझें प्रेम प्रबळ परि त्या चातकांच्या ठिकाणीं;
ते देताति स्मरण करुनी प्राणदात्या घनाचें
तेणें येई सहजचि मनीं ब्रह्म कृष्णाख्य साचें. ४
मदातें प्राशोनी अलि मधुर झंकार करिती
सभोंतीं ज्यांच्या ते करिवर गृहद्वारिं झुलती;
नको ऐशी लक्ष्मी मज; तिजवरी यन्मति जडे
अनायासें त्याला न कधिं हरिचें सेवन घडे. ५
जयाचे आलाप श्रवणिं पडतां फार मधुर
न वाग्देवी प्रेमें फिरवि निजवीणेवरि कर;
कवीन्द्राच्या ऐशा ललितवचनांनीं न डुलती
जनां त्या मानावें मनुजपशु किंवा पशुपती! ६

महाराष्ट्रभामिनीविलास.

# कीचकवध.

ओंव्या.

हस्त धरूनि हासडिला, तंव कीचक झोंबिये मिसळला,
दोघां संग्राम माजला, अत्यद्भुत ते काळीं. १
अंतरें पाहे पांचाळी, तंव दोघे मिसळले केशकवळीं,
मुष्टी मारितां वक्षःस्थळीं, धरातळीं थरकंपु. २
घाय घालिती परस्परें, दणाणती दिगंतरें,
महाप्रासादांचीं शिखरें, खचोनि पडती दडदडा. ३
लोक ह्मणती' ' महामारी, कोठोनि पातली इये नगरीं? '
कोण्ही न निघती बाहेरी, भयें अंतरीं दडाले. ४
उडोनि हृदयीं मारिली लात, वक्षःस्थळीं मुष्टिघात,
पृष्ठीं ताडितां निघात, दणदणाट माजला. ५
कोपर, हुमणीया, चपेट, ताडितां अस्थि होती कुट;
कीचक ह्मणे ' भरीन घोंट, मित्रावर्णासारिखा. ' ६
भीम ह्मणें, ' नृसिंहें तवकें, असुर विदारिला नखें,
तैसें अंग एकून एकें, छिन्नभिन्न करूनि टाकीन. ' ७
शत्रू नवनागसहस्रबळी, भीमें कवळितां कंठनाळीं,
बळें ताडुनी बाहुबळीं, हस्त उखळोनी टाकिला. ८
भिडती नक्र आणि गजेंद्र, शरभपक्षी आणि मृगेंद्र,
वृत्रासुर आणि देवेंद्र, मूळवैरी झुंजती. ९
महामाया महिषासुर, शंकर आणि अंधकासुर,
हनुमंत आणि अखयाकुमर, अशोकवनीं ज्यापरी. १०

पूर्वीं सुग्रीव आणि वाळी, झुजिन्नले किष्किंधातळीं,
तैसा कीचक आणि भीम बळी, युद्धकंडना मिसळले. ११
भीम ह्मणे, ' आंगवणें, दाऊनि श्वेखीं जासी प्राणें,
जैशीं व्याधाप्रती हरणें, शिंगें पुढां झाडिती. १२
मागें सरोनि धांवती पुढें, हृदयीं थडका मारिती गाढे,
एकमेकां झडेपाडे, महापर्वत पैं जैसे. १३
यानंतर भीम जगजेठी, वर्मस्थळीं सहस्र मुष्टी
बळें ताडितां, भूतटीं, मूर्च्छा दाटोनि पडियेला. १४
पुढतीं उचलोनियां, शिरीं, भोवंडोनि टाकिला पृथ्वीवरी,
सव्य पाय देवोनि उरीं, हस्त दोन्ही उपटिले. १५
अंगुष्ठ रोवोनि नाभिस्थानीं, छेदोनि सांडिले चरण दोन्ही,
शीर पिळोनियां धरणीं, भिन्न करूनि टाकिलें. १६
जैसा किरात शस्त्रघातें, चारी पाद ग्रीवा हातें,
छेदोनियां कूर्मातें, भिन्न करी भक्षावया. १७
तैसें निवटूनि अस्थिजाळ, शीर केलें गोळांगुळ,
सोडले रक्ताचे खळाळ, नदीलोटासारिखे. १८
सुरीं गर्जोनि जयजयकारीं, पुष्पें टाकिलीं भीमावरी,
ह्मणती ' मारूनि कौरववैरी, जगीं होय यशस्वी.' १९

विराटपर्व—अध्याय ३

# सोनचांपा आणि निवडुंग.

आर्या.

“ न कळे मज निवडुंगा! केलें तुज कां म्हणोनि निर्माण?
भूमीस भार केवळ अससी तूं व्यर्थ जन्म तव जाण. १
भरलें शरीर सारें कांट्यांनीं सौकुमार्य लव नाहीं,
न रमे चित्त बघोनि क्षुद्र तुझें तें प्रसून नयनांहीं. २
तूं मजपुढें कितीसें? ‘ दिनमणिची काजव्यास ये न सरी, ’
माझें सुमन पहा हें रूपें गंधें जनास मुग्ध करी. ” ३
“ बडबड पुरे मदान्धा! सोडुनि दे त्वरित मूढपण हें तूं,
प्रत्येक वस्तु केली ईशें धरुनी विशिष्ट मनिं हेतू. ४
तुजसम माल्य न माझें ह्मणुनि मला खेद अल्पही नाहीं,
त्वत्कुसुमसंगतीनें विषयीं मन सक्त सर्वदा होई. ५
मर्यादोल्लंघन जे करिती त्यां योग्य मार्ग दावाया,
सृजिलें प्रभुनें मातें कां देशी दोष त्याजला वाया. ६
ईशपदप्राप्तीचा मार्ग असे बिकट कंटकीं भरला,
हें तत्व सांगतों मी, जाणे जो तोचि एक जन तरला. ७
रूप तुझें रम्य परी व्यर्थ तयाचा कशास अभिमान?
सृष्टींतिल सुंदरता क्षणभंगुर चंपका! मनीं जाण. ” ८
चंपकानिवडुंगांतें पाहुनि सुचले विचार जे चार,
कथिले त्यांतें कवनीं, ध्यावें रसिकीं तयांतुनी सार. ९

विविधज्ञानविस्तार.

# शिवस्तवन.

## श्लोक.

'जय शंकर पार्वतीवरा, मृड, शंभो, शशिखंडसुंदरा,
मदनांतक, भक्तवत्सला, प्रियकैलास, दयाब्धि, कोमला! १
नच मोक्षपथासि जाणतों, हृदया दुःखदवाग्नि पोळतो,
शशिखंडशिखंडमंडना, नमितों मी तुज दुःखखंडना! २
तम जें पसरे सभोंवतीं, करिं जें अंधचि आमुचि मती,
हृदयांबरिं तें रवीपरी, उगवोनी करिं दूर सत्वरी. ३
नच पाहुं शके तुझ्या पदा, दिठि ही चर्ममयी भवा! कदा,
सदया! अभयासि देउनी, बघ दीनासि दयार्द्रचक्षुंनीं. ४
स्मृति केवळ पावनी तव, स्तुतियुक्ता मग काय बा भव?
पय जें मधुर स्वभावता, किति तें साखर त्यांत टाकितां! ५
विषयुक्तहि देशि मानवा, अमृतातें; भव वारिशी भवा!
शवमुंड धरोनि तूं शिव, समदृष्टी विषमेक्षणा! तव. ६
धृतशूळ परी निरोग तूं, दृढवैराग्य परी सराग तूं,
जरि भिक्षुक तूं महेश्वर, सुविचित्रा करणी तुझी हर! ७
सुरवृक्ष समक्ष पाहतां, करितो इच्छितकामपूर्तता,
नमितां स्मरतांचिही तुला, सुमतींच्या पुरवीशि हेतुला. ८
सहसा यमनागपाश तो, नरडें जोंवरि हें न दाबितो,
अभया मज दे उमापती, गतजीवा कुटिका कशास ती? ९
सविषा भुजगांचिया परी, विषयांचें क्षत बांधतें उरीं,
करुणामृतधार तूं धरीं, अवलोकें निज शीघ्र यावरी. १०

मुनि आजवरी बहू तुवां, कृति केले कृतकृत्य बा भवा,
नयनें अवलोकुनी जया, करुणाब्धे बघ दीन हा तया. ११
बहुतांवरि केलि सत्कृपा, करिशी या मग कां न भूतपा,
धरि तो जरि कूर्म मंदर, कण केवीं मग त्यास दुर्धर ? १२
दिठि ठेवुं तरी कुठें हरा, करुं कायी भजुं केविं बावरा,
असशी तरि बा कुठें मृडा! शरणार्थी तव रक्ष बापुडा. १३
धरणीवरि लोळुं ओरडूं, उर फोडूं शिर तोडुं कीं रडूं,
मजला जरि तूं न पाहसी, स्थिति माझी बहु व्याकुला अशी. १४
शिव सर्वग शर्व शर्मद, प्रणतातें मजहो शिवप्रद,
नमितों तुज ईश दिक्पते, नमितों नाथ पुन्हा जगत्पते. १५
करुणा तरुणेंदुशेखरा, करिं मातें शरणागता हरा,
नमितों गिरिकन्यकासती, करितों मी उभयां तुह्मां नती.' १६
उपमन्युकृता स्तवोत्तमा, जपती संनिध त्या सुरोत्तमा,
अभिवांच्छित भाग्यसंपदा, परमायू शिव देइ त्यां सदा. १७
उपमन्युकृता शिवस्तुती, जपती शंभुगृहीं सदा यती,
शिवलोक मिळे तयांप्रती, शिवसंगें सुखरूप राहती. १८

उपमन्युकृताशिवस्तोत्र.

---

## शिवरायगुणवर्णन.

### श्लोक.

महाराष्ट्रीं झाला उदित गगनीं जेविं सविता,
सुहृत्पद्मालागीं अति विपुल जो भूतिस विता;

निजें तेजें ज्याच्या रिपुतिमिर सारें हरपलें,
दुजे राजे लाजे उडुगण तसे सर्व लपले. १
जयाच्या धैर्याला गिरिच उपमा शोभत असे,
तसी गांभीर्याला जलधि, दुसरी साजत नसे;
जयाच्या बाहूंच्या युगुलिं विलसे शौर्य अगळें,
शकेना वर्णूं तें पटुहि कवि काव्यांत सगळें. २

आर्या.

यद्भट चतुर्यतुरी, असिवेमा घेउनी सहाय बरें,
शुभ्रें यद्गुणवृंदें, यशःपटा विणुनि नेसवीत धरे ! ३

श्लोक.

होतां यावनकीर्तिसागर बहू विस्तीर्ण भूमंडलीं,
त्यानें भारतखंडभूमि अवघी व्यापूनियां टाकिली;
ईशेच्छें शिवजी अगस्तिमुनिसा झाला प्रतापी महा,
संग्रामाचमनें करूनिच जयें त्या प्राशिलें कीं अहा! ४
गुणी शत्रुही आवडे फार ज्यास, कडूही जसी औषधी आतुरास;
जसा सर्पसंदष्ट अंगुष्ठ होतो, तसा त्याज्य त्या दुर्गुणी मित्र होतो. ५
प्रजेस शिकवी गुणां, सतत उद्यमें रक्षणा,
करी भरण देउनी वसनभूषणांही धना;
ह्मणूनि गमला पिता जनगणास तो भूपती
शिवाजि, जगिं अन्य ते जनकमात्रते पावती. ६
श्रीमच्छत्रपती महीश्वर महाराज प्रतापी प्रभू,
राजन्वत्पदवाच्यते चढविली जेणें महाराष्ट्रभू;

तापातें हरुनी सुधाकर जनां देतो जसा स्वीं करीं,
तैसा जो स्वगुणेंकरूनि सकलां दे सौख्य पृथ्वीवरी. ७
त्याचें चित्त कधीं वळे न विषयीं, त्याला न दुःसंगती,
शास्त्राचे पर पार शोधित असे ऐशी तयाची मती;
धर्माचें निज तत्व गुप्त हृदयीं तो वागवी हो भला,
ज्ञानें पूर्ववयींच वृद्धहि जरेवांचून तो शोभला. ८

शिवाजीचरित्र.

---

## मृत्यु.

### श्लोक.

राजा रंक असो, असो धनपती, हो वृद्ध कीं दांडगा,
साधू भोंदु असो, असो कुशलही, हो शांत वा दांडगा;
भेदाभेद न पाहशी कधिंच तूं हा उंच ना हा खुजा,
रे रे फार कठीण दुःसह जगीं मृत्यो! तडाका तुझा. १
हा आहे कविवर्य, मूढजन हा, हा तों प्रजापालक,
बालेचा पति, एकलाच सुत हा, हें नेणतें बालक;
हा कर्ता धनसंपदा मिळविता दारामुलांचा धनी,
नाहीं येत असा विचार तुझिया मूढा, कसा रे मनीं! २
किंवा बुद्धि नसे तुला? पदरचे मंत्रीहि सारे खुळे
चालेना तव राज्यसूत्र बरवें त्यांच्या प्रभावामुळें?

रडत मजकडे पाहुनि, निंदुनि धर्मास, सोडुनि श्वास,
वदला भूप असें कीं, " न धरावा साधुचाहि विश्वास. ४
भीष्म, द्रोण, जयद्रथ, मद्रप, भूरिश्रवा, कृपाचार्य,
शकुनी, अश्वत्थामा, कृतवर्मा, कर्णवीर, पर आर्य, ५
हे सर्व नाथ होते, तरिहि अवस्था पहा कशी झाली !
' दुरतिक्रम काळ, ' अशी वृद्धोक्ति तिची प्रतीति मज आली. ६
एकादशसेनापति मी या कुदशेस पावलों आजी !
काळापुढें तृणचि तो, शक्रशतांशींहि करिल जो आजी. ७
लंघुनि समय गदेनें भीमें केलें मदूरुयुगमथन,
असतील वांचले जे त्यांसि करावें असें तुवां कथन. ८
कपटें श्रीभीष्मप्रभु गुरुहि जयद्रथहि, पांडुतनयांहीं
भूरिश्रवाहि कर्णहि मथिला बहु साधु शूरजन, यांहीं. ९
मोडुनि मदूरु, पाडुनि मज, माझें मर्दिलें शिर पदानें,
यापरिस चित्र दुसरें काय करावें अधार्मिकमदानें? १०
तातातें मातेतें नमुनि असें साग संजया ! बा कीं,
केलें राज्य अकंटक, पुष्कळ सुख भोगिलें जसें नाकीं. ११
विष्णुपदीं पिंड तसा शत्रुशिरीं पाय देय जो डावा,
तो म्यां दिला, अधिक याहुनि जन्मुनि अर्थ काय जोडावा? १२
होउनि पराजित परप्रेष्य न मी जाहलों, न हें थोडें.
अरिहृतपदोपजीवन खाजविलें जेविं आपलें घोडें. १३
आमरण पांडवांशीं माझा निर्विघ्न चालला दावा,
दैवें सुपुरुषपुंगव अभिमानभरें असाचि लादावा. १४

नेलेले नररत्नसंघ अपुरे रे काय झाले वरी
ह्या साठीं नरमौक्तिकें हुडकुनी नेतोसि चोरापरी? ३
नाहीं लेश दया तुला तळमळे प्राणी जरी घाबरा,
रे रे क्रूर कठोर मानस तुझें! पाषाण काळा बरा!
नाहीं काळ न वेळ योग तुजला घेवोनि जाशी क्षणीं,
आल्या दूत तुझे जिवास न मिळे रक्षावयाला धणी. ४
आजी जो जगतीं सुखांत मिरवे तो मित्र नाहीं उद्यां,
जेथें हर्ष वसे तिथें निपजती दुःखोदकाच्या नद्या!
जावें जों शुभ ऐकतांच करण्या स्तुत्यंबरें अर्पण,
मृत्यो! तेथ करावयासि पडतें शोकाश्रुनें तर्पण! ५

अर्वाचीनकविता.

---

## दुर्योधनाचा विलाप.

### आर्या.

धृतराष्ट्र ह्मणे, " सूता ! भीमानें मस्तकीं दिला पाय;
भग्नोरु पांडवाहित मानी मत्पुत्र बोलिला काय ? " १
सूत म्हणे, " काय पुससि ? ज्याचें न कधींहि पादतळ मळलें,
तें राजरत्न तैसें जैसें धूळींत याद तळमळलें ! २
ज्याच्या अंगीं अयुतद्विपबळ, ऐसा समर्थ लोकेश,
जो परशतनियमनपटु, नियमी कष्टेंकरून तो केश. ३

रडत मजकडे पाहुनि, निंदुनि धर्मास, सोडुनि श्वास,
वदला भूप असें कीं, " न धरावा साधुचाहि विश्वास. ४
भीष्म, द्रोण, जयद्रथ, मद्रप, भूरिश्रवा, कृपाचार्य,
शकुनी, अश्वत्थामा, कृतवर्मा, कर्णवीर, पर आर्य, ५
हे सर्व नाथ होते, तरिहि अवस्था पहा कशी झाली !
' दुरतिक्रम काळ, ' अशी वृद्धोक्ति तिची प्रतीति मज आली. ६
एकादशसेनापति मी या कुदशेस पावलों आजी !
काळापुढें तृणचि तो, शक्रशतांशींहि करिल जो आजी. ७
लंघुनि समय गदेनें भीमें केलें मदूरुयुगमथन,
असतील वांचले जे त्यांसि करावें असें तुवां कथन. ८
कपटें श्रीभीष्मप्रभु गुरुहि जयद्रथहि, पांडुतनयांहीं
भूरिश्रवाहि कर्णहि मथिला बहु साधु शूरजन, यांहीं. ९
मोडुनि मदूरु, पाडुनि मज, माझें मर्दिलें शिर पदानें,
यापरिस चित्र दुसरें काय करावें अधार्मिकमदानें? १०
तातातें मातेतें नमुनि असें साग संजया ! बा कीं,
केलें राज्य अकंटक, पुष्कळ सुख भोगिलें जसें नाकीं. ११
विष्णुपदीं पिंड तसा शत्रुशिरीं पाय देय जो डावा,
तो म्यां दिला, अधिक याहुनि जन्मुनि अर्थ काय जोडावा? १२
होउनि पराजित परप्रेष्य न मी जाहलों, न हें थोडें.
अरिहृतपदोपजीवन खाजविलें जेविं आपलें घोडें. १३
आमरण पांडवांशीं माझा निर्विघ्न चालला दावा,
दैवें सुपुरुषपुंगव अभिमानभरें असाचि लादावा. १४

सुक्षत्रियासि जी गति बहुमान्या, तीच हे मला घडली,
तनु मनुपूत घृताहुनि मखशिखिकुंडीं तसी रणीं पडली. १५
शल्ें विषें वधावा जैसा सुप्त प्रमत्त अनयानें,
वधिला तसा अधर्में हा तेजस्वींद्र पांडुतनयानें. १६
या छळवधें पराचें दुर्यश माझें जगीं सुयश झालें,
आजन्मसदाचारें यावें तें सुफळ शेवटीं आलें. १७
कृप, कृतवर्मा, अश्वत्थामा, यांतें निरोप सांग असा,
पांडवखळ च्छळबळें वध करितिल, फार सावधान असा. १८
गुरु, सुत, बंधु, सुहृज्जन गेले स्वर्गासि सर्वही नीट;
मीहि निघालों, आला प्रांतविरस विषय समजतां वीट. १९
व्याकुळ होइल माता तात सुनांच्या सदा विलापानें,
शोकें बहु, न विषाच्या बहु ताप त्रास दाविला पानें. २०
पतिबंधुलयें दीना होइल धीरा पर स्वसा माजी
मज मायसी म्हणे, 'बा! कर गा देउनि पर स्व सामा जी!' २१
होईल लक्ष्मणाची बहुधा पृथुलोचना प्रसू नाहीं;
वज्रप्रहार सोशिल कसि ? व्हावी मूर्च्छिता प्रसूनांहीं. २२
जरि काय वाग्विशारद येता चार्वाक बहु बरें होतें;
करिता अपचिति माझी दुःसाध्यहि कार्य साधिता हो! तें." २३
ऐसे विलाप बहुविध केले सांगों नृपा, किती काय;
बहु जन ऐकुनि रडले, पडले शोकांत बोलले 'हाय!' २४

सचराचरा धराही त्यासमयीं कांपली नरवरा हे!
लोक पळे, मृगहि खगहि ऐकुनि तन्निकट तो न रव राहे. २५

भारत—गदापर्व.

---

## कविप्रशंसा.

### श्लोक.

जी दूषणान्वितहि शून्यचि दूषणांनीं,
तेंवी खरांकितहि कोमलवर्णखाणी;
ऐसी अपूर्व कृति ज्या कविराजयाची,
त्या वाल्मिकीप्रति असो नति आज याची. १

ज्याची गिरा प्रसवली भुवनैकसार
श्रीभारत, प्रणति त्यास अनेकवार;
तें होय आश्रय ह्मणोनिच भूषणानें,
संज्ञा तदंक वरिली जनिं भारतीनें. २

जो अग्रगण्य असतांहि अकिंचनांत,
मोठी ‘ समर्थ ’ पदवी मिरवी जगांत;
‘ स्वामी ’ जयास म्हणती असुनीहि ‘ दास ’
तो साधुवर्य नमिला गुरु रामदास. ३

भागीरथीविमलभंग दुभंग होती,
तेणें अभंग परिभूत तयां करीती;

ऐशी अलौकिक करी कृति वैश्य कोणी;
    त्याचे घरीं चरणरेणु शिरीं नमोनी. ४
नांवेंचि वामन, अवामनकीर्तिखाणी,
    ज्यालागिं वाम न सुधामधुगीत वाणी;
देई प्रतिक्षणिं सुमोद नवा मनाला,
    वंदीं अशा भुवनवंदित वामनाला.. ५

पद्यमंजरी.

---

## रायगड.

### श्लोक.

राष्ट्राचा इतिहास पूर्ण करणें कर्तव्य हें आपुलें
    ज्याच्या निर्मल हृत्पटावर असे हें स्पष्ट रेखाटलें;
त्यांनीं रायगडीं प्रवास करुनी घालावयाला भर,
    त्यामध्यें निजबुद्धिला रमवुनी व्हावें सदा तत्पर. १
तेथें काय असे गडावर असें आणा न चित्तीं कदा,
    तेथें काय नसे मनास अपुल्या ऐसें पुसावें सदा;
केलें राज्य शिवाजिनें बनवुनी जें वर्णनीय स्थल,
    तेथें काय कमी तयास पडतें सद्बुद्धिचें ज्या बल. २
येतां तो इतिहासकार वरती लेखाप्रती जीववी,
    कोठें काय असे बघूनि नयनीं चित्तांत तें सांठवी;

भ्रांती दूर करी बघूनि अवघें, सत्यासि घे शोधुनी,
  या यत्नें शिवरायवृत्त सगळें लोकांस दे सांगुनी. ३
येई येथ चारित्रकार तरि तो संजीवनी मेळवी,
  सांगाड्यामधिं चेतना भरुनियां त्यालागिं तो खेळवी;
डोळ्यांनीं बघतां स्थळें मतिलता घे चारुता ती नवी,
  काळोखांतिल वस्तुला नव जसें सौंदर्य देतो रवी. ४
आला तो जरि चित्रकार वरती चित्रें जुनीं रंगवी,
  किंवा नूतन योजुनी निजमनीं काढूनियां दाखवी;
टोंकाच्या वरुनी निघे हिरकणी धैर्यें तळीं यावया,
  किंवा यत्न करी महार वरती जाण्यास, काढी तया. ५
संभाजी करणी भयंकर करी दावील ती लोचनीं,
  भिंतीच्या मधिं सोयरेस चिणिलें दावील तें काढुनी;
कैद्याला करिती गडावरुनियां कोठें कडेलोट तो,
  देखावा उठवूनि चित्त अमुचें वेधीलसा वाटतो. ६
हर्म्यांचा अवशेष भाग लिहुनी दावील तो सज्जना,
  किंवा जीर्ण समाधि चित्रिं लिहुनी बोधील त्यांच्या मना;
किंवा तो इतिहास रम्य जिववी जो जाहलासे जुना,
  लोकांचें रमवूनि चित्त सहजीं मोहील जिज्ञासुंना. ७
कोणी कल्पक येथ ये तरि लिही कादंबऱ्या सुंदर,
  वाचाया झटतील लोक सगळे ठेवूनियां आदर;
दावी धीर उदार वृत्ति सगळ्या लोकां शिवाच्या जरी,
  कर्तव्यास करूनि धन्यपण तो घेईल लोकीं तरी. ८

कोणी नाटककार येउनि वरी पाही समाधीप्रती,
होतां दर्शन निर्मळीं शिवगुणीं रंगेल त्याची मती;
शृंगारादिक सज्जनप्रिय रसां त्याच्या चरित्रीं भरी,
प्रेमें नूतन नाटकास रचुनी तल्लीन लोकां करी. ९
येथें ये कवि दर्शनार्थ तरि तो चित्तांत दुःखें भरे,
भग्ना पाहुनियां समाधि जल तन्नेत्रांतुनी पाझरे;
स्फूर्तीचे फुटतील नूतन गमे वाणीस त्यांच्या झरे,
जैसा पाहुनि चंद्रकांत विधुला प्रेमामुळें पाझरे. १०
पूर्वींचा इतिहास रम्य सगळा चित्तांत त्याच्या स्फुरे,
त्याची लीन मती क्षणीं शिवगुणीं रंगूनियां वावरे;
त्यांची चित्रचरित्रगायनरसीं वाणी शिवाच्या शिरे,
चाखाया रस त्यांतला रसिक ते होतील कीं घाबरे. ११
जिज्ञासावश जाल होउनि तरी ज्ञानार्थ जोडाल कीं,
प्रेमानें जरि जाल तेथ भर ती घालाल मोठी सुखीं;
कर्तव्यास मनीं धराल तरि दे उत्साह तुह्मांप्रती,
टाका आळस जा वरी बघुनि घ्या नेत्रीं शिवाच्या कृती. १२

रायगड काय ह्मणतो ?

---

## दुसरी द्वारका!

**श्लोक.**

देतां शीघ्र निरोप देव, नमितां, भूदेव दे उत्तमा
आशीर्वादुनि साधु वैदिक विधी चाले तया सत्तमा;

जाती बोलत, बोळवीत नगरीं, द्वारीं नमस्कारिती;
श्रीगोविंदगदादि यादव सभे तत्प्रीति विस्तारिती. १
सर्वांसि थोपुनि पथीं, द्विजराज चाले;
श्रीकृष्ण यादव समस्त सभेसि आले;
मार्गीं ह्मणे मुनि मनीं, 'मज काय केलें?
देतां हरी चिर मला, तरि काय गेलें? २
नारी ह्मणे मज घरीं, 'हरिलागिं याचा.'
याचा असा विदितभाव निरामयाचा;
या चालतां मज पथीं श्रम काय झाला;
जा लाभ हाचि हरिभेटि दृगंबुजाला.' ३
हळु हळु पथ लंघी; लंघितां गांव खेडें,
निरखुनि जंव पाहे, होतसे चित्त वेडें;
पुरुष सरस देखे, आणि योषा सुकेशी;
पुनरपि अजि आलों काय मी द्वारकेशीं? ४
पाहे खूण, तरू, तटाक, डगरी त्या आपुल्या वाटती;
कैंचीं येथ सुवर्णरत्नशिखरें? तेजें दिशा दाटती;
पाहूं कां पुर तें ह्मणोनि पुरतें येतां प्रतीती बळें,
दारीं वाजति भेरि दुंदुभि, सभावादें तुरें तुंबळें. ५
मानी मंदिर इंदिरालय दुजें शाळा विशाळा घरें;
द्वारें रत्नमयूखमंडिततरें, भोगागरें नागरें;
झालें काय? ह्मणे, ' अहा! घडि घडी माझें तरी झोंपडें; '
' कोठें जाउं? बसूं वसूं? ह्मणतसे मानी मनीं सांकडें. ६

द्वारांतुनी निरखितांचि, कुचैलकांता
कांतास बाहत उठे कुटिलालकांता;
' कांतार हें तंव नव्हे; भुललेत कां जी ?
कां, जीवनामृत उपेक्षुनि, प्याल कांजी ? ' ७
' हे कोण पैं नृपवधूसम दिव्यदेहा ?
दे हाच कां मज कटा ' ह्मणुनी वदे हा.
देहाच रात्र करुनी भुलले तराणी;
राणी ह्मणे, ' पुरविली हरिनें शिराणी. ' ८
' कैचें तुला वसन ? भूषणरत्नराजी ? '
' राजीवनेत्र रिझला पृथुकांचुरा जी !
राजी जया हरि तया न उणेंचि कांहीं;
कां हीरकंकण न लेजति बायकांहीं ? ९
देखून देव, न धरा खुण माणसाची;
साचीच हे स्थिति घडे, पथही तसाची;
साचीच हे जड मनादिक इंद्रियांची,
याची न ते विषयिं वृत्ति बुडे जयाची. १०
मातें पाहुनि चित्र काय करितां? कां पां! तुह्मी ही असे?'
तों देखे द्विजराज आपण दुजा श्रीकृष्ण झाला असे;
माथां मंदिल, दिव्यरत्नकटकें हातीं गळां हार ते,
तेजःपुंज विराजती दशदिशा ऐशा स्वरूपा रते. ११
आनंदला बहु कुचैल सुचैल झाला;
आला भला निजघरासि, अपार घाला;

आनंदला सम सदा बहु भाग्य लाहे;
आनंदनंदन ह्मणे, ' हरिची कृपा हे. ' १२

सुदामचरित्र.

---

## रामशास्त्रीबोवांचें माधवरावांशीं शेवटचें भाषण.

### श्लोक.

" काकांना नृपते! अमात्यपदवी द्यावी बरें वाटतें,
तेणें हर्षित ही प्रजा सपृतना होईलसें भासतें;
तैसे त्वां जनसौख्यसाधक नृपा नानादि मंत्री भले
योजावे; सुविचार हा मज गमे, जाणें न ह्या वेगळें. १

न्यायासनीं बसुनियां नयपद्धतीला,
दावीन मी नरपते! तव बांधवांला;
नारायणास जपणें न अशक्य वाटे,
लावीन त्यास नृप! बोधुनि योग्य वाटे. २

राहें मनीं शांत नृपा प्रसन्न! आतां नसावें अणुमात्र खिन्न!
कर्तव्य केलें झिजवूनि काया, ऐसें पहा बोलति लोक राया! ३
जो दे कृपेनें मनुजत्व थोर, जो दे तसें ज्ञान तुह्मां अपार,
जो रक्षितो नित्य अहो जपोनी, त्याला स्मरावें शरणा रिघोनी! ४
जो पापपुण्या अवलोकुनीयां, शासी जनां त्या करुनी उपायां,
आतां भजावें मनसीं नृपाळ! देवो तुम्हां सद्गति तो कृपाळ! ५

नृपवर्य! अम्हांस पाळिलें, बरवें आजवरी तुम्हीं भलें,
तुमचा उपकारभार तो, शिरिं मोठा सकळांस वाटतो. ६
उपकारभरें अहो लवे, अमुचें मस्तक, त्या न तोलवे,
विनवी नरवीर लोभ हा, स्थिर राहो अमुच्यावरी अहा ! " ७

पद्यरत्नमाला.

---

## कुशलवांचें लक्ष्मणाशीं युद्ध.

श्लोक.

जैसे वायुविभावसू कुशलव क्रोधें तसे धांवले,
विस्फारूनि धनुर्लतांसि सहसा सैन्यांतरीं पावले;
केलें मर्दन मांसकर्दमपटें रक्तस्रवंती किती
तेथें वाहति! पाहती, भट मनीं कल्पांतसें तर्किती. १
कितेक रथ मोडिले ध्वज कितेकही तोडिले,
कितेक शर सोडिले गज कितेकही झोडिले;
असंख्य भट ताडिले यमपुराकडे धाडिले,
शिरःप्रकर पाडिले बहुत यापरी नाडिलें. २
तेव्हां शूलगदापरश्वसिलताशक्त्यृष्टिचक्रायुधें,
कुंतप्रासभृशुंडिमुद्गरमहापाशादिनानाविधें
सर्वांहीं त्यजिलीं लवावर, तदा तो त्यांस खंडी शरें,
मूर्खांच्या वचनासि पंडित जसा निःशंक युक्त्युत्तरें. ३

तेव्हां तो रुधिराक्ष राक्षस गदा हाणी लवाच्या शिरीं,
मूर्च्छा पावुनियां उठे पुनरपि क्रोधें मुहूर्तांतरीं;
केशीं त्यासि धरूनि मस्तक तदा कुंतायुधानें हरी,
भास्वद्दत्तधनुः करीं करुनियां गर्जे हरीच्या परी. ५
सौमित्री वारुणास्त्रें शमवित दुसऱ्या मारुतास्त्रासि सोडी,
तेव्हां वायु प्रचंडध्वजरथगज जे त्यांसि अत्यंत झोडी;
आकाशीं शुष्कपर्णापरि किति फिरती भ्रांत सारे पदाती,
स्वर्गातें वृक्ष जाती द्विजसम उडती शैलही भीति देती. ६
ज्यांपासूनि नभोंतरीं शिखिशिखा विद्युत्समा फांकती,
ऐसे बाण लवाग्रजें कवळितां लोकेशही धाकती;
त्यांहीं लक्ष्मणहृत्कपाटकवच च्छेदूनियां भेदिलें,
त्यांतें भूवरि पाडिलें मग कुशें मूर्च्छास्वहस्तीं दिलें! ६
जेव्हां दूरुनि बंधुसिंहानिनद श्रोत्रीं तयांच्या धसे,
पाहे तों बळराजिवेष्टित लव क्ष्माजासुताला दिसे,
हातीं घेउनि खड्ग चर्म परम क्रोधें तदा धांवला,
अग्नीलागिं सहाय मारुत जसा जाऊनियां पावला. ७
द्विधा गज विदारिले रथहि धूळिला अर्पिले,
पदातिहय चूर्णिले पिशितभुक् क्षणें तर्पिले,
कितेक पललक्ष्माधर विनिर्मिले क्ष्मातळीं,
कितेक रुधिरें नदी कितिक कूप वापी तळीं. ८

कुशलवचरित.

## कालमहिमा.

### श्लोक.

कोठें गेले थोर पृथ्वीपती ते?
सांगा गेले शूर कोण्या गतीतें?
झाले गेले मृत्युपंथेंचि सारे!
कां देखाना सर्व कीं हें असारें? १

त्यांची ती रणकीर्ति शत्रुहननीं, उद्दाम तें वर्तन,
त्यांचे ते मुशलापरी भुज, जयां भ्याले अरींचे गण;
त्यांचा तो घनघोर शब्द चढवी आंगीं रणाची रती,
तीं आरक्त विलोचनें, सकलही झालीं कथामात्र तीं! २

नाम काल तें थोर वाटलें, सुकृतिकीर्तनीं कर्ण कोंदले,
आज नष्ट तें, होय विस्मृती! कीर्ति लोपली कालभक्ष्य ती! ३

तिमिर झांकितां गगनमंडला, तुटुनि अंबरीं क्षण झळाळला,
केतु दीपवी जनविलोचना, तों गिळी तया तम विरोचना! ४

नर हा किति दुर्लभ पाहे, क्षणभंगुर जीवित आहे,
नरदृष्टि असे किति कोती, किति तो भ्रमला गणगोतीं! ५

किति गर्वभरें तो मनिं फुगला, क्षण एक असे बुद्बुद तगला!
चिरकीर्ति ह्मणे मी मिळविन ती, रविचंद्र नभीं जोंवरि तपती. ६

मोठालीं देवळें तूं धन वितरुनियां बांधिसी, आस ही कीं
राहो माझी सदाही अभिनवरुचिरा कीर्ति साऱ्या त्रिलोकीं!
रे मूढा! कीर्ति कैशी अमर विलसते, मर्त्य तूं नाशवंत!
कोटीचीं कोटि वर्षें क्षणसम गमती काल आहे अनंत! ७

पाहें हा भूमिभागीं उलथुनि पडला स्तंभ मोठा जयांचा,
चौबाजूंनीं जयाच्या विलिखित दिसतो लेख चारी लिपींचा;
सांगें तूं अर्थ याचा, नृपति कवण तो, कोरिला हा जयानें ?
भाषावेदी विवादा करिति, म्हणति, 'हा अर्थ' ऐसें हटानें. ८
गेला तो नृपती! तदन्वय तसा! सामंत कोठें अतां?
त्याची ती नगरी सुरम्य, वनिताशालाहि वाताहता!
गेलें वैभव ये फिरूनि कसचें? तो काल गालीं हंसे!
कालाचा महिमा अगाध समजें तद्भक्ष्य सारें असे ! ९

अर्वाचीनकविता.

---

## मोह आणि जातिलता.

### श्लोक.

अहो! उपवनांत ह्या सहज चालतां चालतां
किती सुमतरू किती निरखिल्या प्रफुल्ला लता!
कितेक कुसुमांवरी नयन माझिये वेधले,
कितेक सुमनांतले मधुर गंध मी घेतले. १
विलक्षणचि वास हा परि कुठोनि येतो बरें?
जयें रसिकनासिका भरुनि चित्त हो घाबरें!
अहा! समजलों. महाविटप तो दिसे तो पहा!
भरी खचित तोच हो! उपवनांत दुर्गंध हा. २

महाविटप मोह जो वरुनि फार झांपाळला,
जयें धरुनि थोरवी गगनभाग कोंटाळला,
पिवोनि मधु ज्याचिया मधुप भोंवतीं भोंवतीं,
यदीय मधु मंजरी बघुनि तीस ते झोंबती. ३
तमालतरुतुल्य जो किमपि मूळचा सांवळा
असोनि मधुपासवें धरि विशेष काळी कळा,
असा अधम मोह तो पसरुनी सुरागंध हा,
असेव्य करितो स्वयें सकल रम्य आराम हा! ४
अहो! परि, तयावरी दिसतसे लता कोणती?
न संशयचि. जाणिली रसिकरम्य जातीच ती!
पहा! किति विशुद्धसा प्रणय ठेवुनी अंतरीं
अनन्यगतिनें सतीसम तदाश्रया ती धरी! ५
किती सुमनसंघ हा धवल तारकासारखा!
तिच्यावरि फुलोनियां हंसत सूटला सारखा!
कवींस जणु सूचवी, मुदित तूमचा मी सखा,
अशा मजासि पाहुनी तुह्मिहि मानसीं हारिखा! ६
अये! कुसुमिते लते! विभव हें तुझें पाहुनी,
दया सहृदयास या वितळवोनि ने वाहुनी!
अहा! सुगुणसुंदरी! तुज बघोनि मोहासवें
न खेद मज सोसवे! नयनिं लोटलीं आसवें! ७
तुझे कुसुमगुच्छ हे विकसुनी, तयांच्या वरी
जरी झुलुनि सारखा अलिगण स्तुतीतें करी;

पराग रसबिंदुही, गळति त्यांतुनी भूवरी,
तरी सुरसवल्लरी! तुजसि घाण मद्यापरी! ८
कसा स्वसुमनांतला मृदु सुगंध नेला लया
तुवां? करुनि आसरा तरुसि ह्या सुराआलया!
उदंड गुण जो तुझे सहज मद्यगंधें हरी,
अशासि कर कां वृथा वद दिलास तूं वल्लरी! ९
परंतु तुज कासया उगिच बोल लावूं बरें?
विधीस जरि वावुगें करुनि, तेंच वाटे बरें!
कसें तरि करावया अतिविचित्र ह्या नाटका,
वदे मधुर कोकिला, तिजसि तो विकी खाटका! १०

काव्यरत्नावली.

---

## भगवद्दर्शन.

### श्लोक.

श्रीमन्मंदिर एक सुंदर मला जातांचि जें लागलें,
त्यामध्यें शिरतांचि भान सहसा गेलें प्रिये! मागलें,
पुण्यश्लोकगृहांगणांत गमलें स्वर्गीं असें मी असें,
ब्रह्मानंदचि पावलों सुवदने! तें आजि सांगों कसें! १
गेलों मी जेधवां कीं वरतनु सुभगे! अंगणीं श्रीहरीच्या,
होता तेव्हां पलंगीं यदुकुलमणि तो रुक्मिणीसुंदरीच्या,

तेथें दूरूनि मातें निरखुनि सहसा धांवला दीनबंधु
स्थानस्रस्तोत्तरीयालकमुकुटपटस्रक्‌कारुण्यसिंधु. २
पर्यंकीं मज बैसवूनि सुभगे! अत्यादरें श्रीकरें
पाद क्षालुनि घेतलें जल शिरीं पुण्याकरें तें करें;
कर्पूरागरुकुंकुमें मृगमदें स्रग्भूषणें चंदनें
देवाच्यापरि पूजिलें सुरनुतें श्रीदेवकीनंदनें. ३
धूपें दीपें दिव्यतांबूलदानें,
मातें भार्ये! पूजुनी संप्रदानें,
कांते! माझ्या पाउनी संगतातें
दीनत्राता बोलिला स्वागतातें. ४
तेव्हां चामर तालवृंतक करीं घेऊनि शैब्या करी
मन्मार्गश्रम दूर, तें परिशिलें अंतःपुरीं लौकरी;
कांता श्रीहरिच्या वरोरु सकला अत्युत्सुका धांवल्या,
मातें पाहुनि, वंदुनी बहु मनीं त्या विस्मया पावल्या. ५
कृष्णाच्या वनिता विलोकुनि मला त्या बोलिल्या कीं, ‘असा
भिक्षु क्षाम कुचैल विप्र हलभृत्पूजार्ह झाला कसा?
पर्यंकास्थित रुक्मिणी त्यजुनियां, हा अग्रजाचे परी
नाथें भेटुनि पूजिला, जनिं नसे पुण्यासि याच्या सरी. ६
शोभाहीन, कुरूप गर्हित पहा हा दुर्गत ब्राह्मण,
पूज्याचें न दिसेचि एकहि तरी देहावरी लक्षण.
कैसा हा भुवनत्रयैकगुरुनें लक्ष्मीनिवासें परी
आलिंगूनि समर्चिला निजकरीं सीरायुधाच्यापरी. ७

श्रीकृष्णांतःपुरींचा सकलजन असा पावला विस्मयाला,
भक्तीं वात्सल्य जें त्या त्रिभुवनपतिचें तें कळेना तयाला.
साध्वि ! प्रेमेंकरूनि प्रभु मग मजशीं बोलिला तेंचि ऐकें,
होतील त्वच्छ्रुतीतें गृहिणि! निरुपमें हृत्सुखें तेथ नैकें. ८

सुदामचरित्र.

---

## सीताशुद्धि.

### ओंव्या.

नयनीं वाहती अश्रुपात, जानकी वानरां आज्ञापित,
ह्मणे, ‘ कुंड करोनि अद्भुत, अग्नि सत्वर पाजळा. ’ १
तत्काल विस्तीर्ण केलें कुंड, काष्ठ पर्वत घातले उदंड,
अग्निज्वाला माजल्या प्रचंड, निराळ ग्रासूं धांवती. २
जगन्माता बोले वचन. ‘ जरी मी शुद्ध असेन,
तरीच येईन परतोन, पहावया चरण स्वामीचे.’ ३
सुरासुर वानर ऋक्ष मुनीश्वर, अवघे झाले चिंतातुर,
ह्मणती, ‘ हा अनर्थ थोर, सुखामाजीं ओढवला! ’ ४
रण माजलें देखोनी, वीर निर्भय अंतःकरणीं,
तैसी अग्निसमोर विदेहनंदिनी, निर्भय मनीं सर्वदा. ५
कुंडासी करोनि प्रदक्षिणा, दृष्टीभरी पाहिलें रघुनंदना,
कंठींचा सुमनहार काढोनि जाणा, अग्नीवरी टाकिला. ६

'सत्य जय सत्य!' ह्मणोनी, त्रिवार गर्जे त्रिजगज्जननी,
अग्निकुंडीं तये क्षणीं, उडी घातली अकस्मात. ७
मंगलजननीचें हृदयरत्न, अग्नीमाजीं पडतांचि जाण,
कन्या गांजली ह्मणोन, पृथ्वी कांपे थरथरां. ८
जाहली एकचि आरोळी, शोकार्णवीं पडली कपिमंडळी,
सकळ सुरवर व्याकुळीं, प्रळयकाळ भाविती. ९
दशदिशांमाजीं दाटला धूर, कढों लागले समुद्र,
वैकुंठ कैलासपदें समग्र, डोलों लागलीं तेधवां. १०
थरथरां कांपे अंबर, नक्षत्रें रिचवती अपार,
सौमित्रिसुग्रीवादिक वानर, नेत्रोदकें ढाळिती. ११
ह्मणती, 'अग्निमुखींहूनि पुढती, पुन्हा कैंची देखों सीता सती!'
बोलती सर्व, 'कर्मगती, परम दुर्धर वाटतसे.' १२
एक घटिकापर्यंत, अग्नीमाजीं जानकी गुप्त,
तों मस्तकीं पुष्पें घवघवीत, अकस्मात निघाली! १३
पहिल्या रूपाहूनि आगळें, शतगुणीं रूप जाहलें,
प्रभेनें भूमंडल भरलें,आश्चर्य झालें ते वेळीं. १४
सीता रामाची चिच्छक्ती, ती गेलीच नाहीं लंकेप्रती,
हे खूण साधुसंत जाणती, जे कां वेदांती सज्ञान. १५
असो जानकी देखतां साचार, जाहला एकचि जयजयकार,
अष्टादश पद्में वानर, नमस्कार घालिती. १६
मग पुष्पांचे संभार, सीतेवरी टाकिती सुरवर,
ह्मणती, 'सीतासती पवित्र,' सर्व नमस्कार घालिती. १७

सौमित्रि, सुग्रीव, बिभीषण, जानकीस घालिती लोटांगण,
हनुमंत नमूनियां चरण, आनंदें पूर्ण नाचतसे. १८
असो श्रीरामाकडे सीतासती, चालली तेव्हां हंसगती,
मग उठोनियां रघुपती, उभा ठाकला ते वेळे. १९
श्रीराममुख विलोकून, सीता करी हास्यवदन,
धांवोनि दृढ धरिले चरण, जगद्गुरूचे ते काळीं. २०
मग जानकीस उठवोनी, क्षेम देतसे कोदंडपाणी,
मग वामांकावरी घेउनी, रघुनाथ तेव्हां बैसला. २१
नव मेघरंग रघुनाथ, जानकी विद्युल्लता तळपत,
सीताराम देखोनि समस्त, जयजयकार करिताती. २२

रामविजय. अ. ३४

---

## प्रभुलीला.

### श्लोक.

मनें धरिसि आवडी सदय एकनाथावरी,
ह्मणूनि जल कावडी भरुन नित्य खांदां धरी;
सुखेंचि लुगडें धुती कर तुझे जनाबाईचें,
तिचें करुन भागती दळण कांडणें घाइचें. १
प्रतापमहिमा प्रभो ! तव कथूं पदाचा किती ?
तुझी चरणधूलिका सुरहि वंदुनी चाखिती;

अखंड तव सौख्यविश्रमद साधुसंतां पद,
सदां खल जनांस तें भुवनिं दुःखसंतापद. २
स्मरे तुजसिं जो मनीं इतर यत्न होतां रिते,
पदाब्जरज त्या तुझें सुपतितास हो तारितें;
पडे विपिनिं होउनी, जड शिळा अहल्या सती,
रजा शिवुनि उद्धरे विसरली निजायास ती. ३
तुझी पदसमर्थता स्वमनिं एक जाणे बली,
जिरेचि तदहंकृति क्षणिं तुझ्या पदानें भली;
मृकंडुकुमरावनीं प्रकटुनी उभा ठाकशी,
तयीं कळुनि ये यमा तव असह्य लत्ता कशी ? ४
तुझें स्वमनिं जाणुनी पदमहात्म्य कालिंदि, ती,
अचिंत्य सुखदा तया प्रथम जाहली वंदिती,
दुभंग मग होउनी तव पित्यास तेंव्हां दिली,
व्रजीं त्वरित जावया सुलभ वाट, लीला भली ! ! ५
जिच्यास्तवचि सृष्टि ही भ्रमुनियां श्रमा पावली,
तुझ्या सतत लागली झुरुनि ती रमा पावलीं,
अखंड पददर्शना, मुनिमनेंहि थोपावलीं,
व्रजीं चरणसंगमा टपुनि सिद्ध गोपावली. ६
मृगघ्न शिवरात्रिला सहज तारिला पारधी,
क्षुधार्त उपमन्युला शिशुसही दिला क्षीरधी;
ध्रुवा अढळ सत्पदीं बसविलें समस्तांवर,
प्रभो ! सतत राहशी बलिगृहीं उभा स्थावर. ७

मरुत्सुतबिभीषणां करिसि तूं चिरंजीव रे,
सदैव वश पांडवां, करिसि नित्य त्यांचें बरें;
सुवर्णनगरी दिली द्विजसुदामिया द्वारका,
वदान्य जगिं नान्य गा ! प्रभुवरा ! तुझ्या सारखा. ८
किती सकृपता तुझी ? सुजन दुष्ट कोणी तुला
करूनि नति बाहितां, करिशि पूर्ण तद्धेतुला;
गजेंद्र तुज लापितां, करुन मुक्त दुःखांतुन,
सपत्नयुत तारिला क्षणिंच आपुल्या हातुन. ९
वनीं शबरि अर्पितां स्वरददष्ट बोरें तुशीं,
मनीं मधुर वाटलीं, जशि सुधा प्रभो ! रे तशीं;
असा घडवुनी तपाहुनिहि लाभ मोठा, वरें
दिला तिजसिं शेवटीं निजपदीं प्रभो! ठाव रे. १०
मदांध कुतराच तो कुरुप, त्याचिया भोंकण्या
न मानुनिच सेविल्या विदुरमंदिरीं भो! कण्या;
सुदामहि समर्पितां स्वकरिं अल्प पोहे तुला,
सुकेचि झणिं फांकुनी करिशि पूर्ण तद्धेतुला. ११
तुझी सगुणरूपता असति नित्य बा ! हेरली,
परंतु करुं काय मी ? मज न दृष्टि बाहेरली!
तरी मजशिं देउनी सकृप तूं हृदंतर्ज्ञता,
त्वरें प्रकट दाखवीं सुखद चित्स्वरूप स्वता. १२

प्रभुलीलाशती.

# श्रीकृष्णाची अग्रपूजा.

## ओंव्या.

हृदयीं जाणोनि कार्यमूळ, आग्रह न करीच गोपाळ,
धर्में प्रार्थितां तात्काळ, पूजासनीं आरुढे. १
सोमकांत श्वेतचवाई, शेषाकृती शोभली पायीं,
वरी आदरें क्षीराब्धिशायी. धर्मराजें बैसविला. २
चरणक्षालना कनकपात्र, पुढा ओढवी माद्रीपुत्र,
गंधपुष्पेंसीं स्वतंत्र, भीमार्जुन ठाकले. ३
तळवटीं क्षीरोदक उत्तम, वरी शोभला मेघश्याम,
जेवीं कैलासा द्यावया क्षेम, नीलजीमूत पातला. ४
छत्रचामरें उभय व्यजनु, धरिती द्रौपदीचे नंदनु,
पादुका घेउनी अभिमन्यु, उभा ठेला जवळिके. ५
वाद्यें लागलीं सुस्वरें, भक्त गर्जती जयजयकारें,
भीष्मविदुर प्रेमादरें, उभे ठेले आवडी. ६
वैष्णवकीर्तनाची सरळी, नाचों लागली धुमाळी,
विष्णुचरित्रें नामावळी, एक टाळी हरिनामें. ७
देव बैसोनी विमानीं, वर्षाव करिती दिव्यसुमनीं,
सनकादिकांचिया नयनीं, आनंदाश्रु लोटले. ८
चरण क्षालितां धर्मातें, धाविन्नलीं त्रिलोकींचीं तीर्थें,
तळीं वोढविती माथें, पवित्रपणा लागोनी. ९
जया चरणामृताची गोडी, लागतां लक्ष्मी झाली वेडी,
दिव्यांगनेनें आवडी, जे न सांडी सर्वथा. १०

अरुण संध्याराग दोन्ही, मिनले बालार्कतेजकिरणीं,
कीं पद्मराग माणिकमणी, एकत्र पायीं पातले. ११
भूमंडळींचीं रातोत्पळें, रंग ओपितां सहपरिमळें,
ह्मणोनि चरणपद्मीं पाणितळें, संवाहनितां रंगलीं. १२
चंद्रें शरीर कर्वतीं दिधलें, खंडूनि केलीं दहा शकलें,
पादांगुळी जडोनि जाळें, नखमणी चंद्रासारिखे. १३
ध्वज अंकुश वज्रपद्में, ऊर्ध्व रेखा अति उत्तमें,
सामुद्रिकें पाहतां उपमे, ठाव न दिसे द्यावया. १४
खंडी पापांचे पर्वत, तेंचि वज्र सुशोभित,
पद्मचिन्हीं पद्मांकित, पद्मा वसे श्रियेसीं. १५
कीं चरणरूप नौका खरी, हेळा तारी भव दुस्तरी,
ध्वजमंडित गुणसाजिरी, जीवनावरी जगातें. १६
साधकांतें मनसंघट, लक्षोनि ऊर्ध्व रेखेची वाट,
चहूं मूर्तींचे लंघोनि घाट, निर्गुणब्रह्मीं मिसळती. १७
कीं श्रीकृष्णपादांबुजीं पवित्र, प्रयागराज तीर्थक्षेत्र,
मिनली त्रिवेणी एकत्र, प्रत्यक्ष नयनीं दिसताहे. १८
तळवे आरक्त प्रवाळवर्णी, तेचि सरस्वती सिंदूरवर्णी,
बाकी सोज्वळ देवतटिनी, भागीरथी खळाळे. १९
तेथें जडले रक्तमणी, ह्याचि तपोधनांच्या श्रेणी,
ज्या देखतां नक्षत्रगणीं, देह धरणीं टाकिजे. २०
सुनीळ कालिंदीचे वोघ, तेंचि जानुद्वय अव्यंग,
ध्वज अंकुश चिन्हीं चांग, अक्षयवटसंगमीं. २१

योगियांचे मनोमराळ, स्वेच्छा क्रीडती सर्वकाळ,
भक्त श्रद्धाळु प्रेमळ, क्षेत्रवासी ते क्षेत्रीं, २२
प्रयागीं मोक्ष पाविजे मरणें, येथें मोक्ष पाविजे श्रवणें,
ह्मणोनि कवींचें बोलणें, सांगे योग्य दृष्टांत. २३
इंद्रनील मणी सुढाळ, तेवीं गुल्फद्वय वर्तुळ,
जानु जघन सुकुमार सरळ, स्तंभ गरुड पाचूचे. २४
मुक्तपालवी मनोहर, परिधान करविला पीतांबर,
दुजा वैरणियाचा सुंदर, कनकवर्णी विराजे. २५
देखूनि अमृतघनसांवळा, उभय विद्युल्लतेचा मेळा,
त्यागोनि चंचलतेची लीला, निश्चल ठेला हरिरूपीं. २६
मेखलेचे माणिकमणी, पंक्तिभोजना बैसले तरणी,
मध्यान्हा येत ऊर्ध्वकिरणीं, तुळोनि पाहे कौस्तुभा. २७
स्थूळ नितंब मध्यासना, देखोनि वैराग्यपंचानना,
लाजोनि दुर्गेचिया वाहना, देह दुःखें दीधला. २८
कौस्तुभ सूर्याची नंदिनी, यमुना त्रिवली कृष्णवर्णी,
उर्ध्वपंथीं हृदयभुवनीं, भेटों आली दिसताहे. २९
हृदयीं धरोनियां मान, तथापि न सोडावे चरण,
या लागीं आपादकंठलग्न, वैजयंती विराजे. ३०
श्रुतिसागरीं रत्नजोती, कुंडलें तळपती मकराकृती,
नाना कविगुरु निरोपिती, विनंती सुरासुरांच्या. ३१
वदनचंद्राशीं सख्य परम, करावया कस्तुरीरूपें तम,
मळवट झाला अति उत्तम, पुरुषोत्तम निजभाळीं. ३२

अंधकार चंद्रमा तरणी, मेळा अपूर्व एकस्थानीं,
मुकुटकुंडलें व्यजनें दोन्हीं, वदनचंद्रीं कवळिले. ३३
अधरबिंब हिरेदशन, शुकनासिक विशाळ नयन,
वदन सर्वानंदवर्धन, कोटिमदन सांडणें. ३४
बाहुवटे कीर्तिवदनें, जेथें फांकती प्रकाशकिरणें,
करमुद्रिका करकंकणें, अभयदानें झळकती. ३५
यमुनाजळावरी जान्हवीजळ, धांवे जैसें शुद्ध धवळ,
कीं नीळ गगनावरी सोज्वळ, पसरे निर्मळ चांदणें. ३६
तैसी पातळ चंदनउटी, तेणें शोभला कृष्णजगजेठी,
जवादी भरूनि पर्णपुटीं, सुगंध चूर्ण उधळिलें. ३७
दीप कर्पूर नीरांजनें, फल तांबूल शुद्ध सुमनें,
सर्वभावें कुरुनंदनें, सर्वेश्वर पूजिला. ३८
उभयनेत्रीं भरूनि रूप, हृदयमांदिरीं रत्नदीप,
निश्चय निर्वात निष्कंप, अखंडित ठेविला. ३९
काया वाचा मन धना, इंद्रियवृत्ती सांडोनि जाणा,
पुष्पांजली कृष्णचरणा, धर्मराजें अर्पिल्या. ४०
अर्पूनि सोळाही उपचार, घातला दंडप्राय नमस्कार,
मुखें करूनि जयजयकार, कृतकृत्यता मानिली. ४१

महाभारत—सभापर्व, अध्याय १०.

---

# दुर्योधन व अश्वत्थामा यांची शेवटची भेट.

## आर्या.

नेत्र पुसुनि सर्वांतें भूप ह्मणे, " शोक काय हो याचा ?
मर्त्याचा केव्हां तरि भस्मचि विपदोक काय होयाचा. १
तरि होता घात, जरी व्यसनीं सांभाळितों न टेंकेला,
मानी हांसुनि ह्मणते मज, ' वीराभिनय या नटें केला! ' २
पडला शात्रवशस्त्रें समरांत स्यमंतपंचकीं काय,
कां करितां शोक? उगे; पडलों रोगार्त मंचकीं काय? ३
पावे अनंतसुकृतें क्षत्रिय समरांत काय हानि बरा,
होइल वांचोनि सुचिर रुचिरगृहीं लाभ काय हा निबरा? ४
उरलें तेज, अधर्मे वधिला धार्मिक परें, बरें झालें;
आलें मनास माझ्या तीक्ष्णहि परि पथ्य हें जसें आलें. ५
मेलों, बहु भाग्याचा मी निहतज्ञातिबांधव स्पष्ट;
उरतों शोकें झुरतों स्वजनवियोगा असें नसे कष्ट. ६
धर्मभ्रष्ट न झालों, हा कृष्णाचा प्रभाव, न दुज्याचा,
पूर्वज वसिष्ठनामा सन्महित यशा तसाचि यदु ज्याचा. ७
उरलां प्रळयांत तिघे झालें प्रिय परम आजि हें माजें,
द्यावा अशक्य सदमृतरसपाना मेरुतुल्य हेमा जें. ८
न करावा शोक तुह्मीं अवलोकुनि हे अशी दशा माजी;
वेद प्रमाण जरि तरि म्यां अक्षय लोक जिंकिले आजी." ९
ऐसी वदोनि वाणी आणी पाणी नृपाल नयनांत,
लोळे रजांत निजतो मृदुलपयःफेनशुभ्रशयनांत! १०

द्रौणि बहु रडोनि ह्मणे, " मज लोकांला न दाखवें वदन;
दे आज्ञा या सकळां पांचाळांचें करावया कदन. ११
वधिला करुनि कपट गुरुवर्य त्रैलोक्यमान्य अधमांनीं,
ऋजुयोधी तूंहि प्रभु झालासि तसाचि लब्धवध मानी. १२
धर्में वधिते तरि मज न तुझ्या बहु शोक बाणता पातें;
देता शिरोनि हृदयीं न असा विषदिग्ध बाण तापातें. १३
न तसा स्वताताघातें झालों मी तप्त जेविं तव घातें;
शिशुसख्य आमुचें जें जाणे क्षितिवरिल लोक अवघा तें. १४
कृष्णसमक्ष परांतें प्रेषीन प्रेतराजभवना मीं;
अरिबळलय मच्छस्त्रीं, अघलयसामर्थ्य जेविं भवनामीं. १५
आहेसि योग्य आज्ञा द्याया, ऋण आजि सर्व वारीन;
त्या तातघातकातें मी सर्व उपाय करुनि मारीन. " १६
गुरुपुत्रपणश्रवणें बहुताचि तो मानिवर्य सुख पावे;
आलें मनास; कोण व्यसनीं न ह्मणेल? 'अर्यसु खपावे.' १७

महाभारत—गदापर्व

---

## सत्यभामेचा रुसवा.

### श्लोक.

'कृष्णासि कृष्णपदभक्तिविशार
में स्वर्गपुष्प दिधलें मुनिनार

तें रुक्मिणीप्रति दिलें त्रिजगन्निवासें,
जें द्वारका करि भरोनि सुगंधि वासें. १
अशी गोष्ट दासीजनीं बायकांनीं
विचारूनियां, सांगता जाय कानीं;
तईं सत्यभामा महाक्रोध दावी,
बुझावी हरी, तोचि लीला वदावी. २
गडबडां धरणीवरि लोळते, वदवती न कवीसहि लोळ ते;
रडत मूर्च्छित होय घडी घडी, पवन निश्चळ, नेत्र न उघडी. ३
रडत रडत मूर्च्छेमाजि वृत्ती बुडाल्या,
परम विकल, मी तूं या स्मृतीही उडाल्या;
उचलुनि सखियांही मंचकीं दिव्यसेजे
निजविलि मृततुल्या सत्यभामा दिसे जे. ४
ये अशांत सदनांत हरी तो, जो अनादि भक्तशोक हरीतो;
किंकरी नमुनियां चरणातें, सांगती सकळ आचरणातें. ५
ह्मणे, 'शोक कां प्राप्त झाला महा हा,
अशी कष्टली कां शुभांगी अहाहा!
न बोलेचि कां आमुशीं आज राणी,
जिच्या बोलण्याचीच आह्मां शिराणी!' ६
जयीं श्रीवत्सांक प्रभु करि निजांकस्थित शिरा,
शिरा, नाडी, प्राण प्रकटवि न लावूनि उशिरा;
शिराणी शब्दाची पुरवि, तरि डोळे न उघडी,
घडी जों मानाची बिघडलि असे तोंवरि घडी. ७

वदे भामा, कोपें अतिविकल चावूनि अधरा,
" धरापृष्ठीं नाहीं ठक तुजअसा, अंबुजधरा;
धरावें या अंकीं शिर अजि तिचें पक्षिगमना,
मना आलें देणें कुसुम जिस तें, कंसदमना ! " ८
जों नेत्र मोडुनि वदे, ढकलूनि मांडी,
भ्रूमंडळीं भ्रमण, अंगुलिभंग मांडी,
तों कृष्णजी करुनि हास्य ह्मणे, " अहाहा !
वेडे! अनर्थ इतुक्यास्तव कां महा हा ? ९
अर्पितां मुनिवरें सुमनातें, वाटलें प्रथम हेंचि मनातें,
कीं, ' असा तरु पुरींत असावा, त्यांतही स्वसदनींच वसावा.
फूल देउनि तिला उतराई, होइं मी, समज हे चतुराई;
देतसें तरुचि तो तुजला गे! खेद हा न करणें तुज लागे. १०
तुतें वृक्ष देणेंचि, यालागिं आधीं
फुलें नाशिला जो तिला होय आधी;
न जाणोनि केले तुवां कष्ट भारी,"
समाधान ऐसें करी कैटभारी. ११

भामाविलास.

---

## पत्नीविरह.

### श्लोक.

अहा ! कैसा झाला अवचित विधी निष्ठुर असा !
प्रिया एकाएकीं अमरसदना गेलि सरसा !

मना आतां कोणा कथिशिल जिवींच्या हितगुजा ?
सुखाच्या शब्दांनीं कवण निववू तापहि तुझा? १
घरातें मी येतां दचकुनि उठोनी हंसुनियां,
विशालां नेत्रांहीं अमृतरसवृष्टी करुनियां,
न कां चित्ता आजी मधुरवचनीं हर्ष करिशी ?
असे झाली माझ्या अगाळिक करें कोणति अशी ? २
बुजालें दुःखानें स्मरण विषयांचें अवघिया,
अनभ्यासें गेली मज सकल विद्या त्यजुनियां;
जिचे डोळे काळे बघुनि मृगबाळेंहि झुरती,
वसे चित्तीं देवीपरि सतत ती मात्र सुदती! ३
पडायाच्या भीतीस्तव मम करातें धरुनियां,
विवाहीं पाषाणीं चढलिस, सखे! तूं जपुनियां,
कशी ती तूं आजी चढशि मज सोडोनि गगनीं,
करी ऐशी शंका हृदय शतधा येउनि मनीं. ४
तुझें जाणें, प्राणेश्वरि! परिसुनि स्वर्गभुवनीं,
अलाफातें शंका त्यजुनि करिती कोकिल वनीं,
निमाली चिंताही सकल कमलांची अजि अहा!
कशी आतां चंद्रा अतुलसुषमा लाधलि, पहा! ५
सखे, विद्युल्लेखास्फुरणचपलां देउनि मला,
सुरेंद्राच्या कांहीं दिवस उपभोगांस अतुलां,
अहा! मंत्रभ्रष्टक्षितिपतिस लक्ष्मी त्यजि जशी
लया पुण्यें जातां, त्यजुनि तशि गेलीस मजशी! ६

असोनी ज्या भूमीवर चढविलें त्वां सुरपदीं
 'प्रिया, नाथा,' ऐशा अतिमधुर संबोधनपदीं,
तया मातें कैशी धरणितलधूळींत, सखये!
 दिवस्था होऊनी ढकलिशि! दया कां तुज न ये? ७
गुणांनीं जी पूर्णा, अणुसम नसे दोषहि जिला,
 अलंकारीं साजे, रस वसतसे जींत पहिला,
मृदू जीचे वर्ण श्रवणसुख देती परिसतां,
 वसे ती पद्माक्षी मम हृदयिं जेवीं सुकविता. ८
सुधातुल्यें हास्यें करुनि अभिषेकास मजला,
 कटाक्षांनीं वर्षे जणु मजवरी नीलकमळां!
मृगाक्षी मांगल्यप्रदविधिविधात्री सुवदना
 न सोडी चित्तातें, क्षणभरिहि ती कुंदरदना! ९

पद्यरत्नावली.

---

## कुबडीतीर्थ.

### श्लोक.

घेऊन एकदिवशीं शिवभूपतीस
 गेले वनांत फिरण्या गुरु रामदास;
जायास सांगुनि समस्त जनांस मागें
 ते चालले हळुहळू विपिनांत दोघे. १

होती तदा किति तरी रमणीय वेला,
तेजोनिधी दिनमणी गगनीं उदेला,
नानापरी विकसलीं कुसुमें सुरेख,
यद्रूप पाहुनि वरी मन फार तोख. २
पुष्पांतला मधुर सेवुनि गंध सारा,
होता वहात गगनीं बहु मंद वारा,
वृक्षावरी बसुनि पक्षि समस्त होते
रम्यस्वनें करित मंजुल गायनातें. ३
चाले प्रभातसमयीं गुरुशिष्यजोडी,
ओढे नद्या गहन लंघित खोल खिंडी,
होत्या जरी उपलकंटकयुक्त वाटा
त्यांच्या परंतु चरणीं रुतला न कांटा. ४
मार्गीं शिवास शिकवी गुरु राजनीति,
नाना कथा कथुनि दाखवुनी प्रतीति,
ऐकूनि शब्द गुरुचे बहु दिव्य गोड,
चित्तामधें नृपतिच्या पडला उजेड. ५
हर्षोदधींत शिवभूपति मग्न झाला,
केला प्रवास किति तो कळलें न त्याला,
मार्ग क्रमीत असतां भरली दुपार,
चालून फार थकला नृपती अखेर. ६
संताप दे वरुन दारुण अंशुमाली,
धूलीमुळें चरण पोळति फार खालीं,

लागे तहान नुरलें बल चालण्याचें,
क्कोमेजलें वदनपंकज भूपतीचें. ७
थांबा ह्मणून वदवे गुरुतें न त्याला,
होता सुशिष्य गुरुमागुनि चाललेला.
कैसा तरी हळुहळू उचली पदातें,
तों पाहिलें वळुनियां गुरुनें तयातें. ८
' कां रे हळू उचलसी शिवबा! पदातें?
गेलास काय दमुनी? तुज काय होतें? '
ऐसें पुसे सदय सद्गुरु त्या शिवाला,
देई परी न नृप उत्तर तें तयाला. ९
ज्याचीं पदें स्मरुनि किंकर मुक्त झाले,
ज्यावांचुनी नच चराचर विश्व चाले,
त्या जाणिलें गुरुवरें नृपतिस्थितीतें,
बोले सगद्गद ह्मणूनि गुरू शिवातें. १०
" वत्सा! मनीं तिळभरी नच खेद मानीं,
देतों तुला त्वरित सुंदर गोड पाणी. "
ऐसें वदूनि अपुला उचलून पाणी,
भूमीवरी शिवगुरू कुबडीस हाणी. ११
तों वर्तलें नवल, भूमि दुभंग होई,
आंतूनि निर्झर मनोहर एक येई!

आकंठ तज्जल पिऊनि नृपाल धाला,
चित्तीं स्मरे गुरुचिया विमलां पदांला. १२

काव्यरत्नावली.

---

## केवढें क्रौर्य हें!

**श्लोक.**

क्षणोक्षणिं पडे उठे परि बळें उडे बापडी,
चुके पथहि येउनी स्तिमितदृष्टिला झांपडी;
किती घळघळां गळे रुधिर कोमलांगांतुनी,
तशीच निजकोटरा परत पातली पक्षिणी. १
ह्मणे निजशिशूंप्रती "अधिक बोलवेना मला,
तुह्मांस अजि अंतिचा कवळ एक मीं आणिला.
करा मधुर हा! चला! भरवितें तुह्मां एकदां,
करो जतन ह्यापुढें प्रभु पिता अनाथां सदा! २
अहा! मधुर गाउनी रमविलें सकाळीं जनां,
कृतघ्न मज मारितील नच ही मनीं कल्पना;
तुह्मांस्तव मुखीं सुखें धरुन घास झाडावरी
क्षणैक बसलें न तों शिरत बाण माझ्या उरीं! ३
निवून नरजातिला रमविण्यांत गेलें वय
ह्मणून वधिलें मला! किति दया! कसा हा नय!

उदार बहु शूर हा नर खरोखरी जाहला,
वधून मज पांखरा निरपराध कीं दुबळा ! ४
ह्मणाल, ' भुलली जगा, विसरली प्रियां लेंकरां, '
ह्मणून अतिसंकटें उडत पातलें मी घरा.
नसे लवहि उष्णता नच कुशींत माझ्या शिरा,
स्मरस मजबरोबरी परि दयाघना ईश्वरा." ५
असो; रुधिर वाहुनी नच भिजो सुशय्या तरी,
ह्मणून तरुच्या तळीं निजलि ती द्विजा भूवरी.
जिवंत बहु बोलकें किति सुरम्य तें उत्पल,
नरें धरुन नाशिलें खचित धन्य बुद्धीबळ ! ६
मातींत ते पसरिले अतिरम्य पंख,
केलें वरी उदर पांडुर निष्कलंक.
चंचू तशीच उघडी पद लांबवीलें,
निष्प्राण देह पडला श्रमही निमाले ! ७

काव्यरत्नावली.

---

## भीष्माचार्यांचा धर्मराजास उपदेश.

### आर्या

भारतयुद्धीं वधिले गुरु बंधु स्वजन मित्र शूर हित,
केली भुवनख्यात प्रिय नृपवृंदें करूनि भू राहित. १

यास्तव मन धर्माचें पावे शोकेंकरूनि कष्ट महा;
सांगे भागवताचा अध्याय स्पष्ट अर्थ अष्टम हा. १
व्यासादिक गुरु सांगति शोकशमन सदितिहास रायास;
तरि मोह घणमणीना, कीं दे गुरुवराचि आसरा यास. २
व्यासादिक जे बोधिति धर्माला, त्यांत देवहि तसाच
बोधी; जें जें बोले, तें तें सर्वांसि मान्य हित साच. ४
परि धर्माच्या चित्तीं अविवेक जगद्धितार्थ वाढविला.
आपण न काढिला, मुनिबोधाहातींहि तो न काढविला. ५
भगवदभिप्राय असा कीं, झाला तप्त दुःसहें ग्रीष्में
तो, जेविं मयूर घनें, बोधावा धर्म सज्जनें भीष्में. ६
कुरुगुरु कवि रवितेजा संप्रति करणार देहसंन्यास;
धन्यास त्यास द्यावें हें यश; देवूं नयेचि अन्यास. ७
ऐसा प्रभुसंकल्पें प्रौढहि नृप तो, जसा शिशु भ्रमला
‘प्रसवोनि, मलिन झाला वंश,’ म्हणे, ‘दुग्धराशिशुभ्र मला.’ ८
ऐसा भ्याला लोकद्रोहाला, आठवूनि कृतकर्म,
धर्मनृपाळ विनशना गेला, भीष्मा पुसावया धर्म. ९
गेले हयरत्नावरि बैसोनि वृकोदरादिक भ्राते,
भेटाया श्रीभीष्मा जैसे चातक मयूर अभ्रातें. १०
नरनारायण दोघे बसले एके रथीं सखे, दमन
करुनि खळांचें, केलें मुदित जिहीं भूमिचें सखेद मन. ११
भासे भीष्म महात्मा भूमिवरि स्वर्गविच्युतामरसा.
वेष्टिति जन ते त्यातें, तृषित मधुव्रत जसे सुतामरसा. १२

पांडव पितामहातें वंदिति, घेऊनि आपुलें नाम;
विनयें तसेंच वंदी, बंदी ज्याचे शिवादि तें धाम. १३
देवर्षि, ब्रह्मर्षी, राजर्षी तेथ तेधवां आले;
त्या भरतनायकातें देखाया सर्व एकवट झाले. १४
जे हे आले त्यांतें पूजी धर्मज्ञ तो स्वदृक्कमळें,
तर्पी कुशलप्रश्नें, स्वागत शब्दामृतेंहि अत्यमळें. १५
भीष्म ह्मणे, "पुत्रक हो! परिसा मद्वाक्य पांडुनंदन हो!
कां म्लानवदन झालां? जो होता तो विवेक मंद न हो. १६
जें हें झालें, याच्या तापें निजजीवितीं तुह्मीं विटलां;
निर्मळ विवेकमानसहंस कसे शोककर्दमें किटलां? १७
यावरि वांचावें हें योग्य नव्हे आपणांसि लोकांत,
ऐसें मनांत आणुनि, सुत हो! झालां निमग्न शोकांत? १८
भूदेव, धर्म, अच्युत, हे कीं आश्रय तुह्मांसि आहेत,
या चिंतारत्ना जो पूर्ण नव्हे, कोण तो वदा हेत? १९
असतां आश्रय ऐसा, ऐसी जन कोण काळजी वाहे?
नसतां आश्रय ऐसा, प्रबळाही होय काळ जीवा हे. २०
तुमचें अप्रिय झालें मागें; आतांहि सर्व जें कांहीं,
तें काळकृत असें मी ह्मणतों; हें सत्य, अन्यथा नाहीं. २१
तस्मात् सुखदुःखादिक हें सर्वहि होय ईश्वराधीन,
जाणुनि असा करावा निश्चय कीं तत्प्रसाद स्वाधीन. २२

व्हावें अनुवर्ती या प्रभुचें, याचि प्रभूत्तमा गावें,
'स्वामी! प्रभुजी! पाळा प्रजा अनाथा,' असेंचि मागावें" २३

भीष्मभक्तिभाग्य.

---

## पतिविलाप.

### श्लोक.

प्रसन्न उदयाचलीं अरुण चंद्रमा येतसे,
सुरम्य रजनीमुखा अरुण राग तो देतसे;
सखे प्रियतमे तुझ्या हृदयमंदिरा सोडुनी,
जगीं प्रणयगोल हा उदय पावला रुक्मिणि! १

सुनीलगगनोदरीं चमकताति या तारका,
न होय पतिदर्शनें नववधूसि आनंद कां?
पडे धवल शीतसें तरुततींतुनी चांदणें,
तरंग, कवि, हे तुझ्या विमल मानसाचे ह्मणे! २

गुलाब फुलले पहा, वनलता लवूं लागल्या,
सुगंधसुखदायिनी कुमुदिनी वनीं शोभल्या;
सुधांशु कुसुमांवरी अमृतबिंदु सोडी करें,
वनस्थल करी जणों धवल, दुग्धधाराभरें! ३

असा धवल चंद्रमा सुखद जाहला चक्षुंला,
तुझ्या सुविमला यशा परम मित्र हा शोभला;

गभीरगुरुघोष ये दुरुनि नर्मदेचा, तया
मृदंगरव हा मिळे, श्रवणयुग्म तर्पावया. ४
उडे गगनमंडलीं मदनसारिका स्वैरिणी,
सुमंजुरव दे जिव्हा सुखाचि कर्णरंध्रां झणीं;
प्रसन्न मन हें सखे क्षणभरी अहा! जाहलें,
कळे न मज, दुःख कीं अहह! यापुढें वाढिलें! ५
सुरम्यमुखपंकजावरि अहा! दिसे म्लानता;
जरा न करही चळे, चलनहीन ही भ्रूलता,
गमे हृदय शून्यसें जणु समाधि लागे अहा!
कळे न मज, नीज कीं तुजसि येइ मूर्च्छा महा! ६
सुनील कचभार हा विखुरला न ऐसा प्रिये!
कधींहि नच मौन हें! नच असा कधीं रोष ये!
सुहास्यमुख, सर्वदा विनय, लोभही अंतरीं,
सुधेपरिस गोड ती हृदय रंजवी वैखरी! ७
तुझ्यां प्रणयदृष्टिचा सतत लोभ लागे जया,
न कां स्मितमुखें सखे! बघसि आज तूं त्या प्रिया?
सखे! मृदुल देह हा परम सौख्य देता मला,
पळांत अगदींच कीं अहह! गार हा जाहला! ८
जिथें सुख, तिथेंचि द विकलता तुझा स्पर्श हा,
मला भ्रमाचि जाहला प्रणयबंधनानें पहा!
जडत्व सकलेंद्रियांवरि वरानने! येतसे,
सुके सुखझरी जरी तरि मला कळेना कसें? ९

न लेश उरली अहा ! अरुणता कपोलांवरी,
सुकोनि अगदीं दिसे तनुलता तुझी पांढरी;
रुसोनि जणुं बैसलीं सकल आजि गात्रें पहा !
गमे भ्रमचि कीं, जडे प्रखर भूतबाधा महा ! १०

शोकावर्त.

---

## अनसूयेचा थोरपणा.

### आर्या.

'देउनि उभय मुनीतें, आशीर्वादप्रसाद जोडून,
अत्र्याश्रमासि गेले स्वामी तो चित्रकूट सोडून. १
जैसे वसिष्ठ, गाधिज, जेविं भरद्वाज गुरु, तसे अत्री
नमिले शमिलेखर्षभ, जे सुधवळ मानसीं जसे पत्री. २
जेविं भरद्वाज तसे द्रवले पाहोनि तेहि मामाजी;
झाले अतितर सुखकर, कर जैसे भानुचे हिमामाजी. ३
तद्भार्या अनसूया मजवरि करि साधु मायसी माया,
स्वकरेंचि अळंकारी, आहे प्रेमासि काय सीमा या ? ४

### श्लोक.

वेणी घालुनि, लोचनीं निजकरें ती लेववी कज्जळ,
लावी चंदन सुव्रता, मज गमे गंगाचि, तें तज्जळ;

गुंफी सत्कुसुमें शिरीं, सुरुचिरा माळा गळां अर्पुनी,
प्रेमें धर्म कथी सुधाधिकरसें सूक्तें मला तर्पुनी. ५

**आर्या.**

तैसाचि मल्ललाटीं साध्वी सिंदूरतिलक जो लावी,
तोहि अगतसार सदा, कैसी तत्सुकृतसिद्धि बोलावी? ६

**श्लोक.**

तो अंगराग चिरकाल तसाचि ओला,
यत्सौरभीं भ्रमरपंक्ति सदैव लोला;
घ्राणेक्षणांसि ह्मणती कुसुमेंहि डोला,
वेणी नवीच, न सतीयश शक्य बोला ! ७

**आर्या.**

उष्णा उटी हिमीं ती उष्णींही सर्वकाळ परम हिमा;
वृष्टि न मदतिक्रम करि, साध्वीचा न वदवेचि पर महिमा !८

**श्लोक.**

वत्से मांडवि! मद्विवाहचरित प्रेमें पुसे ती सती,
सांगावी मज लागली निजमुखें सर्वा कथा तीस तीं;
आशीर्वाद बहु प्रसन्नहृदया दे, मायसी लोभवी,
त्या आर्येसि, तसेंचि हीसहि महावात्सल्य हें शोभवी!' ९

सीतारामायण.

## स्तुतिकुसुमांजलि.

### श्लोक.

क्षणहि तुमची देवा! सेवा नसे घडली मला,
मलिन बहु मी झालों, ल्यालों अघांबुधिच्या मला;
परि न नरकीं रंका टाका, सदा ममता धरा,
शरण नर जो आला त्याला तुह्मी प्रभु! उद्धरा. १
भजें मी विश्वेशा! बहुत अपराधी जरि खरा,
नुपेक्षावें मातें पदनत अनाथा प्रभुवरा!
नद्या, ओढे, नाले मिळति समभावें जलधिला,
असाधू वा साधू शरण रिघतां पावति तुला. २
भवाब्धिपतिता मला प्रभु! तुझी कृपानाव दे,
दुजा सदय कोण कीं मज न भी! असें जो वदे;
असें जड अनाथ मी, तरि सहाय हो तूं मला;
कसा द्रव नये तुला प्रभु! दयानिधे! कोमला? ३
स्वामी आहें व्यथित बहु मी शीघ्र पीडा हरावी,
आश्वासावें प्रभु मज असें कीं न भीती धरावी;
आहें पापी बहुत जरि मी कींव माझी करावी,
त्वत्प्रीती बा प्रभु! नच कधीं दीनबंधो! सरावी. ४
नाना जीव, वनस्पती, जड तसे निर्मून लक्षावधी
स्वेच्छेनें जग हें विचित्र सजवी, तीनेंच याला वधी,
जो कोणी असला समर्थ भगवान् त्या मी नमीं मंदधी,
सर्वाधार दयाळु आठविल तो संसारदुःखोदधी. ५

नेणें बा विश्वकर्त्या! तव गुण अथवा नामरूपादि कांहीं,
नेणें मी कोण, कोठें, जग उदित कसें, स्वामि! हें गूढ कांहीं;
नेणें कर्तव्यकर्मा, ह्मणुन विनवितों भ्रांति माझी हरावी,
अज्ञानें मी दयाळा! किति जरि चुकलों तत्क्षमा त्वां करावी. ६

**दिंडी.**

कुठें वाणी ही मूढ सेवकाची,
कुठें कीर्ती ती विश्वपालकाची!
कुठें चंचू ही अल्प पांखराची,
कुठें थोरी ती अतुल सागराची? ७
काय वर्णूं मी स्वामिच्या यशाला !
काय सूर्याला उजळिती मशाला!
काय तूलानें जोखिजे नगाला!
काय वस्त्रानें झांकिजे जगाला! ८
तुला वंदीं मी दास देवराया!
नसे बुद्धी बा! त्वत्स्तुती कराया;
असें पापी मी दीन, ये सहाया,
शक्ति नाहीं बा दुःख हें सहाया! ९
तुझे पायीं दे ठाव पामराला,
पुन्हां पाहूं दे मूळच्या घराला;
होय दिंडी हें मधुर पद्य याला,
प्रभो! अर्पीं मी सेवकप्रियाला. १०

रत्नमाला.

# नलराजवर्णन.

## दिंडी.

चौगुणीनें जरि पूर्ण शीतभानू,
नळा ऐसा तरि कळानिधी वानूं;
प्रतापाचा जो न मावळे भानू,
तया सारीखा दुजा कोण मानूं ? १

## श्लोक.

चंद्रासि लागति कळा, उपराग येतो,
गंगेसि भंग, बहु पाणउतार होतो;
जें चूर्ण होय तरि मौक्तिक तें कशाला ?
नाहीं समान नळराजमहायशाला. २

वाजीचें मन जाणता, सकळही राजी शिपाई जया,
याजी होउनियां द्विजांसि ह्मणतो, 'या जी ! धनें घ्यावया!'
त्याजी जो धनदापरी, सुकृत जें त्या जीव ऐसें गणी,
गाजी तो नळ भूप, रूप धरुनी गा जी! गुणींच्या गणीं. ३

## दिंडी.

लोकबंधू जो होय रवी ऐसा,
कुवलयाला जो सुखद चंद्र जैसा;
सांग नोहे तो कुसुमचाप तैसा,
निषधरायाशीं तुल्यरूप कैसा ? ४

श्लोक.

कदा नेणों वोढी, शरधितुनि काढी शर कदा,
कदा धन्वीं जोडी, वरि वरिहि सोडी तरि कदा;
विपक्षाच्या वक्षावरि विवरलक्षास्तव रणीं,
कळे राजेंद्राची त्वरित शरसंधानकरणी. ५
झाले धनी पुढिल याचक या नळाचे,
येतां फिरोनि समुदाय पथीं तयांचे;
मागावयास जन मागिल देखियेले,
त्यांहींच ते सकळ पूरितकाम केले! ६

नलोपाख्यान.

---

## देवाचें स्तोत्र.

श्लोक.

अशेषजगदुद्भवस्थितिलयाचिया हेतुला,
असो नमन सर्वदा भव शमावया हें तुला.
सदा करिति माधवा! तव पदाब्जभक्तीस जे,
तयांस वरण्यास ती करुनि हार मुक्तीस जे. १
चतुर्विध पुमर्थही तव पदांबुजीं वागती,
भवें परम तापल्या तव पदांबु जीवा गती.
तुला भजति त्यांचिया पुरविशी वरा कामना,
गमे मग तयांचिया सुरभिही वराका मना. २

तुझी परम शोभते त्रिभुवनीं यशोभारती,
गमे मज तिच्यापुढें विगतकायशोभा रती;
ह्मणूनि तुझिया यशा विबुध गाति कुंदाऽमला,
कृतार्थ करिं उद्धरीं झडकरी मुकुंदा मला. ३
तुझ्या मनुज चिंतनें तरु जसा वसंताऽगमें,
सतेज दिसतो विभो ! ह्मणुनि तोच संता गमे.
जसा असासि तूं प्रभो ! सतत भक्तवृंदाऽवनीं,
तसा न रविनंदिनीपुलिनिं सक्त वृंदावनीं. ४
तुला असुर पाहतां बहु गदाधरा कांपती,
स्वदासकुमुदांस तू गमसि नित्य राकापती.
तुवां पतित तारिले जन अनेक राधावरें,
बुडे भवजलांत हा करि विभो ! त्वरा धांव रे. ५
मला नवल वाटतें, मम तनू गदें वांकली,
तथापि मम मानसा करि सराग देवा ! कली !
कधीं त्रिविध ताप हा मम असह्य देवा ! सरे ?
कृपा करुनि आपुल्या मज पदाब्जिं दे वास रे. ६

अर्वाचीनकविता.

## भाग पहिला समाप्त.

# परिशिष्ट.

पृष्ठ. १ पद्य. १ श्रीशंकरभगवत्पद–परमपूज्य श्रीशंकराचार्य. शब्दगुणीं–शब्दरूपी दोऱ्यांत. प ३. सुधाधारा–अमृताची धारा. खळराहुलाचि न जिरे–दुष्टजनरूप राहूला मात्र पचत नाहीं. मोहिनीरूप धारण करून विष्णूनें दानवांपासून अमृत आणून देवांस प्राशनास दिलें. तेव्हां राहूनें देवरूप धारण करून अमृतपान केलें. तें त्याच्या कंठगत होत आहे इतक्यांत विष्णूनें आपल्या चक्रानें त्याचें शिर छेदिलें. असा अमृताच्या योगें राहूचा नाश झाला. या गोष्टीकडे येथें लक्ष आहे. बुधाधार–ज्ञान्यांचा आश्रय. प ४. प्रणतिपूर्व–नमस्कारपूर्वक. अतितूर्ण-फार लवकर. प.६. सदोद्युक्त--सदा उद्युक्त, नेहमीं तयार. पृ० २ प.७. पाथेय–शिदोरी. पथ्य–हितकारक. तथ्य–सत्य. प.८. शिष्याज्ञानतमोऽर्क–शिष्य+अज्ञान+तमस्+अर्क–शिष्याचें अज्ञान हाच अंधकार त्याचा नाश करणारा सूर्य. शुचि–शुद्ध. प. ९ छात्र–शिष्य. प. १० हालाहल–भयंकर विष, गरळ, विष. प. ११. तस्कर–चोर. दस्यु–चोर. भयाची वल्ली–जन्ममरणादि दुःखरूप फल प्रसवणारी वेल. प. १४ कर्णांजलिंनीं–कान ह्याच ओंजळी, त्यांनीं. सुधेसारें–अमृतासारखें. पीयूष–अमृत. सारें–महत्वाचीं. प. १६ संशयाब्धिसेतु–संशयरूपी समुद्र ओलांडून जाण्याला समर्थ करणारा पूल. याञ्चा–याचना, प्रार्थना. प. १७ सदरविंदा–उत्तम कमला. पृ. ३ प. १८ शारदशशी–शरदृतूंतील चंद्र. त्रिताप–आधिदैविक, आध्यात्मिक व आधिभौतिक हे तीन ताप. उदाहरणें:—वीज अंगावर पडणें हा आधिदैविक; रोग शरीरीं होणें हा आध्यात्मिक; व पाण्यांत बुडणें हा आधिभौतिक ताप. परिचर्या–सेवा. प. १९ निरय–नरक. प. २१ शील–उत्तम वर्तन. प. २२ मंडन–भूषण. मुदित–आनंदित. प. २४ बधिर–बहिरा. प. २५ निवृत्ति–सुख. निधन–मरण. प. २६ शल्य–बाणाग्रसम दुःखप्रद. पृ. ४–प. २९ धाया–तृप्त होण्याकरितां दृष्टार्थ–ऐहिक धनधान्यादिक अर्थ. अदृष्टार्थ–पारलौकिक अर्थ, अर्थात् मोक्ष, मुक्ति.

प. ३० घूक—घुबड. सविता—सूर्य. अन्योक्ति—ज्या विषयीं किंवा ज्यास बोलावयाचें त्यापेक्षां निराळ्याविषयीं किंवा निराळ्यास बोलणें. कलाप—समुच्चय. प. १ धृति—धैर्य. मुक्ताफळ—मोतीं. वृत्त—स्रग्धरा. प. २ लोकांतरातें गेला—दुसऱ्या भुवनांत गेला; मेला. हिमकिरण—चंद्र. खद्योत—काजवा. वृत्त—स्रग्धरा. प. ३ कोक—या नांवाचे पक्षी आहेत. त्यांसच चक्रवाक ह्मणतात. हीं पाखरें नद्या, तळीं इत्यादि जलाश्रयांच्या आश्रयानें असतात, व त्यांत नरमादींचें फार प्रेम असल्यानें हे पक्षी जोड्यानें बहुतकरून फिरतात. या पक्ष्यांविषयीं प्राचीन कवींची समजूत अशी आहे कीं, संध्याकाळीं नरमादींची फुटाफूट होऊन एक एक तीरास व दुसरें दुसऱ्या तीरास अडकून सर्व रात्र तीं वियोगानें दुःख पावत असतात, व सूर्योदय झाला ह्मणजे पुनःत्यांची भेट होते. दयिता—आवडती स्त्री. कारागारें—कमळें संध्याकाळीं मिटलीं असतां त्यांत भुंगे अडकून सकाळपर्यंत तसेच कोंडून राहतात, या प्रसिद्धीवरून कमलांस येथें कारागारें ह्मणजे तुरुंग कल्पिलीं आहेत. या पद्यांत कर, मित्र व उदय या शब्दांवर श्लेष आहे. वृ. स्र.पृ.५ प.४ अंबरीं—आकाशांत. चंडांशु—सूर्य. तारकाधिपति—चंद्र. वृत्त—शार्दूलविक्रीडित. प. ५ ओषधींचा पति—वनस्पतींचा राजा. विधु—चंद्र. वृ. शा. वि. प. ६ परिमलबहल—सुगंधानें पूर्ण. हें आम्रवृक्षाचें विशेषण. अंगना—स्त्री. वृ. स्र. प. ७ खंड—तुकडा. खरतर नखरीं—तीव्र नखांनीं. वृ. स्र. प. ८ जलधर—मेघ. वृ. शा. वि. प. ९ थरकति—हालतात. अरविंदें—कमलें. सुगंधी—रजाचें विशेषण. पृ. ६ प. ९ मृणाल—कमळाच्या देठांतले तंतु. प. १० मानस—सरोवराचें नांव. मरुजनपद—मारवाड देश. कूपवारी—विहिरीचें पाणी. प. ९ व १० वृत्त मालिनी. प. ११—वर्षर्तु—वर्षा+ऋतु—पावसाळा. हंसांस पावसाळा आवडत नाहीं. त्या दिवसांत ते उत्तर दिशेस मानस सरोवराकडे जातात. अशी प्रसिद्धि आहे. साहीं—सहन कर. शारदश्री—शरदृतूची शोभा. शरदृतूंत ह्मणजे आश्विनकार्तिकाच्या महिन्यांत हंस परत येतात. वृंद—समुदाय. वृ. स्र. प. १२ खंड—समु-

दाय. चित्तापहारी—मनाचा त्रास नाहींसा करणारा. पंकिल—चिखलाचें. पल्वल—डबकें. मस्तकीं पद दिलें—डोक्यावर पाय दिला, अपमान केला. वृ. स्र. प. १३ अंबुद—मेघ. धवल—शुभ्र. वृ. स्र. प. १४ जलाशय—पाण्याचा सांठा. कलुषता—गढुळपणा. नवपंकज—फुललेलीं आहेत नवीन कमलें ज्यांत तें ( कमलिनीवनाचें विशेषण. ) कलहंस—एका जातीचा हंसपक्षी. वृ. पृथ्वी. पृ. ७ प. १५ करीर—एका जातीचें क्षुद्र झाड आहे. वृ. शा. वि. प. १ अभ्रंकष—मेघांना लागणारे, फार उंच. द्रविण--द्रव्य. बुद्बुद—बुडबुडे. नक्तंदिनीं—रात्रंदिवस. वृत्त शा. वि. प. ३ दंतावळी—दंतपंक्ति. चंड—भयंकर. दंडयुग—हातांची जोडी. पृ. ८ प. ५ कालोपद्रुत—काळाच्या तडाक्यांत सांपडलेलें. प. १ क्षिती—पृथ्वी. गौरीपती—शंकर. नीलग्रीव—निळा आहे कंठ ज्याचा असा. या प्रकरणाचें वृ. शा. वि. प. २ कूर्म—कांसव. प. ४ वाडव—वडवाग्नि, समुद्राच्या पोटांतील अग्नि. प. ५ गुरु—जड. प. ७ सूर्याच्या रथाला सात घोडे आहेत, त्याच्या रथाला एकच चाक आहे व त्याचा सारथी जो अरुण त्याला मांड्या नाहींत अशी प्रसिद्धि आहे. प. ८ इक्षुदंड—ऊंस. पृ. १० प. १० मथुनियां—घुसळून. वेदोदधी—वेदरूपी समुद्र. प्रचुर--पुष्कळ. प. १ शिशुस्थिति—बालपण. मनोज्ञ—आनंदकारक. हिमभूधरराजकन्या—हिमालयपर्वतश्रेष्ठाची मुलगी, गंगा. या प्रकरणाचें वृत्त वसंततिलक आहे. प. २ सलिल—पाणी. प. ११. जवें—वेगानें. प्रसन्न—स्वच्छ. प. ५ गभीर--खोल. तूर्ण—लवकर. प. ६ रुचिर—आनंदकारक. चित्तविनोदि—मनाचें रंजन करणाऱ्या. द्रुत—वेगानें. तुहिनाद्रि—हिमाचल, हिमालय. [ कौरवांनीं द्यूतांत पांडवांचें सर्वस्व हरण केलें व त्यांस वनवासास पाठविलें. ही बातमी यादव व पांचाळ यांस कळली. तेव्हां ते पांडवांचें व द्रौपदीचें समाधान करण्यास आले. त्या वेळीं कृष्ण व द्रौपदी यांमध्यें झालेलें भाषण पुढील पद्यांचा विषय आहे. ] पृ. १२ प. १ श्रीकृष्णा—द्रौपदी. खळपाणिकृष्ट—दुष्ट दुःशासनानें हातानें ओढलेले केश. उक्ति—बोलणें. आस्य—तोंड. प. २ त्वत्पदयु-

गुली. तुझें पदद्वय. प. ३ किली—किल्ली, युक्ति. प. ४ अतिमति—विशालबुद्धीचे. कुदासीनें—नीच बटकीनें. प. ५ खळ—दुष्ट. वपु—शरीर प. ६ दोर्दंडबळ—बाहुबळ. धिक्कष्टं—धिक्कार असो. प. ७ अम्ब—बाई. शोकाचलभरें—शोकरूप पर्वताच्या भारानें. प. ८ अखिलसतीपूज्ये—सर्व चांगल्या स्त्रियांना वंद्य जी तूं त्या हे द्रौपदी! अमृतद्युतिगौर—चंद्राप्रमाणें शुभ्र. प. ९ ज्यांत--ज्या दशांमध्यें. अंगनाश--देहाचा नाश. अंगना--बायका. प. १० मृषा--खोटें. मदुक्त--माझें बोलणें. लटिकें—खोटें. पृ. १३ प. ११ वारिराशि—समुद्र. प. १ मर्यादे...नये—विशिष्ट हेतु मनांत धरल्याखेरीज कामाला हात घालूं नये. विवेचना—विचार. प. २ आर्जव—सरळपणा. प. ५ निखंदूं नये—तिरस्कार करूं नये. पुढील—वडील माणसें. पृ. १४ प. ८ होड—पैज. प. १० व्यापकपण—उद्योग. प. १२ आपुल्यांची—स्वकीयांची. ग्वाही—साक्षी. प. १४ दुश्चितपणें-बेसावधपणानें, हलगर्जीपणानें. पृ. १५ प. १ नंदनवन—इंद्राचा बाग. सुमन—फूल. सरसुवासें—सरोवराच्या वासानें. प. २ एक—एक वृक्ष. शाखाविहीन—ज्याला फांद्या नाहींत असा. मंडित—सुशोभित. ग्रीवा—मान. लतिका—लता. सुखाडें—सुखानें, सहज. प. ३ चूतवृक्ष—आंब्याचीं झाडें. कंटकीफळांची—फणसांची. नव्हाळी—शोभा. दाविती...ची. वहात जातात. प. ६ विषधरू—सर्प. निधान—ठेवा. प. ७ न्यग्रोध--वड. पालाश—पळस. पिप्पल—पिंपळ. देवत्रय--ब्रह्मा, विष्णु व महेश. बिल्व—बेल—महादेवाला प्रिय; तुळसी विष्णूला प्रिय. प. ९ नकुळ—मुंगुस. मूषकें—उंदीर. करिण—हत्ती. पृ. १६ प. १० उलूकां निरवूनि--घुबडांच्या स्वाधीन करून. वायस--कावळे. प. १ ब्राह्मीं मुहूर्तीं—पहांटेस. गुणाश्रया-गुणांचा आश्रय करणारी, श्रीचें विशेषण. श्री-शोभा तया-पंकजास. युधिष्ठिरानें ... झालें—अश्वत्थामा नांवाचा हत्ती मेला असतां धर्मानें 'अश्वत्थामा मेला,' असें संदिग्ध विधान केल्यामुळें त्याला खोटें बोलण्याचें पाप लागलें व ह्मणून स्वर्गी जात असतां त्याचा अंगाठ गळून पडला अशी भारतांत कथा आहे. प. ४ लंकाधिपत्य—लंकेचें

स्वामित्व. वरिलें—मिळविलें. प. ५ दंभ—ढोंग. ब्राम्हण्यदंभें—मी ब्राह्मण आहें असें खोटेंच सांगून कर्णानें परशुरामापासून शस्त्रास्त्रविद्या प्राप्त करून घेतली, परंतु परशुरामाला जेव्हां कर्णाची ही लबाडी कळली तेव्हां त्यानें त्याला शाप दिला कीं, ही विद्या तुला प्रसंगीं उपयोगीं पडणार नाहीं. प. ६ बुधें—शहाण्यानें. द्रौणी—द्रोणपुत्र अश्वत्थामा. गदायुद्धांत दुर्योधन पडल्यावर यानें पांडवांच्या शिबिरांत रात्रीं गुप्तपणें शिरून निद्रिस्त असलेल्या द्रौपदीच्या मुलांचा व इतर पांचाळांचा निर्दयपणानें वध केला. हें नीच कृत्य त्याच्या ब्राह्मण्याला शोभण्यासारखें नव्हतें. विदुर—व्यासांचा दासीपुत्र. हा फार शहाणा, शांत व मोठा भगवद्भक्त होता. प. ७ संजीविनी—मृत मनुष्य जिवंत करण्याची विद्या. प. ८ अल्पवीर्य—अशक्त. राम—परशुराम. यानें एकवीस वेळां पृथ्वी निःक्षत्रिय केली होती. पृ. १७ प. ९ अघ—पाप. मारावया...... जोडी—वाली व सुग्रीव यांचें युद्ध चाललें असतां रामानें बाण सोडून वालीचा वध केला हा त्याच्या कीर्तीला मोठाच डाग आहे ह्यांत संशय नाहीं. प. १० यथोचित— योग्य. प. ११ तेजोवध—उत्साहभंग. कर्णार्जुन-युद्धप्रसंगीं शल्य हा कर्णाचा सारथि होता. युद्धाला आरंभ होण्याच्या पूर्वी त्यानें कर्णाची नीचकुलोत्पन्न ह्मणून पुष्कळ निंदा केली. प. १२ बुद्ध—हा परमेश्वराचा नववा अवतार असें समजतात. प. १३ यशस्तनु—कीर्तिरूप शरीरें. या प्रकरणाचें वृत्त उपजाति आहे. प. १ अंतरंग—मन. प. २ सांद्र—दाट. मूकरामायण—तुझ्या केवळ दर्शनानें रामायणांतल्या अनेक प्रसंगाचें स्मरण होतें. प्रकरणाचें वृत्त उपजाति. प. ३ पराची—दुसऱ्याची. जाया—स्त्री. प. ४ सद्म—घर, पर्णकुटिका. हेममृग—सुवर्णहरिण. पृ. १८ प. ५ वृक्षवरा—वृक्षश्रेष्ठा. प. ६ स्वनाथ...लग्ना—आपल्या स्वामीच्या ठिकाणीं तल्लीन झालेलें आहे मन जीचें अशी ( सीता ). शोक...मग्ना—शोकरूपी सरोवरांत बुडालेली. प ७. कलिका—कळ्या. दीनरामा—दीन झालेली स्त्री, सीता. संतमनोभिराम—साधूंच्या मनाला आनंद देणारा, राम. प. ८ गात्रयष्टी— देह. प. ९

दूत—मारुति. प. १० अशोका—दुःख नाहींसें झालेलें आहे जीचे अशी प. ११ जधीं—जेव्हां. अनुराग— प्रेम. पृ. १९ प. १ अखंडित—नेहमीं. कमलापति—विष्णु. प. ३ पण—प्रतिज्ञा. प. ४ सांकडे—संकट. पृ. २० प. ५ संचित—दैव. सांड—हेळसांड. तोडर—तोरडी. जौंजार—त्रास. प. १ खळणें—थांबणें. पवन—वारा. सविश्रम—विश्रांति आहे ज्याला असा. या व पुढील दोन पद्यांचें वृत्त वसंततिलका. प. २ विधु—चंद्र. लय—विपत्काल. अभ्युदय—भरभराट. प. ३ लब्धार्थ—मिळालेली इच्छित वस्तु. परिपालन—रक्षण. पृ.२१ प. ४ आगम—येणें. जलद—मेघ. वृ. मालिनी. प.५ अंकीं—मांडीवर. वृ. व.ति. प. ६ कुलधन—कुलीन. अनुरंजविणें—संतुष्ट करणें. जें मी...नसावें—मी जे दुष्ट शब्द बोललों ते तुला योग्य नाहींत. हें रामचंद्राचें सीतेला बोलणें आहे. दुष्ट शब्द हेः—हे जानकि, अग्निशुद्धीचा हा लोकापवाद तुला यावज्जीव लागणार आहे. वृ. व.ति. प. ७ विनयमधुरा—विनययुक्त असून गोड. कल्याणी—चांगली. भेद--पालट. रसविपर्यास--प्रीतींत अंतर. रहस्यें--अंतरंगांतील गोष्टी. अकपट--निष्कपट. वृ. शिखरिणी. प. ८ वितरी--देतो. धी--बुद्धि. बिंबग्राही--प्रतिबिंब घेणारा. शुचिमाणि--शुद्ध, स्वच्छ हिरा. लोष्ट—ढेंकूळ. वृ. शि. पृ. २२ प. ९ सूनृता--चांगली. वैखरी--वाणी. वृत्त--मालिनी. प. १०. योग. संयोग. किमपि--कारण. उपधिकारण—-विशेष कारण विधूच्या पाषाणा—चंद्रकांतास. वृ. शिखरिणी. प. ११ पर...मदा—शत्रूचें तेज. बळ व गर्व यांस. चंडांशु--सूर्य. रविग्रावा—सूर्यकांतमणि. अनलतेजास—अग्नितुल्य तेजास. वमतो—प्रगट करतो. वृ. शि. प. १२ घन—दाट. वृ. इंद्रवंशा. प. १३ जाया—बायको. वृ. शा. वि. प.१४. हृदयानुगुणा—मनाला आनंद देणारी. विनोद—करमणूक. वृ. व. ति. पृ. २३ प. १५ विश्रंभ—विश्वास. प्रकांड—मूलापासून फांद्यापर्यंतचा वृक्षाचा भाग. चारित्र—सच्छील. गिरा—वाणी. पादप—वृक्ष. सुहृत्—मित्र. वृ.शा.वि.प.१६वृ. उपजाति.प.१७ सत्पक्ष—चांगले पंख. तडाग—तळें. दंष्ट्रा—दाढा. प. १९. भागा—श्रम

करा. विषम—दुष्ट, भयंकर. चिरसंचित--पुष्कळ दिवसांपासून सांचवून ठेविलेलें. वृ. स्वागता. प. २० सुखहेतु—सुखाला कारण. वृ. द्रुतविलंबित. प. २१ वृ. शा. वि. पृ. २४ प. २२ चक्षु—डोळा. तत्त्वदर्शन—सत्य काय आहे तें पाहणें. अश्लाघ्य—निंद्य. प. २३ मधुप—भुंगे. सार—मध.वृ. व. ति. प. १ अभिज्ञ—हुषार, विद्वान्.वृ.भुजंगप्रयात. प. २ मही—पृथ्वी. पाथोधि—समुद्र. कपर्दिका--कवडी. वृ. शा. वि. प. ३ स्वजठरार्थ--आपलें पोट भरण्याकरितां. वृ. व. ति. पृ. २५ प. ४ जलजपत्रोदक जसें--कमलाच्या पानावरील पाण्याप्रमाणें चंचल. प्रचुर--पुष्कळ. विलज्ज--निर्लज्ज. मृषा--खोटी. वृ. शिखरिणी. प. ५ रदनावलि--दंतपंक्ति. अणु--किंचित्. वृ. तोटक. प. ६ पानीय--पाणी. वीची--लाटा. कूलंकषा--तटांस फोडून जाणारी नदी. वृ. शा. वि. प. ७ तरंग--लाटा. चारु—सुंदर. अन्यालयीं—दुसऱ्यांच्या घरीं. वृ. शा. वि. प. ८ विपिन—अरण्य. वृ. व. ति. प. ९ वासर—दिवस. धनपति—श्रीमंत मनुष्य. अवसान—शेवट. वृ. शा. वि. पृ. २६ प. १० शशिमुखी—चंद्रवदना. तप्तहेमप्रभा तापलेल्या सोन्याप्रमाणें ज्यांची कांति आहे—अशा ( स्त्रिया ). जेणें—ज्या कालानें. स्मरणास...रचिलें—तें सर्व केवळ स्मरण करण्यास योग्य असें केलें ह्मणजे नाहींसें केलें. वृ. शा. वि. प. ११ नसे...तें—रात्र किंवा दिवस हें ज्ञान कामधंद्यामुळें नाहींसें होतें. मादिरा—मद्य. वृ. शिखरिणी. प. १२ रजनी—रात्र. विकृति—विकार. कंटाळा. वृ. शा. वि. प. १३ विश्रुत—प्रख्यात. वृ. शा. वि. प. १४—कुमती—मूढ. वृ. तोटक. प. १५ द्विप—हत्ती. वृ. शि. पृ. २७ प. १६—भृत्य—चाकर. जन्हुकन्या—गंगा. निकुंज—गुंफा.—लतामंडप. गोमटी—चांगली. वृ. शा. वि. प. १७ सुरनदी—गंगा. पद्मासन—आसनविशेष. योगनिद्राभर—समाधिसुखांत गुंग होऊन जाणें. पोत—बालक—वृ. पृथ्वी. प. १८ शर्व—शंकर. भूधर--पर्वत. ग्रावाग्र—पर्वतशिखर. स्वर्णदी-गंगा. अर्णव—समुद्र. वृ. शा. वि. प. १९ वल्कल—झाडाची साल. वृ. शा. वि. प. २० पाणियुग—हस्तद्वय. मल—पाप.

वनिता--स्त्री. वृ. शा. वि. प. २१ मेदिनी--पृथ्वी. मारुत--वारा. सोदर--बंधु. तोय--पाणी. पृ. २८ वर्षोपल--गार. वृ. शा. वि. प. २२ जरा--म्हातारपण. शक्त--समर्थ. वृ. शा. वि. प. ३ रजनीचर--राक्षस. यादवेंद्र--कृष्ण. अति उदित साक्षेपें--मोठ्या अगत्यानें अवतार घेतला. प. ६ विहंगम--पक्षी. पृ. २९ प. ७ क्षीरार्णव--क्षीरसागर. मीन--मत्स्य. गुणनिधान--गुणांचा सांठा. प. ८ साचार--खरा. प. ११ चंडांशु--सूर्य. व्योमीं--आकाशीं. प. १२ धाम--गृह. प. १३ मराळ--हंस. [ वनवासांत असतां धर्मराजानें आपला एक हेर दुर्योधन कोणत्या प्रकारें राज्य करीत आहे हें पाहून येण्याकरितां हस्तिनापुरीं पाठविला. तिकडून परत आल्यावर त्या हेरानें धर्माला जें सांगितलें तें पुढील प्रकरणांत वर्णिलें आहे. ] पृ. ३० प. १ शत्रून्मूलन--शत्रूंचा नायनाट. चर--हेर. रुचिर--सुंदर. परिमिता--जिच्यांत फार शब्द नाहींत अशी ( वाणी ). किराताग्रणी--वनचरांचा मुख्य. वृ. शा. वि. पुढील दोन श्लोकांचें तेंच. प. २ वंचन--फसविणें. प. ३ क्ष्मानायक--राजा. प. ४ दुर्ज्ञेय--समजण्यास कठिण. क्षोणिपाल--राजा. वृ. स. प. ५ वसुमती--पृथ्वी. अंतरीं--मनांत. वृ. शा. वि. पुढच्याचें तेंच. पृ. ३१ प. ६ आगळा--श्रेष्ठ. प. ७ जिणुनि--जिंकून. मनुविहित पथें--मनूनें सांगितलेल्या मार्गानें. वृ. स्रग्धरा. प. ८ भेद--फोडणें. अनुग--सेवक. वृ. शा. वि. प. ९ वृ. स्रग्धरा. प. शा. वि. प. ११ स्र. वृ. पृ. ३२ प. १२ चा--ही. उपाय--साम, दान, दंड व भेद. चय--ढीग. वृ. शा. वि. १६ श्लोकांपर्यंत तेंच वृत्त. चिखलाची प. १४ कर्षक--शेतकरी प. १५ श्रीद--कुबेर. प. १६ अर्जिलें मिळविलें. विक्रम--पराक्रम. उद्भट--उत्तम रीतीनें. भट--योद्धे. वृ. शा. वि. पृ. ३३ प. १७ त्याच्या--मसलति. कार्यसिद्ध्यंत--कार्य होईपर्यंत. धात्याचें--ब्रह्मदेवाचें. अभिमत--हेतु. कार्य पाहुनि--कार्य संपल्यानंतर. त्याच्या आधीं नव्हे. वृ. स्र. प. १८ तयाची...शिरें--त्याची आज्ञा शिरसा वंद्य मानतात, ती मोठ्या नम्रपणानें पाळतात. वृ. शिख. प. २० सर्व...

तोयधी—समुद्रवलयांकित पृथ्वीला. वृ. शा. वि. प. २२ प्रतीकार—विरोध. वृ. शि. पृ. ३४ निरोपे—केवळ निरोपाचे धनी. प. २३ उक्त चारें—हेरानें सांगितलेलें. दयितेलागीं—स्त्रीला, द्रौपदीला. वृत्त स्रग्धरा. पुढल्या प्रकरणाचें वृत्त पृथिवी. प. १ अशेष—सर्व. प. २ आर्त—दुःखित. अनल—अग्नि. प. ३ रुचिर—सुंदर. असुं—अश्रु. परिमिती—मर्यादा. पृ. ३४ प. ४ सांकडें—कोडें. रमेसह—लक्ष्मीबरोबर. लक्ष्मी व सरस्वती एका ठिकाणीं नांदत नाहींत अशी पूर्वीपासून समजूत आहे. प. ५ निरुद्यम—आळस. प्रगतिकाज—सुधारणेचें कार्य. विबुधवृंद—विद्वज्जनसमूह. प. ६ मृति—मरण. रमारमण—माधवरावांच्या पत्नीचें नांव रमाबाई असें आहे. प. ८ धी—बुद्धि. विद्यानिधी—विद्यासागर. निधन—मरण पृ. ३६ प. ९ बिस्मार्क—प्रसिद्ध जर्मन मुत्सद्दी. अनन्वयनिदर्शन...दिसे—माधवरावजींच्या चरित्राला दुसऱ्या कोणत्याही चरित्राची उपमा देतां येणार नाहीं; त्याच्याप्रमाणें तेंच. गुणसंहती—गुणांचा समूह. सुगुण...ते—कांहीं गुणांचा त्यांच्या ठिकाणीं इतका अतिरेक झाला होता कीं, त्या गुणांना दोषरूपत्व प्राप्त झालें होतें. प. १० जनछत्र—लोकांचा आधार. प. ११ रसायन—आनंद देणारें. चिच्छक्ति—बुद्धि. प. १२ शाद्वल—हिरव्या गवतानें भरलेलें. झरी—ओढा. सैकत—कांठ, किनारा. चटुल—बदलणारी, अस्थिर. निमाली—नाहींशी झाली. मर्मर—मंजुळध्वनि. प. १३ गिरा—वाणी. प. १४ प्रभवनिर्गता—उगमापासून निघालेली. पृ. ३७ प्रवाह—वाहणें. सुहृद्गण—मित्रांचा समूह. वृत्त द्रुतविलंबित. प. १ रमावरा—लक्ष्मीपते. विनत—नम्र. तमीं भ्रम—संसाररूपी अंधारांत भटकणें. प. २ शुभकरा—कल्याण करणाऱ्या. उपला—दगडाला. असु अर्पिशी—प्राण देतोस. येथें अहिल्योद्धाराकडे लक्ष्य आहे. उपलसेतु—लंकेला जातांना बांधलेला दगडाचा पूल. चमत्कृतिकारि—विस्मय उत्पन्न करणारें. विभव—ऐश्वर्य. भव...ना—हे संसारबीजनाशका. पृ. ३८ प. ३ भवजालिं—संसाररूपी जाळ्यांत. प. ४ गजवरा—गजेंद्राला. जवलाघव—वेगाचें कौशल. प. ५ अवन—रक्षण, द्रुपदजा—द्रौपदी. प.

६ तुला—साम्य. नुता—स्तुता. प. ७ दिनमणी—सूर्य. शिखि—अग्नि. भगणा—नक्षत्रसमूहाला; भग—ऐश्वर्य. पृ० ३९. प. ८ नृपतिता—सर्व लोकांचें रक्षण करणारा या नात्यानें जें तुझें ऐश्वर्य आहे तें. हें 'दाखवीं' याचें कर्म. प. ९ स्थल—हृदयमंदिर. नवनीरदसुंदरा—नवीन मेघाप्रमाणें सुंदर दिसणाऱ्या. प. १० विपदर्णव—दुःखसागर. विषयाटवी—विषयारण्य. अनश्वर—कायमचें. वमन—ओकारी. प. ११ तापहा—भवताप दूर करणाऱ्या! प. १२ विनतात्मजवाहना—गरुडवाहना! पृ. ४० [ वालिसुत अंगद यानें रावणाकडे जाऊन त्याला जानकी सोडून देऊन रामाला शरण जाण्याविषयीं बोध केला तो पुढील आर्यांत पंतांनीं वर्णन केला आहे. ] प. १ रात्रिंचरराजा—राक्षसराजा रावणा! अंगदाभिध—अंगद नांवाचा. प. २ वैदेही—जानकी. सद्रीतें—उत्तम वाणीतें. प. ३ चतुराननन—ब्रह्मदेव. पौत्र—नातू. पुलस्त्यऋषीचा पौत्र आणि विश्रवा ऋषीचा पुत्र. भूतपतिदास—शिवभक्त. श्रुतसंपन्न—शास्त्रसंपन्न. प. ४ भूसुर—ब्राह्मण. प. ५ जननीचा—लोकांत वाईट वृत्ति. स्वकीय जननीच्या—रावणाची माता कैकसी ही सुमाली नामक राक्षसाची कन्या. प. ६ धर्मद्रु—धर्मवृक्ष. वेदकुंजरसा—वेदरूप झाडी आहे जिचे ठायीं अशी. प. ७. कैरवपतिनिभ—चंद्रतुल्य. प. ८ वित्तम—ज्ञानिश्रेष्ठ. प. ९ प्रसू—माता. प. १० स्वेष्टांसि—आपल्या आप्तांस. मंतु—अपराध. चेष्टा—क्रिया. पृ. ४१. प. ११ रविसूनुचीं. सूर्यकुलभूषण जो दशरथ त्याची. प. १२ केली—क्रीडा. प. १३ निलय—स्थान. प. १४ भ्रू—भ्रुकुटी. चापलता—धनुष्यरूप लता; चपलत्व. जिष्णुची—इंद्राची. प. १८ सीतोपायन—सीतारूप नजराणा. प. १९ रघू....पद्मीं—रामपदरूप नवीन कमलीं. सद्म—गृह. प. २१ अनल—अग्नि. अनिल—वायु. यक्षप—कुबेर. ब्रध्न—सूर्य. पृ. ४२ प. २३ धनंजय—अग्नि. तूल—कापूस. शैल—पर्वत. प. २४ दलकुटि—पर्णकुटि. रत्नातें—सीतारूप रत्नातें. प. २५ करिशील—हत्तीसारखा स्वभाव ज्याचा असा. प. १ वर्षा—पावसाळा. जीवन—पाणी. वृ. वसंत-

तिलका. प. २ थाट—समुदाय. कृष्ण—काळे. तपर्तूतें—ग्रीष्मऋतूला. घटवी—कमी करी. वृत्त शिखरिणी. पृ. ४३ प. ३ व्योमीं—आकाशांत. वृ. व. ति. पृ.४४ धाराभिघात—पाण्याच्या धारांचा वर्षाव. अचल—पर्वत. व्यसनें—संकटें. वृ. व. ति. प. ५ संस्कारशून्य—आकारविरहित. वृ. व. ति. प. ६ आकाश...गुण—शब्द हा आकाशाचा गुण आहे. गुणशून्य—ज्याला दोरी नाहीं असें. वृ. व ति. प. ७ गुरु—उपकारकर्ता. वृ. व. ति. प. ८ कलाधिप—चंद्र. खद्योतसंघ—काजव्यांचा समूह. वृ. व. ति. पृ. ४४ प. भेक—बेडूक. विबुध—शहाणे लोक. वृ. व. ति. प. १४ समुन्नत—उंच. वेतस—वेत. वृ. व. ति. प. ११ उत्पथ—वांकड्या तिकड्या मार्गानें जाणारे. अदृष्ट—दैव. अजितेंद्रिय—ज्यानें आपलीं इंद्रियें जिंकिलीं नाहींत असा मनुष्य. वृ. व. ति. प. १ जाती—लहरी, हा कर्ता. लहरी—लाटा. पृ. ४५ जलाधीश्वर—सागर. वृत्त—शार्दूलविक्रीडित. प. २ परंतु...गोचर—परंतु तव तनु जों विलोचना गोचर होय ह्मणजे डोळ्यांनीं तुला पाहिलें ह्मणजे. वृत्त पृथ्वी. प. ३ शुंडादंड—सोंड. दिग्गज—आठ दिशांना आठ हत्ती आहेत अशी समजूत आहे. ध्रुव—पृथ्वीचीं उत्तर व दक्षिण टोकें. वृ. स्रग्धरा. प. ४ हयपत्ती—घोडेस्वार. सांड—उंटीण. काण्ड—धनुष्य. सुशिक्षायुत—युद्धकला उत्तम जाणणारे. विपक्ष—शत्रु. इंदूद्भवां—चंद्रकुलोत्पन्न राजा. प. १ कळीं—कलियुगांत. भुर्का—पेय, पिण्याचा पदार्थ. पृ. ४६ प. २ धणी—लाभ. कोढी—कोटी. प. ३ उभयतां—वक्त्याचें व श्रोत्याचें. प. ४ मैंद—फांसेगार, ठक. चांग—चांगला. घांटी—गळा. पृ. ४७ प. ६ सांगाती—सोबती. प. ७ प्रासादिक रंग—कवित्वस्फूर्तीची बहार. सांग—सर्व. सीमा करितील—पराकाष्ठा करितील. प. १ शिशिर—हिंवाळा. मधुराजयाच्या—वसंतऋतूच्या. वृ. व. ति. पुढील पांच पद्यांचेंही वृत्त तेंच. पृ. ४८ प. ३ दोहद—डोहळा, इच्छा. अशोक—तरुणस्त्रीनें आपल्या नूपुरयुक्त चरणानें ताडन केल्यावर हा वृक्ष फुलूं लागतो असा कविसमय आहे. परंतु

या ठिकाणीं अशोकवृक्षांना तरुणीचरणताडनाची इच्छा न होतांच फुलें आलीं. कुड्मल–कळी. प. ४ वंशरंध्रीं–वेळूंच्या छिद्रांत. मोदकारीं-आनंद देणारीं. प. ५ मंजुस्वन--मंजुळ आवाज. पिक-कोकिल. सारिका--पक्षिविशेष. नटनर्तक–नाचणारे. प. ६ पुष्पान्विता–पुष्पयुक्त. पौरनारी–शहरांतील स्त्रिया. भद्र–कल्याण. पराग–रज. रंजित–चित्रविचित्र पृ. ४९ [ विश्वामित्र यज्ञरक्षणासाठीं रामाला मागण्याकरितां दशरथाकडे गेला. परंतु राजानें पहिल्या प्रथम त्याचें ह्मणणें कबूल केलें नाहीं. तेव्हां विश्वामित्रानें राजाची फार निर्भत्सना केली. शेवटीं वशिष्ठाच्या उपदेशावरून राजानें रामलक्ष्मणांना विश्वामित्राबरोबर पाठविलें. हा कथाभाग प्रस्तुत पद्यांत वर्णिला आहे. ] प. २ निर्भर–फार. वरासन–उत्तम आसन. मधुपर्कविधि–घरीं पाहुणा आला असतां त्याला दहीं, तूप, पाणी, मध व साखर हे पांच पदार्थ एकत्र करून देण्याची पूर्वी चाल होती. त्या मिश्रणाला 'मधुपर्क' असें ह्मणतात. प. ५ ते अवनी–ती जागा. प. ६ धाता–उत्पन्नकर्ता प. ८ मुसावलें–प्राप्त झालें. परतारूं–पैलतीराला नेणारी होडी. पृ. ५० प. १४सुखस्फूर्ति–सुखाचा उमाळा.प.१५ विनीत–नम्र.कृतकार्यार्थ–इच्छित पदार्थ.प.१७अवधारीं–लक्ष दे.प्राकृत–सामान्य. प.२०भाणें–शेषान्न. भणग–भिकारी. पृ. ५१ प. २२ नेदी–न देई. प. २५ निधान–ठेवा. प. २६ शेखीं–शेवटीं. पृ. ५२ प. ३३ अंतक नाश करणारा. प. ३५ विदेही–देहविरहित. चैतन्यविग्रही–ज्याचा देह चैतन्यरूपी आहे असा. पृ. ५३ वृत्त वसंततिलका. प. १ वर्म–कवच. प. २ पर–शत्रु. असूया–हेवा. प. ३ व्याजस्तुति–दिसण्यांत स्तुतिपर, परंतु खरोखर निंदापर असें भाषण. व्याज–कपट. जीच्या–व्याजस्तुतीच्या. राजमता–राजाला मान्य असलेल्या. नय--मार्ग. प.४ संमत--मान्य. प. ५ विचरूनि--चांगल्या रीतीनें करून. अवसान--शेवट. पृ. ५४ प. ६ लोकीं...भयाला--जगांत ज्याला कसलीहि आशा नाहीं, ( निराश ) अशा मनुष्याला कोणत्याही प्रकारची भीति वाटत

नाहीं. आत्मप्रभु—स्वतःचें मन आंवरून धरण्याला समर्थ. आकिंचन--निर्धन. प. १ वृत्त॰ वंशस्थ. निशा--रात्र. प्रभाता—प्रकाशित. विषण्ण--उदास. फलावपातें--फळ पडण्यानें. प. २ दल—पान. कौलिक--कोष्टी. जालक--जाळें. सुवर्ण—चांगला रंग. करीं किरणांनीं. पृ० ५५ वनान्त—वनप्रदेश, रानें. लोभवी—रम्य करी. कुटि--झोंपड्या. गिरींद्रभू—उंच पर्वतावरच्या जमिनी. प. ४ समीर—वारा. वीचि—लाटा. व्योम—आकाश. प. १ भारतकमलपराग—भारतरूपी कमळाचे रेणु. प. २ शब्दब्रह्माब्धि—वेदरूप समुद्र. निवाडिलें—काढिलें. निरवधि--अनुपमेय. पृ. ५६ प. ३ कडसिलें--कढविलें. पद--स्वरूप. परिपाक—पक्वतेनें. आमोद—वास. प. ४ सोहं....जेथ—ब्रह्मनिष्ठ ज्याच्या ठिकाणीं रममाण होतात. प. ५ आदिवंद्य—परमपूज्य. प. ६ ईश—शंकर. सनक—ब्रह्मदेवाच्या चार मुलांपैकीं एक. प. ७ शारदीचीये—शरदृतूच्या. चकोरतलगें—चकोर पक्ष्यांची पोरें. प. ८ हळुवारपण—मऊपणा. प. ९ संवादिजे—विचार करावा. प्रमेय—रहस्य. प. १० परी—प्रकार. प. ११ अनुराग—प्रीति. कुमादिनी—चंद्रविकासी कमल. प. १२ आथिला--सुसंपन्न. मानूं--खुबी, रहस्य. प. १३ पांती—पंक्तीला. पृ. ५७ प. १५ आथि—आहे. प. १६ उपसाहला—क्षमा करण्याला. प. १७ कवळूं--स्पष्ट करूं. अवलाहें—लक्ष द्या अशी विनंति करीत आहे. प. १८ धिंवसा—धैर्य. उपनला—उपजला. प. १९ चांचुवरी--चोंचींनें. सूयें--घाली. प. २० गिवसावें--कंवटाळावें. अपाड—अशक्य. आघवें—सर्व. प. २३ घोर--घोरणें. पृ. ५८ प. २५ धवळावे—उजळावे. सुवावें--धरावें. प. २६ सधरु--धैर्यानें. प. २९ भारती—वाणी. प. ३१ सरतें--सोडून द्या. प. १ प्रथित—प्रतापशाली. सुप्रसिद्ध—शौर्यानें शोभणारा. किर्तिधाम--यशःस्थान. भाजा--बायको. पृ. ५९ प. ३ त्रपा—लाज. प. ४ पाटीर--चंदन. प. ५ पृतना--सेना. प. ९ वाचादत्ता--वचनानें दिलेली. प. १० न्यास—ठेव. पृ. ६० प. १ आगळा—श्रेष्ठ. प. २ महींद्र—पर्वत प. ७ अक्षोभ—गंभीर ( खोल ) प. ८ चूडामणि—शिरोभूषण. प.

९ संघाट—समूह. प. १० सेनावसनें—सेनारूपी वस्त्रानें. पृ. ६१ प. १२ डांगें—झुडपें. निर्झर—झरा. प. १५ सिद्ध—ज्यास सिद्धि प्राप्त झाली आहे तो. साधक—जो कार्यसिद्धीसांठीं उद्योग करतो तो. प. १६ पवित्रजीवनी—पुण्यजला.देवतटिनी—गंगा.तरंग—लाटा. सुफेन—उत्तम फेंस. प. २० इंदिरावेशें—लक्ष्मीच्या रूपानें. प. २१ कनलतिका—सुवर्णाची वेल. सौदामिनी—वीज. पृ. ६२ प. २२ धरित्रीकांत—राजा पृ. ६३ प. ५ भवपंक—संसाररूपी चिखल. निकटस्था—ईश्वर प्रत्येकाच्या अंतःकरणांत आहे, ह्मणून त्याला निकटस्थ ह्मणजे जवळ असणारा असें ह्मटलें आहे. प. ६ किंकर—चाकर. प. ७ पदप्रवणा—चरणीं लीन झालेला जो मी त्याला. प. १० चाटुकार—तोंडपुजा. प. १२ मादृगज्ञानें—माझ्या सारख्या जड जीवानें. पृ. ६४ प. १४ व्याल...तर—भयंकर सर्पापेक्षांही जास्त क्रूर असा. प. १ शुभ्रांशु—चंद्र. सुधी—बुद्धिमान् पुरुष. विकांती—निस्तेज. वृत्त उपजाति. प. २ निकरीं—युद्धांत. तिमिर—अंधार पृ. ६५ शुचि—स्वच्छ. हृत्—अंतःकरण. श्री—संपत्ति.वृत्त—मंदाक्रांता. प. ३ कुमुदें—चंद्रविकासी कमलें. कमलें—सूर्यविकासी कमलें. वृ. उपजाति. प. ४ ध्वांतासुर--अंधकाररूपी दैत्य. क्षितिभृत--पर्वत. अहरहः--दररोज. वृ. शा.वि.प.५अद्रिराज--पर्वतश्रेष्ठ. वृ. व.ति. प. ६ कुंद--एकप्रकारचें फूल. मकरंद--फुलांतील रस.मोद—आनंद.मधुपवृंद—भुंग्यांचा समूह. सुखकंद—सुखाचें स्थान.पृ. ६६[जनकराजाच्या सभेंत विश्वामित्राच्या सांगण्यावरून रामानें शिवधनुष्याचा भंग केला व मग सीतेशीं त्याचा विवाह झाला ही कथा पुढील श्लोकांत आली आहे.]प. १ह्मणुनी-रामानें विश्वामित्राला ह्मणून,माजीं—कमरेंत. कशी--बांधी. लोकराजी.लोकपंक्ति. वृ.शा. वि. प. २ मृदुभा-कोमलकांति. चित्रनिभा-चित्राप्रमाणें तटस्थ. भा--तेज. निशा...वळी--चंद्रकांतितुल्य मोत्यांची पंक्ति. वृ. शा. वि. प. ३ उफाळला--उडाला. गव्हर--गुहा. वेतंडशुंडा--हत्तीची सोंड. मृगाक्षी--हरिणनयना, सीता. वृ. शा. वि. प. ४ कोटी--कडा. गुण—दोरी. कान-

वरी--आकर्ण. दिठीं--दृष्टीनें. वृ.शा.वि.प. ५ लीला...ललामें--लीलेनें--सहज राजांमध्यें शोभायमान. तुकुनि--उचलून. प० ६७ निबिड--दाट. प्रतिनदन--प्रतिध्वनि करणारा.वृ.स्रग्धरा.प. ६ तटीं प्रांतीं, भागीं. टाळी बसे--कानठाळ्या बसल्या.वृ.व.ति.प.७ गौतमपुत्र--शतानंद, (जनकराजाचा पुरोहित)गाधेय--विश्वामित्र.वृ.व.ति.प.८कार्मुक--धनुष्य.सुरसेक्षणानें--उत्तम नयनांनीं.वृ-व.ति.प.९गिरा--वाणी. राजे--शोभे वृ.व. ति. प. १० दोर्बल--दंडाचें सामर्थ्य.भाटिवकी--स्तुतिपाठकता. वृ. व. ति. प. ६८ प. ११ संतोष--आनंद. कडासन--तपस्विजनाचें व्याघ्रचर्माचें आसन. कृष्णाजिन--मृगचर्म. वृ. शा. वि.प. १२ सौधतटीं--माडीवर. गोमटी--सुंदर. ससंभ्रम--गडबडीनें. दाश...जवळीं--रामरूपी दयासागराजवळ. वृ. शा. वि. प० १३ सौधसोपानमाला--जिन्याच्या पायऱ्या. वृ. मालिनी. प. १४ श्री--लक्ष्मी. ( सीता. ) वरा--पतीला. रामाला. देवरा--दीराला, लक्ष्मणाला. रंग--सभास्थान, समाज. धुनी--नदी. वृ. मालिनी. प. १५ अतुर--आतुर. अपांग--डोळ्याचा कोंपरा. योगि...द्रा--योग्यांच्या हृदयरूप आकाशांतील चंद्राला. वृ. मालिनी. प. १६ अमल--स्वच्छ. राजबाळी--राजकन्या. घोंसवाळी--कानांतील मोत्यांचा अलंकार. वृ. मालिनी. पृ.६९ प.१७स्मरसा--मदनासारखा. नृवर--नरांत श्रेष्ठ. गर--विष. हृत्सारसा--चित्तकमलास. वृ. शा. वि. प. १८ अळुमाळ--हळुहळु, थोडथोडा,थोडासा. वेल्हाळ--सुंदरी. मदालसा--आनंदातिशयानें मंद झालेली आहे गति जिची अशी.कोल्हाळ--गडबड. अलि...का--भ्रमरसमुदाया प्रमाणें कुरळ व कृष्ण आहेत केश जींचे अशी. भव्य...विभूच्या--प्रचंड तमालवृक्षाप्रमाणें नीलवर्ण जो प्रभू रामचंद्र त्याच्या. वृ. शा. वि. प. १ वृत्त मंदाक्रांता. वारिदानें--पाणी देऊन--ढगानें. प. २ संपदा--भरभराट. पृ. ७० प० ३ परभृत--दुसऱ्यानें पोसलेला. प. ४ पंकक्लिन्ना--चिखलानें व्याप्त. फेन--फेंस. प. ५ कतिपय--कांहीं. कोरडा--चाबूक, शुष्क. संघ--समुदाय. प.६ स्रोतः स्थान--प्रवाहाचें पात्र. प्रस्तरश्रेणी--दगडांच्या रांगा. आसन्नान्त--मरण जवळ आलें आहे ज्याचें

असा. पृ. ७१ अधुना—आतां. नदीन—सागर. प. १ यज्जीवन—ज्यांतील उदक. मानसीं—मानससरोवरांत. जीवन—वसति. द्विजेंद्र—पक्षिश्रेष्ठ. मलिन पल्वलीं—घाणेरड्या डबक्यांत. भेकावलि—बेडकांच्या पंक्ति. वृत्त पृथ्वी. प. २ मरंद—रस. अलि—भ्रमर. मंजु—मंजुळ. कांहीं निराळा—अगदीं अलौकिक. वृत्त मालिनी. प० ३ चंडभानुकिरणीं—सूर्याच्या प्रखर किरणांनीं. संतापाकुल—मोठ्या तापानें व्याकुल. पांथसंहति—प्रवासी लोकांचा समुदाय. अंतरिं—मनांत. कासार—सरोवर. आधिनें—मनांतलि चिंतेनें. जीवन उदक, श्लेषानें जिणें. वारिधीचें समुद्राचें. वृ. शा. वि. पृ. ७२ प० ४ पतंग—पक्षी. रसालकलिकांवरि आंब्याच्या मंजिऱ्यांवर. भृंगसंघ भ्रमरांचे समुदाय. पद्माकरा—हे सरोवरा! मीन मासा. वृत्त वसंत तिलका. प० ५ भानु...किरणीं—सूर्याचें कडक ऊन आहे ज्यांत अशा;हें 'ग्रीष्मीं' याचें विशेषण. मालाकारा—हे माळ्या. वर्षासमयीं पावसाळ्यांत. वितरी—देतो, सोडतो. वृत्त मंदाक्रान्ता. प. ६ करटी—हत्ती. मुक्तामाला—मोत्यांच्या पंक्ति. करिवरविमुक्ता—मोठाल्या हत्तीं—(च्या गंडस्थला) पासून गळून पडलेल्या. विखुरती—पसरतात. तयाच्या—त्या मृगपतीच्या. शिवा—कोल्ह्या. शब्द—ओरड. वृ. शिखरिणी. प. ७ करी—प्रगट करी असा अन्वय. तरुकुलीं—वृक्षसमुदायांवर. वाल बकुलीं—लहान बकुळीच्या झाडावर. एकाकी—एकटा. संकुल—व्याप्त. वृ. शिखरिणी प. ८ सुबद्ध—जमिनींत चांगला दृढ झालेला. पीवर—पुष्ट. बृहत्—पुष्कळ. पादपा—वृक्षा. दुर्गीं—चढण्यास कठिण अशा. हें 'भूधरिं' याचें विशेषण. भूधरिं—डोंगरावर. ज्वालांदारुण—ज्वालांच्या योगानें भयंकर. दावानल—वणवा. चिंताज्वर—चिंतारूप ताप. वृ. शा. वि. प. ९ यन्मंजरी—ज्या आम्राच्या मंजिऱ्या. मदभरें—आनंदभरांत. लीला—विलास पृ. ७३ दैवें—दुर्दैवानें. रसाल—आम्रवृक्ष. षट्पदा—भ्रमरा. वृ. शा. वि. प. १० गजेन्द्रा—गजश्रेष्ठा. निबिड—दाट. करी—हत्ती. प्रखरनखरीं—तीव्र नखांनीं. शिलासंघा—पाषाणांच्या समुदायाला. शैलकुहरीं—पर्वताच्या गुहेंत. वृ. शिखरिणी प. ११ स्थापित करी—लावतो. कोणान्तरीं—कोपऱ्यांत. वृ.

शिखरिणी. प. १२ अमरद्रूंचें—देववृक्षांचें. विहारस्थल—क्रीडास्थान. शच्चिचें—इंद्राच्या बायकोचें. पुण्यावलीचें--अनेक पुण्य कृत्यांचें. खाण्डव-रङ्गभूमिनट—खाण्डववनरूप रंगभूमीवरील नाचणारें पात्र. तो—पुराण-प्रसिद्ध. वृत्त. शा. वि. प. १३ रामामुखा—रमणीय स्त्रीमुखाला. अं-भोरुहा—हे कमला ! मधुपीं—भ्रमरावर; श्लेषानें मद्यप्यावर. वृ. शा. वि. प. १४ सुरद्रुमा—देववृक्षा ! पात्रापात्रविचार--योग्यायोग्यविचार. वृ. शा. वि. पृ० ७४ प. १५ संहरी—मारतों. व्याध--हे पारध्या ! नृ-पालभवनीं—राजगृहीं. खलवृन्द--दुष्टांचा समुदाय. इंगित--मनांतली गोष्ट. वृ. शा. वि. प. १६ कृष्ण अगरू--काळा चंदन. वृ. वसंत-तिलका. प. १७ निज...प्रहार—आपल्या गुरूचे ( उपदेशपर ) कठोर शब्द. साही--सहन करतो. यत्नानें--जोरानें. निकषिं--कसोटीवर. वृ. प्रहर्षिणी. प. १८ आजन्मसिद्ध--जन्मापासून तयार. करीं--किरणांनीं. कैरवांला--चंद्रविकासी कमलांना. वृ. व. ति. प. १९ पत्र...भार--पानें, फुलें आणि फलें यांचें ओझें. शीता...ही—थंडी, ऊन वगैरे सुद्धां. वेंचिशी--खर्च करितोस. उदारतिलका--उदार जनांमध्यें श्रेष्ठा! प्रणती—नमस्कार. वृ. व. ति. प. २० प्रलय...ची—प्रलय काळच्या अग्नीला आलिंगन देण्याची. पृ. ७५ भुजंगराया--सर्पश्रेष्ठ तक्षकाला ( भेटा-वयासी. ) वृ. व. ति. प. २१ क्षेत्रें—शेतें. शैलशृंगीं--डोंगराच्या शिखरावर. अम्भोदा--हे मेघा ! विवेक—विचारशक्ति. वृ. प्रहर्षिणी. प. २२ स्वोदरार्थ--आपल्या पोटाकरितां. परार्थ--दुसऱ्या करितां. समुद्र--हें. ' याची ' याचें कर्म. याची--मागतो. वृ. व. ति. प. २३ तुंगगंड--उंच आहे गंडस्थल ज्याचें असा. हें ' गजराज ' याचें वि-शेषण. कवल—घास. वृ. प्रहर्षिणी. [कर्ण व अर्जुन यांचें निकराचें युद्ध चाललें असतां कर्णाच्या रथाचें चाक जमिनींत रुतून बसलें. तें वर काढण्याकरितां कर्ण रथाखालीं उतरला असतां कृष्णाच्या सांगण्यावरून अर्जुनानें त्याचा वध केला. ही कथा पुढील पद्यांत वर्णिली आहे.] प. १ पुरुहूतदूत—मेघ. द्युमणि—सूर्य. पृ. ७६ प. २ द्विजशाप—कोणे एके वेळीं

कर्ण मृगयेस गेला असतां त्याच्या बाणानें एका ब्राह्मणाची गाय मेली. तेव्हां त्या ब्राह्मणानें ' ऐन आणीबाणीच्या प्रसंगीं युद्धांत पृथ्वी तुझ्या रथाचें चक्र गिळील,' असा शाप दिला होता. रामास्त्रा—परशुरामानें दिलेल्या अस्त्रा ! ( पृ. १६ प.५ ह्यांतील ' ब्राह्मण्यदंभें ' यावरील टीप पहा ). प० ३ रविजाला—कर्णाला. जाला—ज्याला, विषादाला. कवि—शहाणे लोक. प. विरस—भग्नोत्साह. निरसहाय—नेहमींचा मित्र. प. ५ दात्यातें—कर्णाला. परिरंभण—आलिंगन. शुचि...दा—शुद्ध शील हीच कोणी संपत्ति. प. ६ वृष—कर्ण. भूमि...चक्रासि—जमिनींत रुतलेल्या रथाच्या चाकाला. प. ८ सद्रसना—साधूंची जिव्हा. बंधुता—भाऊबंद. दायातें—विभागाला. प. ९ न साहे—सहन न होतील असे ( घाय ). प. उद्यत—तयार, तत्पर. रणश्रद्धा—लढण्याची हौस. अनंतर—नंतर, मग. हा—कर्ण. प. ११ भवचरणिं—शिवपदीं. प. १२ कातर—भितरा. भवसिंधुनायक—संसार हाच कोणी जो मोठा समुद्र तो. पृ.७७ प. १३ निधी—ठेव, सांठा. निरायुधमथन—शस्त्रविरहित असा जो मी त्याचा नाश. प. १६ शर्म—सुख. प. १८ नृपें— दुर्योधनानें. प १९ जतुगृहीं—लाखेच्या घरांत. वारणावर्ती—हस्तिनापुरांत. प. २१ कुचला—विषवृक्ष. परासु—विगतप्राण. प. २२ वांचविता—धर्म हा कर्ता. दीप्तगृहीं—जळत्या घरांत. तोय—पाणी- प. २३ दुर्भिक्ष—दुष्काळ. पृ. ७८ प. २४ वित्त...नीं—संपत्तिरूप दारूनें उन्मत्त झालेले तुह्मी त्यांनीं. प. २६ लज्जामुखें—लज्जेनें खालीं तोंड केलें आहे ज्यानें अशा कर्णानें. प. २७ वेंघे—चढे. सोडी...तें—सूनुच्या पातें शक्रासि मूर्छित कराया बाण सोडी असा अन्वय. इंद्राच्या वरानें कुंतीला अर्जुन झाला होता. प. २८ पर पुरुष—परमात्मा, कृष्ण. प. २० अनलसाचा—ज्याला आळस नाहीं अशाचा. ज्वाळामाली—ज्वाळा ह्याच माळा आहेत कंठांत ज्याच्या असा. अनळ—अग्नि. प. ३० धीरजनेंहि स्वधीर सोडिला—कर्णानें अर्जुनावर जो बाण सोडला तो इतका तीव्र होता कीं तो पाहून धीट लोक सुद्धां घाबरून गेले. प. ३१ गरधरवर—सर्पश्रेष्ठ. पवि—वज्र. स्मरारिसाग्रक—शिवाचा

बाण. वल्मीक—वारुळ. प. ३२ महेंद्रसुत—अर्जुन. प. ३३ दावाया—विक्रम दावाया, पराक्रम दाखविण्याला. भू......णीं—भूमींत रुतलेल्या रथाचें चाक वर काढण्यांत पृ. ७९ प. ३४ रसा—पृथ्वी प. ३५ रथ-रत्न—उत्तम रथ. प. ३६ प्रतरेषु—तीव्र बाण. रणदक्ष—युद्धकुशल. विपक्ष—शत्रु. ज्वरित—तप्त, विव्हल. प. ३८ हरा ... ण—शंकराच्या पाशुपतास्त्रासारिखा बाण. प. ४० विधीनें--योग्य रीतीनें. कीर्तन—आत्मस्तुति. हरि—इंद्र. तपन—सूर्य. प. ४१ कर्णान्त—आकर्ण. प. ४२ नयनाग्निकील—( तृतीय ) नेत्रांतील अग्नीची ज्वाळा. नीलग्रीव—शंकर. मीनकेतु—मदन. प. ४३ शाण......ण—सहाणेवर तीक्ष्ण केलेलें आहे मुख ज्याचें तो बाण. प्राण......च्या—जीवांना स्तुत्य असा जो सूर्य त्याच्या पुत्राच्या—कर्णाच्या. अमळ--शुद्ध. प. ४४ सास्रा-श्रु--इष्टमित्रांच्या अश्रूंसह. क्षोणीतळीं--पृथ्वीवर. सकुसुमवृष्टि--देवांनीं केलेल्या पुष्पवृष्टीसह. तनू--गळाली ह्या अध्याहृत क्रियापदाशीं संबंध. सधर्मभय--धर्माच्या मनांतील भितीसह. पृ. ८० प. ४५ दिवाकरीं--सूर्यामध्यें. गुरु...रि--आपल्या बापाच्या हृदयांतील शोकरूप अंधारावर.
वृ. शा. वि. प. १ विचारावली--विचारांची पंक्ति, रांग; अनेक विचार. प. २ द्युति--तेज, प्रभा. तारस्वरें--उंचस्वरानें. प. ४ धरा--पृथ्वी. पृ. ८१ प. ५ परी--प्रकार. प. ७ खेदोर्मि--दुःखाच्या लाटा. हेलावती--उंचंबळतात. पृ. ८२ प. १० मात--गोष्ट. श्रवणीं--कानावर प. १ रात्रिंचर--राक्षस. प. २ निकट--जवळ. रुधिर--रक्त. वराह--डुकर. महिष--रेडा. तूर्ण--सत्वर. प. ४ श्वासानिलरयपतित--श्वासाच्यावायुवेगें पडलेले. क्षणदाचर--राक्षस. तूलतुल्य--कापसासारखे. नासा...तें नाकांत जाण्याच्या व तेथून परत बाहेर येण्याच्या आयासानें. पृ. ८३ प. ५ इंद्रशत्रु--इंद्रजित ( रावणाचा मुलगा ) प. ७ रिचविले--ओतले. केशोन्मूलन--केश उपटणें. प. ८ काय--देह. प. १० मधु...र--मधाच्या व रक्ताच्या घागरी. प. ११ क्षुत्--क्षुधा. तृट्--तृषा. क्रव्याद--राक्षस. किंनिमित्त--कोणत्या कारणास्तव. प. १ अधिष्ठान--स्थान.

पृ. ८४ प. २ आक्षेप--शंका. प्रस्तावले--व्यर्थ होतात. प. ३ वेगडी वळे--गठडी वळते. तांतडी--घाई. प. ४ वस्तु--परब्रह्म. प. ८ सायुज्यमुक्ति--भक्त व परमेश्वर यांचा अभेद होणें ही स्थिति. पृ. ८५ प. १ दंडप्रसंग--शिक्षा करण्याची वेळ. रमावरानें--श्रीकृष्णानें. वृ. इंद्रवज्रा. प. २ ऱ्हद--डोह. वृ. स्वागता. प. ३ रसना-जिव्हा. भूमिधर--पर्वत. अधर--ओंठ. वृ स्वागता. प. ४ चपेटे--वेग. वृ. इं.. व. प. ५ भ्रमवी--फिरवी. वृ. द्रुतविलंबित. प. ६ अवसर--संधि. वृ. शिखरिणी. प. ७ बळातें--शक्तिला. वृ. स्वागता प. ८ अलक्षयातें--अतर्क्य अशा ( क्षयातें. ) वृ. उपजाति. पृ ८६ प. १० कैटभारी-- कृष्ण. नाट्य--नाच. वृ. रथोद्धता. प. ११ पांडवाचा सारथी--कृष्ण. तांडव--नृत्य. देवशिखामणीचा--देवश्रेष्ठ जो कृष्ण त्याचा. शिखामणि--डोक्यावरचा मणि. प १३. शिवादिक... नटनाचे--शंकराची तांडवाबद्दल प्रसिद्धि आहे. आदिनट--कृष्ण. प: १४ विलासमय--लीलापूर्ण, कृष्ण. प. १६ विश्वकाय--सर्व जग हाच ज्याचा देह असा कृष्ण. प. १७ वृंदारक--देव. मल्लिका...का--फुलांचीं नांवें. पृ ८७ प. २ प्रभंजन--मोठा वारा. लहरी--लाटा. वृ. पृथ्वी. प.३ मंदर--पर्वताचें नांव. मंथिलें--घुसळिलें. वृ. शा. वि. प. ४ कल्लोळ--तरंग. पृ. ८८ प. ६ रोषें--रागानें. महिष--टोणगे. वराह--डुक्कर. नादावती--नादानें भरून टाकतात. वृ. शा. वि. प.. ७ अधन्या--दुर्दैवी. वृ. शा. वि. प. १ वृ. स्रग्धरा. पांथ--प्रवासी जन. वृक्षराजी--वृक्षपंक्ति. वेंघोनि--चढून. पर्वताली--पर्वतांची रांग. रुचिर--सुंदर. पृ. ८९ प. ४ गव्हरीं--गुहेंत. कुहरीं--झाडाच्या ढोलींत. प. ५ सुमीं--फुलांत. प. ६ घटना--रचना. प. ७ मूर्त--मूर्तिमंत. गौरव--आदर. सुखसदन--सुखाचें स्थान. प. १ कृतकार्य--विजयी. प. ४ मधुवन--वनविशेष. प. ६ वीरादि--वीरादि रस. प. ७ तंद्री--तल्लीनता. पृ ९१ प. ९ भ्रमवितो--फिरवितो, भ्रमांत पाडतो. प. १. वृ. पृथ्वी. सदाश्रितपदा--सात्विक भक्त यांनीं आश्रय केलेलें आहे पद ज्याचें

अशा ( देवा ! )-सदा...सदा--महादेवाच्या मनाचें क्रीडास्थान अशा. कलिमलांतका--कलिकालसंबंधानें लागणारा जो मळ ( पातक ) त्यांचा नाश करणाऱ्या. कामदा--भक्तांचे मनोरथ पुरविणाऱ्या. वदान्य...गुरो--उदार जनांमध्यें फार श्रेष्ठ अशा. प्रश...मदा--शांत केला आहे असंख्य दुष्टांचा गर्व ज्यानें अशा. गदा...धरा--गदा, चक्र, शंख, खड्ग, ( नंदक नामक ) व कमल यांतें धारण करणाऱ्या ( देवा ! ). नमस्ते--तुला नमस्कार असो. प. २ व्रजावन--गोकुळाचें रक्षण. धरा--( गोवर्धन ) पर्वताला. सलील--सहज. तई--समुद्रमंथनप्रसंगीं. रदाग्रें--दंताच्या अग्रभागानें. सुदुर्धर--धरावयास अत्यंत कठीण. प.३नता...व्रत--शरणागतांचें रक्षण हाच धारण केला आहे नियम ज्यानें अशा भगवंता ! ज्वलन--अग्नि. प्रजव--अतिवेगवान्. पृ ९२ त्या वारणीं--गजेंद्रावर. सती--द्रौपदी. जय--अर्जुन. त्या रणीं--भीष्माशीं युद्ध करींत असतां प. ४ भव...का--आपल्या पदापासून झालेली मुलगी. आपगा--नदी (गंगा) प. ५ पटुत्व--कुशलत्व. जनी--जन्म. प. ६-दयाब्द--दयाघन. वळशील--उतरशील, वृष्टी करशील. उबगणें--कंटाळणें, त्रासणें. अनन्यगतिक--ज्यांना शरण जावयास इतर स्थान नाहीं ते. करुणार्णवा-दयासागरा! उमोप--पुष्कळ. द्रवा--दयेला. प. ७ शलभ--टोळ. भेक--बेडूक. प. ८ प्रशिथिलीं रदीं--फार शिथिल झालेल्या दातांनीं. वदारिका फळें--बोरें. पृ. ९३ प. ९ चिकित्सक--वैद्य. वहू...म--पुष्कळ लोकांचा रोगरूपी वृक्ष. स्वगद--आपले रोग. अत्ययाविना--नाशावांचून. सरुज--रोगी. प्रत्यया--विश्वासाला. प. १० क्षमी--क्षमाशील. भृगु...हती--भृगुनामक ऋषीचा लत्ताप्रहार. नम...ग्या--नवीन, अमृताप्रमाणें स्तुत्य. प. ११ सुरभि--कामधेनु. रासभी--गाढवी. अहीरास--गवळ्यास. सदंड--हातांत कांठी असणारे; संन्यासी; योगी. लाथळी--लाथा मारते. अदंड ज्याच्या हातांत काठी नाहीं तो किंवा ज्यानें चतुर्थाश्रमाची दीक्षा घेतली नाहीं असा संसारी मनुष्य. प. १२ शिशूंस--लहान मुलांस. जरठ--वृद्ध. दुहोत--दूध काढीत. प.

१३ गल्ल--गाल. दरें--शंखानें. ध्रुवानें परमेश्वराचें स्तवन करण्याविषयीं पोटांत अत्युत्कट इच्छा बाळगिली ह्मणून भगवंतांनीं त्याच्या गालाला आपला शंख लावून मोठ्या आदरानें त्याची ती आवड पूर्ण केली. करांबुज--करकमळ. मावरा--लक्ष्मीपते ! वराभयपरा--वर आणि अभय देण्याविषयीं समर्थ अशा ! प. १३ सामर--देवांसह. **पृ.** ९४ जग...न. तीनही जगांनीं नमस्कार करण्यास योग्य. प. १४ ध्रुव--निश्चयी. प. १६ छळी--नामपक्षीं छळणें ह्मणजे दुःख देणें; ईश्वरपक्षीं कपट करणें. अधोगति--दुर्गति; पक्षीं, पाताळगति. वामनावतारीं भक्तराजबळीशीं देवानें कपट करून त्यास कांहीं काळपर्यंत पाताळांत घातलें, या गोष्टीकडे या केकेंत कवीचें लक्ष आहे. प. १७ शरण्या--शरणागतवत्साला ! तमीं--अंधकारांत. प. १८ श्रीपदें--मंगलदायक पावलें. गुरूक्तिस--पित्याच्या ( दशरथाच्या ) वचनास. धरासुर--ब्राह्मण. प. १९ तर्यां--रावणानें सीता हरण केली तेव्हां तिला शोधण्याकरितां तुह्मीं आपल्या पावलांस श्रम दिले, यावरून सीतेविषयीं तुह्मांला दया आली असें दिसतें. पिशापरी--वेड्यासारखें. **पृ.**९५ प.२०अपथ्यरुचि--कुपथ्य करणारा. रुग्ण--रोगी. कटुक ओखदें--कडु औषधें. प. २१ असिला--तरवारीला. भागवत--भगवद्भक्त, साधुपुरुष. यशोरसीं--भगवंताच्या अपार गुणवर्णनरूप रसांत. न रंगती--निमग्न होत नाहींत. प. १ रुंडें--नरमस्तकें. सुरसारिद्वारि--गंगाजल. ललाट...ती--कपाळावरील डोळ्यांतील तेज. वरी--व्यापते. लघु केतक--केवड्याचें लहान पान. बालेंदुलेखा--बालचंद्राची कोर. नागनिबद्ध--सर्पवेष्टित. वृ. शा. वि. प. २ दुरित--पाप. भद्रसद्मा--हे कल्याणनिधे! खनि--खाण. वाग्रस--वाणीचा रस. वृ. स्रग्धरा, **पृ.**९६ प.३ सहज--अंगाची. प्रबोध--अक्कल. वृ. इंद्रवज्रा. प. ४ कातरें--भितऱ्यानें. प्रज्ञा...तें--बुद्धि आणि शौर्य ह्यांनीं युक्त. तो--गुण. भूतिप्रद--ऐश्वर्यप्रद. सदसत्काळीं--संपत्काळीं आणि विपत्काळीं. पद--स्थान, पाय. वृ. शा. वि. प. ५ शुनकातुल्य--कुत्र्याप्रमाणें. वृ. स्रग्धरा. प. ८ बीजो...तु--पृथ्वी.

प्रथम...जी--जल, आप. हवी...घे--तेज, अग्नि. विश्व...जी--वायु. ह्मण...शब्द--आकाश. होत्री...जी--यजमान, यष्टा. पृ. ९७ ज्यांच्या... तुह्मांला--चंद्रसूर्य. वृ. स्रग्धरा प. १ अभिनव--अपूर्व. प. २ नाना--अथवा. प. ३ शास्त्रजातां--सर्व शास्त्रांचें. वसौट--स्थान. अशेषांचें--सर्वांचें. प. ४ जिव्हार--जिव्हाळा, आनंद देणारी. प. ५ भारती--सरस्वती. आविष्करोनि-- प्रवेश करून. प. ६ रावो--राजा. गुरुवतीचा-- थोरपणाचा. आवो--डौल. प. ७. सच्छास्त्रिक--शास्त्रीय. महाबोध--आत्मबोध. कोंवळीक--कोमलता. पृ. ९८ प. ८ प्रमेय--तत्त्वार्थ. पोखलें--पुष्ट झालें. प. ९ रूढपण--श्रेष्ठत्त्व. प. १० कळाविदपण--कुशलता. अवलीळा--सहज. प. ११ नावेक--क्षणभर. ब्रिक--सामर्थ्य. बहुवस-पुष्कळ. प. १३. सुरवाडलें--शोभिवंत झालें. अर्थजात--सर्व विषय. प. १४ नागर--शहाणा. प. १५ नव्हाळी--शोभा. प. १६ माधवी--वसंतऋतु. आदिलापासोनि--पूर्वापेक्षां. अपाडें--विशेषतः प. १७ निवाड--वेगळें. पृ. ९९ प. १९ सानीव--नम्रता, लघुत्व. ( निषधदेशांचा राजा नल हा विहारार्थ वनांत गेला असतां तेथें त्याला एक कांचनवर्णाचा राजहंस सांपडला. राजानें त्याला धरल्यावर आपणाला सोडून देण्याविषयीं त्यानें राजाची विनंति केली. त्याप्रमाणें राजानें त्याला सोडून दिल्यानंतर त्याचे उपकार फेडावे म्हणून त्या हंसानें राजाला सांगितलें कीं ' विदर्भ देशाच्या भीमक राजाची दमयंती नांवाची अत्यंत सुंदर कन्या आहे, ती मी तुला नवरी मिळवून देतों. नंतर तो हंस विदर्भ देशाची राजधानी जें कुंडिनपूर तेथील एका विलासवनांत गेला. त्या ठिकाणीं दमयंती आपल्या सख्यांसह खेळत होती. हंसानें मोठ्या कुशलतेनें तिला आपल्या मैत्रिणींपासून बरेंच दूर नेलें व मग तिच्या पाशीं त्यानें नलाचें वर्णन केलें. ही कथा पुढील पद्यांत वर्णिली आहे.) प. १ खग--हंस. गोपुर--शहरच्या किंवा देवळाच्या किंवा राजवाड्याच्या दरवाजावर बांधलेली उंच इमारत. गवाक्ष--झरोका. जवशाली--वेगवान्. चंद्रशाला--सर्वांहून उंच माडी. विततशाला--विस्तीर्ण आ-

हेत वाडे जीमध्यें अशी. वृ. मालिनी प. २ निडारीं—दृष्टींत. सांद्र—दाट, निबिड. साई—झाडी. वृ. व. ति. प.३ परिवेष—खळें. वृ. व. ति. पृ. १०० प. ४ धरेला—पृथ्वीला. वृ. व. ति. प. ५ कवयिता कवी. वृ. शिखरिणी. प. ६ तैं...हे--दमयंती पहिलीच हंसगमना—म्हणजे हंसा प्रमाणें हळू चालणारी होती. ती पुनः हंस धरण्याकारितां तशी झाली म्हणजे श्लेषानें हंसाकडे गमन करणारी झाली. वृ. व. ति. प. ७ इंद्रदंती—ऐरावत. वृ. व. ति. पृ. १०१. प.११ सुतनु—फार लहान. वृ. व. ति. पृ.१०२ प. १४ छाया...ळी—तिला दुसरी सोबतीला तिचीच छाया होती आणि तिसरी वनपांक्ति होती. सारांश तेथें तिच्या शिवाय दुसरें कोणी मनुष्य नव्हतें. वृ. व. ति. प. १ वृ. शा. वि. सिकता—वाळू. प. २ निदेश—आज्ञा. प. ३ मधुमक्षिका—मधमाशी. प. १ सर...री. ब्रह्मकुमारी. मूक—मुका. वाचस्पती—बृहस्पती. प. २ मराळिका—हंसी. प. ३ विरांचि—ब्रह्मदेव. जोहरी--रत्नपारखी. शक्र--इंद्र. पृ० १०४ प. ५ सुढाळ--तेजस्वी. प. ६ मुक्तलग--मोत्यें लावलेलें. प. ७ ईशान--शिव. मीनकेतन—मदन. प. ९ अर्कसुमन--सूर्यफूल. पालवीं—पदरानें. प. १० उर्वी--पृथ्वी. प. १२ कुहू--अमावास्या. रोहिणिवर--चंद्र. प. १ रूपचतुष्टय--श्रीविष्णूनेंच राम लक्ष्मण भरत शत्रुघ्न हीं चार मनुष्यरूपें धारण केलीं. प. ३ चंद्र..र--चांदण्याप्रमाणें शुभ्र. प. ४ पीयूष..रा--अमृताचा गर्व हरण करण्या इतकें माधुर्य ज्यांत आहे अशा ( पदा). दीन...मा—दीनरक्षणसमर्था ( पदा ). प. ५ नीरज—कमल. प. ६ स्फटिकगृहांत राम क्रीडा करीत असतां त्याचीं अनेक प्रतिबिंबें पडलीं तीं पाहून कौसल्येला आपणास अनेक पुत्ररत्नें आहेत असें वाटून परमानंद झाला. प० ७ धौतामल—अत्यंत शुभ्र. प. ८ दिविषज्जन--देव. प. ९ नाक--स्वर्ग. प. १० सभाजन—पूजन. पक्ष्मतारक—पापण्या व बुबुळें. पृ. १०६ प.११ चतुर्वर्ग--धर्म, अर्थ, काम, मोक्ष हे चार पुरुषार्थ.प.१२ द्वंद्व--जोडी. या प्रकरणाचें वृत्त वंशस्थ. प. १ अनर्घ्य—अमोलिक. ज्वाला-

नल—दवाग्नि. तडित्--वीज. वसती--गृहें. सरित्पति--समुद्र. दुर्ग--किल्ला. हारी--ओळी. वृ. शिखरिणी. प. २ वज्रप्रभा—हिऱ्याचें तेज. पौंवळी—वाड्याची भिंत. वृ. शा. वि. प. ३ दिव्य..रें--सुंदर मालांनीं युक्त उदरें ( मध्यभाग ) ज्यांचीं अशीं ( मंदिरें. ) वृ. स्रग्विणी. पृ. १०७ प. ४ वैश्रवण—कुबेर. अकलंक—निष्पाप. वृ. स्वागता. प. ५ सुरवाडें--श्रेष्ठ. पवमानें--वायूनें. पवमान--वेदमंत्रविशेष. वृ. स्वागता. प. ६ भैरव--शिवाच्या आठ अवतारांपैकीं प्रत्येकास भैरव अशी संज्ञा आहे. नवनिधी--कुबेराचे नऊ निधी. वृ.शा. वि. प. ५ त्रिंशत्--तीस. रत्नाकर--सागर. विश्वकर्मा--देवांचा सुतार. सप्तानि--सत्तर. आवर्त--घेरा. वृ. शा. वि. प. ८ चतुरस्र--चवकोनी. गोपुरें--शहराचे दरवाजे. वृ. स्वागता. प. ९ मुमुक्षां--मोक्षप्राप्तीची इच्छा करणाऱ्यांना. वृ. उपेंद्रवज्रा. प. १० तडितापडी--भिक्षा मागून पोट भरणारा. जटिल--जटाधारी. दिगंबर--नग्न. वृ. पृथ्वी. प. ११ सप्त..रि--अयोध्या, मथुरा माया, काशी, कांची, अवंतिका व द्वारका. उन्नता—श्रेष्ठ. वृ. रथोद्धता. पृ. १०८ प. १४ नाकपाळी—स्वर्गाचें रक्षण करणारा, इंद्र. वृ. भुजंगप्रयात. प. १५ गणक—जोशी. मंत्री—सर्पादिकांचें विष उतरावयाचा मंत्र जाणतो तो. धात्री—पृथ्वी. आर्जिती—मिळवितात. वृ. स्रग्धरा. प. १६ चतुष्पथ—चवाठे. वेदिका—उंच जागा. सरणि—मोठे मार्ग. पुरौकसां—नगरवासी लोकांस. वृ. पृथ्वी. प. १ ही--गंगानदी. प. २ तिला--दृष्टीला. वृ. व. ति. पृ. ११० प. ११ उदंड--फार. वृ. मंदाक्रान्ता. प. १२ यूथ—कळप. व्याघ्रप्रवर--मोठे वाघ. पृ. १११ कोटरीं--ढोलींत. ऋक्ष—आस्वल. वृ. मं. क्रां. प. १३ अनूप—दलदल. वृ. मं. क्रां. प. १६ कासार—तळें. वृ. मं. क्रां. पृ. ११२ प. २० परभृत—कोकिल. वृ. मं. क्रां. प. २१ कंदरा—गुहा. स्तानित--मेघगर्जना. वृ. मं. क्रां. प. २२ हिमानी--सांठलेलें बर्फ. हरित--हिरवी. वृ. मं. क्रां. प. २३ वनच्छगल--रानटी बोकड. पृ. ११३. आत्मजातुल्य—मुलीप्रमाणें. वृ. मं. क्रां. प. २४ तिंतिडिका—चिंच. वृ. शां. वि. प. २५ आवास--वसति. उद्भिदां—

झाडांना वृ. शा. वि. प. २७ पातविशीर्ण—पडण्यानें छिन्नभिन्न झालेलीं. वृ. शा. वि. प. २८ स्वर्गा...री—स्वर्गाला चढून जाण्याकरितां निर्माण केलेल्या मोठ्या जिन्याप्रमाणें. वृ. शा. वि. पृ. ११४ प. २९ क्षीरविपांडु--दुधाप्रमाणें अति शुभ्र. प्रावारवस्त्र--उत्तरीयवस्त्र. वृ. शा. वि. प. ३१ आदिम--आधींचा वृ. शा. वि. [ कथाभाग—राम वनांत जातांच त्याच्या वियोगानें दशरथ मरण पावला. तेव्हां भरत आपल्या मामाच्या गांवीं होता, तेथून त्यास वसिष्ठ ऋषीनें आणविलें. राम वनवासास जाण्याला व दशरथ मरण्याला आपली आई कैकेयी कारण झाली असें भरतास समजतांच त्याला फार राग आला व त्यानें आईची फार निर्भर्त्सना केली. नंतर बापाची क्रिया संपल्यावर तो रामाला वनांतून परत आणावें ह्मणून त्याजकडे गेला. परंतु मी वनांत जावें व तूं राज्य चालवावें अशी पित्याची आज्ञा आहे ती आपण पाळली पाहिजे असें रामानें सांगून त्यास परत पाठविलें. नंतर भरत रामाच्या पादुका घेऊन अयोध्येजवळ नंदिग्रामीं आला. ही कथा पुढें वर्णिली आहे. ] प. १ जननि टाकुनि ( जो ) रामपदीं निवे तो सुकृति हे मति समजोनि घे--अत्यंत प्रिय जी आई तिलाही सोडून देऊन जो ईश्वरास शरण जाऊन त्याची सेवा करितो तोच धन्य होय, असा उपदेश घे असें वाचकास कवि ह्मणतो. वृ. द्रु. वि. प.२ मातुलग्रामवासी--मामाच्या गांवीं राहिलेला. वृ. मालिनी पृ. ११५ प.३. गतधवा--विधवा. मृतसम--मेल्याप्रमाणें. वृ--मालिनी प. ४ महामतीचा—थोर अंतःकरणाचा जो भरत त्याचा. वृ. उपजाति प. ५ जडस्वरूप--अंतःकरणशून्य. वृ. उ. जा. प ६ आधीत्रास. वृ. उ. जा. प. ७ देखत—पाहतां पाहतां वृ. उ. जा. प. ९ सानुरागें--आवडीनें वृ. शालिनी. पृ. ११६ प. ११ न देखोंशके--'ती' हा अध्याहृत कर्ता. वृ. भुजंगप्रयात. प. १३ जसि—जेव्हां. कटकटा—हायहाय. वृ. स्वागता. प. १४ वैखरी—वाणी. वृ. द्रु. वि. प. १६ प्रेमउल्हास—प्रेमभर. वृ. उ. जा. प. १७ राम...त. रामाच्या चर-

णाची आपणाला प्राप्ति करून घेण्याविषयीं उत्सुक. वृ. स्वागती प. १९मृगांक--चंद्र. वृ.भु. प्र.पृ.११७प.२३ रघुस...रा--रामाच्या आंथरुणास. वृ. व. ति. प. २६ असोसी--उत्कट इच्छा. वृ. उ. जा. प. २८ रामचंद्र...द्रा--रामाच्या पदकमलांचा ठसा. वृ. स्वागता. प. २९ तनु....ती--भरताच्या शरीरावर आनंदानें रोमांच उभे राहिले. प्रभु...र्जी--रामाच्या पदकमलाच्या धुळींत. वृ. द्रु. वि. पृ. ११८ प. ३० मुकुटमंडण--मुकुटास शोभविणारे. जिवाचे भाव त्यजुनि ह्मणंजे देहभान सोडून. वृ. व. ति. प. ३१ विरिंचि--ब्रह्मदेव. कांहीं--अवर्णनीय, वृत्त मालिनी. प. ३२ वामअंकगत--डाव्या मांडीवर बसलेली. वाम....ता--रामाच्या डाव्या हातास लागून बसलेली. वृ. स्वागता. प. ३३ विदेही--वैराग्ययुक्त, पुंगव--श्रेष्ठ. वृ--इंद्रवज्रा. प. ३५ सद्म--घर. पद्मा--लक्ष्मी. क्षेम--आलिंगन. सुख. वृ. भु. प्र. पृ. ११९ प. ३८ सूपरामा--मरणाला. वृ. उपेंद्रवज्रा. प. ४२ हटात--आग्रहांत. वृ. उ. जा. प. ४४ अशेषें--सर्व प्रकारें. एवं--ह्मणून. वृ. शालिनी. पृ. १२० प. ४८ आत्मा--सर्व व्यापक ईश्वर. वृ. व. ति. प. ५० द्विसप्त--चवदा. वृ. व. ति. प. ५२ जडित--रत्नखचित. वृत्त स्वागता प. २ ज्वलनानन--अग्नीचें मुख. पावक--अग्नि--वृ. शा.वि. पृ. १२२ प. ८ कसा लागणें--परीक्षा होणें. वृ. शा. वि. पृ. १२३ प. ११ गुणधी--गुणनिधी. वृ. मंदाक्रांता. प. १२ मिती--गणना. वैश्वानरीं--अग्नींत. वृ. शा. वि. प. १३ धर्मावना--धर्मरक्षणासाठीं. क्षाळी--ढाळी. दिल्लीप--दिल्लीपती. वृ. शा. वि. प. १४ योषिद्रत्न--उत्तम स्त्री. सृजीन--उत्पन्न करीन. वृ. शा. वि. प. १५ पुण्यखनी--पुण्यखाणी. वृ. शा. वि. प. १६ परत्रीं--परलोकीं. वृ. शा. वि. पृ. १२४ प. १७ काय--देह वृ. शा. वि. प. १ शार्ङ्गधर--परमेश्वर. लवलाहीं--लवकर. पृ.१२५ प. १३ हृषीकेशी--परमेश्वर.पृ.१२६वेत्र--वेत.प.२६ पहुडले--पडले.प.१ सती--त्या साध्वी.प. २अजातरिपुभार्या--धर्मस्त्री--द्रौपदी.ननांदा--नणंद. प.५हारि--चित्तहारी

प. ७ दुखणी--दुमजली. धरानखेंदुखणी--( दुःखामुळें ) नखांनीं भुई उकरी. प. ८ दुहिता--मुलगी. प. ९ श्रुत्यर्पण--कान देणें, ऐकणें. पृ. १२८ प. ११ मोहरोगवैद्यातें--श्रीकृष्णाला. चैद्यातें--शिशुपाळाला. प. १२ मूळ--बोलावणें. क्ष्वेड--विष. प. १९ तद्व...त--त्याच्या सैन्यरूपी सागरांत. आधींत--चिंतेंत. प. २० खळदर्पघ्न--दुष्टांचा गर्व हरण करणारा--कृष्ण. नत...द--भक्तरूपी चातकांना दयामृत देणारा मेघ. कृष्ण. प. २१ गरळ--विष. हरिद्रा--हळद. सुकृपण--फार कृपण. शुष्कोपचरण--कोरडे उपचार. पृ. १२९ प. २२ ध्वजाचि झाल्यें--माडीवर गेलें. पुरेक्षणच्छद्में--शहर पाहण्याच्या निमित्तानें. हरि... खा--कृपणाच्या वाटेकडे. प. २३ यष्टी--काठी, आधार. प. २६ करि--कृपा करी. स्त्रियांचा डावा-डोळा किंवा डावा बाहु ह्याचें स्फुरण शुभसूचक मानतात. प. २७ माज--कंबर. जाण्यासाठीं प्राणांनीं कंबर बांधली होती तीही सोडली. प. ३१ पालविलें--बोलविलें. माझ्या हृदयांतून कृष्णागमनानंदानें चिंतेला हांकून दिलें तों तिला चैद्याच्या हृदयांत स्थान मिळालें. पृ. १३. प. ३७ महा--आनंदाला प. ३८ वायसाराति--घुबड. सारा--उत्तम. प. ४० आलि--मैत्रीण. प. ४२ मुक्ता--मोतीं. पृ. १३१ श्वगण--कुत्र्यांचा समूह. अबळखळ--असमर्थ असे दुष्ट. [ पुढील ओंव्यांत मगध देशाचा राजा जरासंध व भीमसेन ह्यांच्या भुजयुद्धाचें वर्णन आहे. ] प. १ करटी--हत्ती. प. २ घोटूं--पिण्यासाठीं. तगटे--धांवे. प. ३ जानुमूळें--मांड्या. बाहुमूळें--दंड. शैलमौळें--पर्वतशिखरें. थरकति--कांपती. प. ४ सूदला--घातला. प. ६ झिंजाडोनी--आंसडून. प. ७ ताळ--ताडवृक्ष. पृ. १३२. प. ८ हुमणी--बुक्की. प. ९ तवकें--रागाच्या आवेशानें. भडके--लाल. असृद्धाचे--रक्ताचे. प. १० दशनांतें--दांतांना. प. ११ कूर्परप्रहार--कोंपरखळया. प. १२ कांतियाकरवाळें--पोलादी तरवारी. प. १३ वृंदारक--देव प. १५ संकेत--खूण. प. १६ जरेनें--जरा नांवाच्या राक्षसीनें. उखळीं--सोडीव. प. १७ आन--दुसरा. प. १८ कांपिला--धरला. गाढा--घट्ट. भवंडा--

फेरा. पृ. १३३ प. १९मौळी--मस्तक. प. २१ उतटिला--चिरिला. प. १ सुतेला--मुलीला. वृ. इं. व. प. २नगां--अलंकारांस. वृ. शा.वि. प. ३ करयुगीं--दोन हातांत. मुद्रा--आंगठ्या. पृ. १३४ मेखला--कमरपट्टा. कंचुकी--चोळी. पट्ट--पाटाव, उंचीवस्त्र. वृ. शा. वि. प. ४ मुकुर--आरसा. वृ. व. ति. प. ५ विधु--चंद्र. ध्वांत--अंधार. वृ.इं. व. प. ६ झष--मत्स्य. वृ. शा. वि. प. ७ मृगपती--सिंह. सिंहाची कंबर फार बारीक आसते. वृ. द्रु. वि. प. ९ कुसुमस्रक्--पुष्पमाला. वृ. मालिनी. पृ. १३५ प. १ जिष्णूग्रतपें--अर्जुनाच्या कडकडीत तपश्चर्येनें. तप...न--तपश्चर्यारूपी लक्ष्मीच्या क्रीडेचें स्थान. प. २किरातत्वाच्छादन--किराताचा ( पारध्याचा ) वेष हेंच आच्छादन. मूर्तिसंपदेवरी--शरीररूप संपत्तीवर.सानुकंप--सदय. प. ४ हननाश--मारण्याची इच्छा आहे ज्याला तो. मूक--ह्या नांवाचा. प. ५ भव--शंकर. प. ६ खरतर--अतिशय तीक्ष्ण. प. ७ खगपति--गरुड. प. ८ मत्परिग्रह--माझी शिंकार. किरितें--डुकराला. वज्रपाणी--इंद्र प. १० किरिला--डुकराला. पृ. १३६ प. १३ विमद--गर्वरहित. प. १४ गरळ--विष. ऱ्हद--डोह. रामासि--परशुरामाला. प. १६ कवल--घांस. विदारितेभा--फाडून टाकला आहे (हत्ती ज्यानें अशा सिंहाला. ) प. १७ कोदंडें--( गांडीव ) धनुष्यानें. प. १८ कामातें--काम आदिकरून शत्रूंच्या गर्वरूपी काळोखाचा सूर्याप्रमाणें नाश करणारा जो किरात त्यानें. प. १९ भक्तभवा--भक्ताच्या संसारा ! करवाळ--तरवार. प. २० वासवि--अर्जुन प. २१ चिबुक--हनवटी. पृ. १३७ प. २२ शोणित--रक्त. प. २३ नाकी--देव. पिनाकी--शंकर. प. २४ माल्य--पुष्प. पुरःस्थ--पुढें असणारा. प. २५ अघ--पाप. पंक--पाप. प.२७ धवळों--उज्ज्वल करो. प.१जलधि...नालक्ष्मीच्या नयनकमलाच्या आश्रया ! भवज--संसारापासून झालेला. वृ. पृथ्वी. पृ. १३८.प.२ चिंता ... ता. मनाच्या आणि शरीराच्या रोगांनीं जर्जर झालेल्या. हें ' नरा ' यांचे विशेषण. वृ. शा. वि. प. ३ वितरी--देते. नाम...वीं--रस जाणणारी ती रसना असा नांवाचा सार्थ-

पणा. वृ. मं. क्रां. प. ४ सौन्दर्यखाणी—अत्यत सुंदर. वृ. मं. क्रा. प. ५ अलि—भृंगे. करिवर—गजश्रेष्ठ. वृ. शिखरिणी. प. ६जयाचें—ज्या कवीन्द्राचे. वाग्देवी—सरस्वती. ललितवचनार्नी—सुंदर वचनांनीं. पशुपती—शिव. वृ. शिखरिणी. [ पुढील ओंव्यांत विराट रजाचा मेहुणा कीचक व भीमसेन ह्यांच्या भुजयुद्धाचें वर्णन आहे. ] **पृ.** १३९ प. १ हांसडिला—जोरानें ओढला. प. ४अंतरीं—घरांत. प. ५ निघात—ठोंसे प. ६ मित्रावर्णासारिखा—मैत्रावर्णासारिखा असें पाहिजे. मैत्रावर्ण—अगस्त्यऋषी. प. ७ तवकें—सामर्थ्यानें. असुर—हिरण्यकशिपु. प. ९ शरभ पक्षि—हा सिंहास (- मृगेंद्रास ) मारितो अशी पौराणिक समजूत आहे. मूळवैरी—जन्माचे वैरी. प. १० महामाया—भवानी. अखया—रावणाचा मुलगा. **पृ.**१४० प. ११कंडन—मारामारी. प. १२ आंगवणें—आंगच्या शक्तीनें. शेखीं—शेवटीं. प. १३ गाढे—हे दोघे युद्धपंडित. इडेपाडे—वीरश्रीनें. प. १८ निवटूनि—नाहींसें करून. **पृ.** १४ प.२ प्रसून—पुष्प. प.३ दिनमणीची—सूर्याची. सुमन—फूल. मुग्ध—वेडें प. ५ माल्य—फूल. प. ६ सृजिलें—उत्पन्न केलें. प. ९ सार—ग्राह्यांश, चांगला भाग. **पृ.** १४२वृ. वियोगिनी. प. १ शशि...रा—चंद्रकोरेनें शोभणारा. प. २ शशि...ना—चंद्रकोर हीच ज्याच्या शेंडीचें भूषण असा. प. ३ तम—अज्ञान. हृदयांवरिं—हृदयाकाशांत. प. ४ दिठि—दृष्टि. भवा—शंकरा! प. ५ पय—दूध. प. ६ शिव—मंगलस्वरूप. विषमेक्षणीं—तीन आहेत नेत्र ज्याला तो. प. ७ सराग—प्रीतियुक्त. प. १० अवलोकें—दृष्टीनें. **पृ.** १४३ प.११ कृति—धन्य. तया—त्या नयनानें. प.१२ भूतपा-हे भूतपते शंकरा ! प. १५ सर्वग—सर्वव्यापी. शर्व—शंकर. शमद—कल्याणकारक. प. १६ नती—नमस्कार. **पृ.** १४४ प. १७ उडुगण नक्षत्रसमूह. वृ. शिखरिणी. प. २ युगुल—द्वय, जोडी. वृ. शि. प. ३ तुरी—घोटा. नेमा—माग. प. ५ आतुर—रोगी. वृ. भुजंगप्रयात. प. ७ राज...भू—महाराष्ट्राचा राजा न्यायी आहे असें सर्वांकडून म्हणविलें. **पृ.**१४५सुधाकर—चंद्र. वृ. शा. वि.**पृ.**१४६

वृ.शा.वि.प. ३ संघ—समुदाय. प. ५ स्तुत्यंबरें—स्तुतिरूप वस्त्रें. [ भीम व दुर्योधन यांचें गदायुद्ध होऊन त्यांत भीमानें दुर्योधनाच्या मांड्या मोडून त्याला जमिनीवर पाडलें व मस्तकावर लत्ताप्रहार केला. अशा स्थितींत त्या मानी वीरानें जे दुःखोद्गार काढले त्यांचें वर्णन पंतांनीं पुढील आर्यांत मोठ्या बहारीनें केलें आहे.] प. १ भग्नोरू—मोडल्या आहेत ज्याच्या मांड्या तो. पांडवाहित—पांडवांचा शत्रु. ( दुर्योधन. ) प. २ याद—जलचर. प. ३ अयुतद्विपबळ—दहा हजार हत्तींचें अवसान. पर...टु—शेंकडों शत्रूंना आंवरण्यास समर्थ. नियमी—बांधी.पृ. १४७. प. ६ नाथ—सामर्थ्यवान्. प. ७ आनी—युद्ध. प.८समय—युद्धांतील नियम. मदू...न—माझ्या दोन मांड्या मोडणें. प. १० चित्र—आश्चर्यकारक. अधा...नें—अन्यायानें वागणाऱ्याच्या गर्वानें. प. १३ परप्रेष्य—शत्रूचा चाकर. अरि...न—शत्रूंनीं राज्यपद हरण केलेल्याचें जिणें. प. १४ सुपुरुषपुंगव चांगल्या पुरुषांमध्यें श्रेष्ठ. पृ. १४८ प. १५ मनुपूत—मंत्रांनीं पवित्र केलेली. मख...डीं—यज्ञांतील अग्निकुंडांत. प. १९ प्रांतविरस—शेवटीं कंटाळवाणें. प. २१स्वसा—बहीण. परस्व—दुसऱ्याचें धन. प. २२ नाहीं होईल—नाहींशी होईल, प्राणत्याग करील. पृथुलोचना—मोठे आहेत डोळे जीचे अशी. प्रसू—माता. प्रसूनांहीं—फुलांनीं. प. २३ वाग्विशारद—बोलण्यांत कुशल. चार्वाक—नास्तिकमताभिमानी तत्त्ववेत्ता. अपचिति—पापनिवृत्ति. पृ. १४९ प. २५ धरा—पृथ्वी. रव—आवाज. प. १ वृत्त—वसंततिलका. दूषणान्वित—विरोधपक्षीं दोषयुक्त; परिहारपक्षीं दूषण राक्षसाच्या नांवानें युक्त. शून्य—रहित. दूषणांनीं—दोषांनीं. खरांकित—विरोधपक्षीं कठोरवर्णांनीं युक्त; परिहारपक्षीं खरराक्षसाच्या नांवानें युक्त. नति—नमस्कार. याची—कवीची. प. २ गिरा—वाणी. भुवनैकसार—भुवनांचा मुख्य सारभूत अंश. तदंक—भारत आहे चिन्ह जीचें अशी. भारतीनें—वाणीनें प. ३ अकिंचनांत—दरिद्री लोकांत. प. ४ भागी...ग—गंगेचे पवित्र तरंग. परिभूत—तिरस्कृत. तर्यां—तरंगांना. पृ. १५० चरणरेणु—पायधूळ. प. ५ वामन— खुजा.

अवा...णी—मोठ्या कीर्तीची खाण. वाम—प्रतिकूल. सुधा...त—अमृत आणि मध यांनीं जिची स्तुति केली आहे अशी वाणी पृ.१५१वृ.शा.वि. प.४संजीविनी—चैतन्य उत्पन्न करणारी विद्या. चारुता—सौंदर्य. प६सोय-रैस—ही राजारामाची आई. हिला संभाजीनें भिंतींत चिणून मारलें. [ सुदामा नांवाचा श्रीकृष्णाचा एक बालमित्र होता. हा अत्यंत दरिद्री होता. एके दिवशीं बायकोनें फार आग्रह केल्यामुळें तो कृष्णाला भेटण्याकरितां द्वारकेला गेला. कृष्णानें त्याचें फार उत्तम रीतीनें स्वागत केलें. व त्याला न कळत त्याचा गांव सुवर्णाचा करून टाकिला. एक दिवस द्वारकेंत राहून दुसरे दिवशीं सुदामा आपल्या गांवीं परत जाण्याकरितां निघाला. गांवाजवळ येतो तों त्या ठिकाणीं एक टोलेजंग शहर वसलेलें पाहून त्याला अत्यंत विस्मय वाटला. त्या वेळेच्या त्याच्या मनाच्या स्थितीचें वर्णन पुढील पद्यांत केलें आहे. ] पृ. १५३ प. २ चिर—वस्त्र. वृ. व. ति. प. ३ याचा—याचना करा. निरामयाचा—श्रीकृष्णाचा. हगंबुजाला—नयनकमलाला. वृ. व. ति. प. ४ योषा—स्त्रिया. वृ. मालिनी. प. ५ भेरी—नौबती. तुरें—वाद्यें. वृ. शा. वि. प. ६ इंदिरालय—लक्ष्मीस्थान. मयूख—किरण. भोगागारें—विलासमंदिरें. सांकडें - संकट. वृ. शा. वि. पृ. १५४ प. ७ कुचैल—सुदामा. कांतास—पतीस. कुटि...ला—केशांचा अग्रभाग वांकडा ह्मणजे कुरळ आहे जीचा अशी. कांतार—अरण्य. वृ. व. ति. प. ८ कष्टा—कष्टास. तराणी—तराणा ह्मणून गायनांत एक प्रकार आहे. शिराणी—आशा, आवड. वृ. व. ति. प. ९ राजीवनेत्र—कमलनेत्र. पृथुकाचुरा—पोह्यांचा चूर. वृ. व. ति. प. १२ सुचैल—उत्तम आहे वस्त्र ज्याचें असा. धाला—तृप्त झाला. पृ. १५५ प. १ सपृतना—सैन्यासह. वृ. शा. वि. प. ४रिघोनी—जाऊन वृ. इं. व. पृ. १५६ प. १ वायुविभावसू—वायु व अग्नि. कर्दम—चिखल. स्रवंती—नद्या. वृ. शा. वि. प. २ प्रकर—समूह. वृ. पृथ्वी. पृ. १५७ प. ५ सौमित्री—लक्ष्मण. पदाति—पायदळ. द्विजसम—पक्ष्यांप्रमाणें. वृ. स्रग्धरा. प. ६ शिखिशिखा—अग्निज्वाला. प. ७ श्रोत्रीं—का-

नांत. क्ष्माजासुत--सीतापुत्र. चर्म--ढाल. वृ.शा. वि. प. ८ पिशित-भुक्--मांस खाणारे. पललक्ष्माधर--मांसाचे पर्वत.वृ. पृथ्वी. पृ. १५८ प. १ असारें--क्षणभंगुर. वृत्त--शालिनी प. २ हनन--ठार मारणें. रती--आवड. वृ. शा. वि. प. ६ बुद्बुद--बुडबुडा. तपति--प्रकाशतात. पृ. १५९ प. ९ तदन्वय--त्याचा वंश. सामंत--प्रधान. वनिताशाला--जनानखाना. वृ. शा. वि. प. १ वृत्त पृथ्वी. सुमतरु--पुष्पवृक्ष. प. २ विटप--वृक्ष. पृ. १६० प. ४ आराम--बाग. प. ५ प्रणय--प्रेम. प. ७ विभव--वैभव. आसवें--अश्रू. पृ. १६१ प. ८ वल्लरी-लता. ( पुढील पद्यांत सुदामा कृष्णाची व आपली भेट कशी झाली तो प्रकार आपल्या पत्नीला सांगत आहे. ) प. १ पुण्यश्लोक...णांत-पवित्र आहे कीर्ति ज्याची अशा कृष्णाच्या घराच्या आंगणांत. वृ. शा. वि. पृ. १६२ प. २ स्थान...धु--योग्य ठिकाणापासून ढळलेलीं आहेत अंगवस्त्र, केश, मुकुट, नेसण्याचें वस्त्र आणि माला हीं ज्याच्या असा करुणेचा सागर कृष्ण. वृ. स्रग्धरा. प. ३ अगरु--चंदन. मृगमद--कस्तुरी. स्रक्--माळा. वृ. शा. वि. प. ४ संगतातें--भेटीला. वृ. शालिनी. प. ५ तालवृंतक--ताडपत्राचा पंखा. शैब्या--रुक्मिणी. वरोरु--सुंदर आहेत मांड्या ज्यांच्या अशा ( स्त्रिया. ) वृ. शा. वि. प. ६ क्षाम--रोडका. कुचैल--फाटकीं वस्त्रें ज्याच्या आंगावर आहेत असा. हलभृत्पूजार्ह--बलरामाला योग्य जी पूजा त्या पुजेला योग्य. वृ. शा. वि. प. ७ गर्हित--लोकांकडून उपहास पावलेला. दुर्गत--दरिद्री. सीरायुध--बलराम. वृ. शा. वि. पृ. १६३ प. ८ नैकें--पुष्कळ. वृ. स्रग्धरा. प. २ उदंड--पुष्कळ. प. ४ ऋक्ष--आस्वल. प. ७ विदेहनंदिनी--जनककन्या, सीता. प. ६ सुमनहार--पुष्पमाला. पृ. १६४ प. ११ अंबर--आकाश. रिचवती--पडती. पृ. १६५ प. २१ कोदंडपाणी--धनुष्य आहे हातांत ज्याच्या तो राम. पृ. १६६ वृत्त पृथ्वी. प. ३ पदाब्जरज--चरणकमलाची धूळ. विपिनिं--अरण्यांत. निजायास--आपले श्रम. प. ४ मृकंडु...नीं--मार्कंडेयाच्या रक्षणाला. प. ५ व्रजीं--

गोकुळांत. प. ७ मृगघ्न—पारधी. क्षीरधी—क्षीरसमुद्र. स्थावर—स्थि
पृ. १६७ प. ८ मरुत्सुत—मारुति. प. ९ नति—नमस्कार. बाहितां
बोलावितां. सपत्नयुत—शत्रूसहित. प. १० स्वरददष्ट—आपल्या दांत
नीं चावलेलीं. प.१२हेरली—पाहिली.पृ.१६८ प.२चवाई—चवरंग. प
क्षीरोदक—उत्तम रेशमी वस्त्र. जीमूत—मेघ. पृ.१६९ प.१२ रातोत्पलें
रक्तकमळें. संवाहन्निता—मर्दितां. प. १६ हेळा—लीलेनें. प. १९ प्रव
ळवर्णी—पोंवळ्यासारखे लाल. प. २१ जानुद्वय—दोन मांड्या. पृ. १७
प. २४ सुढाळ—तेजस्वी. प. २५ वैराणियाचा—पांघरावयाचा. प. ३
वैजयंती—विष्णूची माळ. पृ. १७१ प. ३४ दशन—दांत. पृ. १७
प. १ विपदोक—विपत्तीचें स्थान. प. २ टेंकेला—धैर्याला. वीराभिन
शूर पुरुषाचें सोंग. प. ३ शात्रव—शत्रू. स्यमंतपंचक—क्षेत्राचें नांव. प
४ सुचिर—पुष्कळ वेळ. निवरा—ज्ञाताऱ्यास. प. १० मृदुल...त—म
ऊ व दुधाच्या फेंसाप्रमाणें पांढऱ्या गादीवर. पृ. १७३ प. १२ ऋजु
योधी—सरळ रीतीनें लढणारा. प. १३ पातें—पतनानें. प. १४ शिशु
सख्य—बालमित्रत्व. प. १५ प्रेतराजभवना—यमाच्या घरीं. प. १६तात
घातकातें—बापाला मारणाऱ्याला, धृष्टद्युम्नाला. प. १७ अर्यसु—शत्रू
प्राण. प. १ विशारद—प्रवीण. वृ. व. ति. पृ. १७४ प. २ बुझावी
समजूत करी. वृ. भु.प्र.प. ३ पवननिश्चळ—श्वास बंद होई. वृ.द्रु. वि. प.
वृत्ती—अंतःकरणव्यापार. वृ. मालिनी. प. ५ किंकरी—दासी. वृ. स्वागता
प. ६ शिराणी—आवड, वृ. भु. प्र. प. ७ श्रीवत्सांक—ज्याच्या उर
वर भृगूच्या लातेची श्रीवत्स नांवाची खूण आहे असा प्रभु कृष्ण
निजांकस्थित—आपल्या मांडीवर ठेवलेलें. वृ. शिखरिणी. पृ. १७५ प
८ अंबुजधरा—हातांत कमल धरणाऱ्या कृष्णा. वृ. शि. प. ९ भ्रू...
भिंवया फिरविणें. अंगुलिभंग—बोटें मोडणें. वृ. व. ति. प. ११ तिल
रुक्मिणीला. कैटभारी—कैटभ दैत्य मारणारा, कृष्ण. वृ. भु. प्र. पृ
१७६ वृत्त शिखरिणी. प. ३ सुदती—चांगले आहेत दांत जिचे अशी
स्त्री. प. ४ पडायाच्या...यां—लग्नांत साहणेवर चढतांना देखील माझ

हात तुला धरावा-लागला. प. ५ निमाली—नाहींशी झाली. सुषमा—शोभा. या ठिकाणीं त्या स्त्रीचा स्वर कोकिलेच्या स्वरापेक्षांही मधुर होता व तिचें मुख कमल व चंद्र यांच्यापेक्षांही सुंदर होतें असा अर्थ गर्भित केला आहे. प. ६ विद्युल्लेखा...ल—विजेच्या चमकण्याप्रमाणें चंचल. हें उपभोगांचें विशेषण. पृ. १७७ प. ७ दिवस्था—स्वर्गलोकीं असणारी. प. ८ यांतील गुण वगैरे शब्द दोन अर्थांचे असून ते स्त्रीकडे व कवितेकडे लागतात. गुण—( स्त्रीपक्षीं ) पातिव्रत्य, मायाळूपणा इ०; ( कवितापक्षीं ) प्रसादमाधुर्यादि. दोष—( स्त्रीपक्षीं ) दुर्गुण. ( क. प. ) दुर्बोधत्व, कठोरपणा इ०.अलंकार—( स्त्री. प. ) दागिनें; ( क. प. ) उपमा रूपक वगैरे. पहिला रस—शृंगार. वर्ण—( स्त्रीप. ) भाषण; ( क. प. ) वर्णरचना. मांगल्य...धात्री—मंगलप्रदकृत्यें करणारी. प. १ वृत्त वसंततिलका. विपिनांत—अरण्यांत. पृ. १७८ प. २ तेजोनिधी—तेजाचा सांठा. दिनमणी—सूर्य. वरी—स्वीकारी. तोख—आनंद. प. ३ रम्यस्वनें—मंजुळ आवाजानें. प. ४ उपल—धोंडे. प. ७ अंशुमाली—सूर्य. पृ. १७९ प.१० किंकर—दास. प. ११ पाणी—हात. प. १२ निर्झर—ओढा. पृ. १८० धाला—संतुष्ट झाला. विमळा—अतिशय शुद्ध अशा ( पदांला. ) प. १ वृ. पृथ्वी. निजकोटरा—आपल्या ढरल्याकडे. प. २ कवळ—घांस. पृ. १८१ प. ६ रुधिर—रक्त. द्विजा—पक्षिणी. उत्पल—कमल. प. ७ पांडुर—पांढरें. निमाले—नाहींसे झाले. वृ. व. ति. पृ. १८२ प. ३ धणमणीना—जाईना, घावरेना. प. ४ देव—श्रीकृष्ण. प. ९ विनशना—कुरुक्षेत्रीं. प. १० हयरत्नावरि—उत्तम घोड्यांवर. प. ११ मुदित—आनंदित. प. १२ स्वर्ग...सा—स्वर्गांतून पडलेल्या देवासारखा. सुतामरसा—उत्तम कमलाला. पृ. १८३ प. १५ तर्पी—संतुष्ट करी. पृ. १८४ प. २३ व्हावें...चें—श्रीकृष्णाच्या सांगण्याप्रमाणें करावें. प.२ वृत्त पृथिवी. तरुतती—वृक्षांची रांग. प. ३ सुधांशु—चंद्र. पृ. १८५ श्रवणयुग्म—दोन कान. प. ५ स्वैरिणी—स्वच्छंदी. प. ६ भ्रूलता—भिंवई. प. ७ कच—केंस. वैखरी—वाणी. प. ८ प्र-

प्रणयदृष्टि—प्रेमानें पाहणें. प. ९ वराननाः—सुंदर आहे तोंड जिचें अशी स्त्री. पृ. १८६ प. १० कपोल—गाल. [ पुढील पद्यांत अत्रिपत्नी अनसूया हिनें आपलें किती प्रेमानें स्वागत केलें ह्याची हकीकत सीतेनें आपल्या जावांस सांगितली आहे. ] प. २ शमिलेश्वर्षभ—योगी व देव यांमध्यें श्रेष्ठ. मानसीं—मानस सरोवरांत. पत्री—पक्षी, हंस. प.५ सुव्रता—साध्वी. पृ. १८७ सत्कुसुमें—चांगलीं फुलें. सुधाधिकरसें—अमृताहून अधिक आहे रस ज्यांत अशा. सूक्तें—चांगल्या बोलण्यानें. तर्पुनी—संतुष्ट करून. वृ. शा. वि. प. ६ मल्ललाटीं—माझ्या कपाळीं. अगतसार—टवटवीत. तत्...द्धि—तिच्या पुण्याची सिद्धि. प. ७ अंगराग—उटणें, उटी. यत्सौरभीं—ज्याच्या सुगंधाविषयीं. लोला—उत्सुक. घ्राणेक्षणांसि—नाक आणि डोळे यांना. वोल्रा—वर्णन करण्याला. वृ. व. ति. प. ८ हिमीं—थंडींत. हिमा—गार. प. ९ मांडवी—ही भरताची स्त्री. मायसी—आईप्रमाणें. आर्या—कुलीन स्त्री. वृ. शा. वि. पृ. १८८ प. १ अघांबुधि—पापसागर. वृ. हरिणी. प. ३ कृपानाव—दयारूप होडी. वृ. पृथ्वी.प.५ मंदधी--जडबुद्धि असा जो मी तो.वृ.शा.वि. पृ. १८९ प. ८ तूलानें—कापसानें. नगाला—पर्वताला. प. ९ सहाया—सहन करण्याला. पृ. १९० प. १ चौगुणीनें—चौपटीनें. शीतभानु—चंद्र. कलानिधी—चंद्र. प. २ उपराग—ग्रहण. भंग—लाटा. वृ. व. ति. प. ३ वाजी—घोडा. राजी—खुष. याजी—यज्ञ करणारा. त्यागी--दाता. धनद—कुबेर. सुकृत—पुण्य. रूप—धैर्य, हुरूप. वृ. शा. वि. प. ४ लोकबंधु—लोकांचें हित करणारा. कुवलय—चंद्रविकासी कमल. सांग—अंगासहित. कुसुमच्चाप म्हणजे मदन हा अनंग ( अंगरहित ) आहे. पृ. १९१ शरधि—भाता. धन्वीं—धनुष्याला. विपक्ष—शत्रु. विवरलक्षास्तव—विवर म्ह० व्रण व लक्ष म्ह० पाहणें. शत्रूच्या वक्षःस्थलावर व्रण दृष्टीस पडल्या मुळेंच त्यानें बाण जोडिला व सोडिला असें लोक अनुमान करीत. तो बाण जोडी केव्हां व सोडी केव्हां हें कोणाच्या दृष्टीस पडत नसे; इतकी त्याची चलाखी होती हा भाव वृ. शिखरिणी.प.

६ पूरितकाम--पूर्ण झालेल्या आहेत इच्छा ज्यांच्या असे. वृ. व. ति. प. १ वृत्त पृथ्वी. अशेष...या--सर्व जगाची उत्पत्ति. संरक्षण व नाश यांच्या ( हेतुला--कारण जो तूं त्याला. ) सजे--तयार असते. प. २ चतु...ही--धर्म, अर्थ, काम व मोक्ष हें चार पुरुषार्थ. वराका--कमी योग्यतेची. **पृ.** १९२ प. ३ विगत...भा--नाहींशी झाली आहे देहाची शोभा जिच्या अशी रती (मदनाची पत्नी.) विबुध--शहाणे लोक. कुंदामला--कुंदपुष्पाप्रमाणें शुभ्र जें यश त्याला. प. ४ रवि...निं--यमुनेच्या वाळवंटांत. प. ५ स्वदासकुमुदांस--आपले भक्त हींच कोणी चंद्रविकासी कमलें त्यांस. राकापती--चंद्र(राका--पौर्णिमेची रात्र.) प. ६ गदें--रोगानें. सराग--विषयासक्त. वास--राहणें.

# शुद्धिपत्र.

| पृ० | पं० | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ४ | ८ | जीतें, | जीतें |
| ,, | १५ | खाद्योता ! | खद्योता ! |
| ८ | ४ | परि | परी |
| ९ | ११ | सज्जांन | सज्जनां |
| ,, | २२ | घाणा | घाणां |
| ११ | १ | सवें | जवें |
| ,, | ८ | कड्यावरूनि | कड्यावरुनि |
| १२ | १८ | अमृतद्युति गौर | अमृतद्युतिगौर |
| ,, | ,, | यशहि तव | मद्यशहि |
| १३ | १ | होईल मद्वच मृषा | होइल मद्वच न मृषा |
| १६ | १ | उल्का | उल्कां |
| ३० | ३ | घेवोनी | घेवोनि |
| ३१ | ४ | दुर्जन संगतीहुनि | दुर्जनसंगतीहुनि |
| ,, | ५ | कामक्रोधादिकाभ्यंतर रिपु | कामक्रोधादिकाभ्यंतर-रिपु. |
| ३४ | ३ | बक्षिसाला, | बक्षिसाला |
| ३६ | ९ | अन्यमित्रांसवें, | अन्यमित्रांसवें |
| ,, | २१ | जनस्थिति | जनस्थिति— |
| ४० | ३ | रात्रिंचर राजा ! | रात्रिंचरराजा ! |
| ,, | ,, | मी, | मीं, |
| ४१ | १ | सून, | सून |
| ,, | २ | सवद्दत्त | सदवृत्त |
| ,, | ९ | मला, | मला |
| ,, | १२ | लंकाजीवन | लंका जीवन |

| | | | |
|---|---|---|---|
| ,, | १७ | पझीं, | पझीं |
| ४२ | ७ | दुर्भते ! | दुर्मते ! |
| ,, | १७ | हटवी, | हटवी |
| ४३ | ६ | पाहे | पाहें |
| ,, | ११ | संशयातें, | संशयातें |
| ,, | १७ | सकळा | सकळां |
| ४५ | ४ | विंबे | विंबे |
| ४७ | १ | केसें | कैसें |
| ४८ | ३ | पोंवळ्यांचा, | पोंवळ्यांचा |
| ,, | ११ | तें, | ते |
| ,, | १४ | स्वारीमध्यें | स्वारीमधें |
| ,, | २१ | तुरतरंगिणी काव्य. | सुरतरंगिणी काव्य. |
| ५० | १ | तुझें | तुझे |
| ५१ | १५ | देववें | देववे |
| ५२ | ८ | वसिष्टासि | वसिष्ठासि |
| ,, | ,, | पुसे | पुसें |
| ,, | २० | दृष्टी | दृष्टीं |
| ५३ | ३ | शोधी | शोधीं |
| ५४ | १२ | अति | अती |
| ,, | १८ | सुशुभ्र | सुशुभ्र |
| ५५ | ६ | पिंवळे | पिंवळें |
| ,, | १९ | निरवाधि | निरवधि |
| ५७ | १ | हे | हें |
| ,, | १३ | गिवसानें, | गिवसावें, |
| ६८ | १ | ऊठे, | उठे, |
| ,, | ४ | मानिली | मानिलीं |
| ,, | ७ | सज्जा | राज्जीं |

| | | | |
|---|---|---|---|
| „ | ८ | दाशरधी | दाशरथी |
| ६९ | ३ | धनूसी | धनूसि |
| ७१ | ४ | होई | होई |
| „ | १७ | पाहिल ? | पाहिल? |
| ७३ | १२ | शशिचेंहि | शचिचेंहि |
| ७६ | ४ | स्पर्शें | स्पर्शें |
| „ | „ | बळतेजोनाश हेतु | बळतेजोनाशहेतु |
| „ | २३ | हरीसही | हरीसहि |
| „ | २४ | भवसिंधुनायका ! | भवसिंधुनायका |
| ८० | १ | कर्णशरीरापासूनि | कर्णशरीरापासुनि |
| „ | २ | श्लोक.तमावरि | श्लोकतमावरि |
| ८७ | १२ | करुनि | करुनी. |
| ९४ | ११ | कांपिती | कापिती. |
| ९९ | १२ | निढारीं | निडारीं |
| ११८ | ९ | वाम बाहु सुरता | वामबाहुसुरता |
| १२५ | ११ | पार्थभव | पार्थ भव |
| १३६ | ३ | तंम | तप |
| १४२ | ७ | आमुचि | आमुची |
| १४५ | ११ | दांडगा | भांडगा |
| १४८ | २ | वृताहुनि | वृताहुति. |
| „ | १४ | पर स्व | परस्व. |
| १८६ | ८ | उभय | अभय. |
| १९१ | १६ | मुक्तीस जे | मुक्ती सजे. |